Kshatriyonnati darpana

# क्षत्रियोन्नतिदर्पण.

हें

पुस्तक Angaṇe, Bhānaji Bapuji-rao

भानजी बापुजीराव आंगणें

इनामदार, मसुरेकर

सभेचे सेक्रेटरी

यांनीं

सभेच्या आज्ञेनें व कांहीं सुज्ञगृहस्थांच्या अभिप्रायानें

बंधुहितास्तव तयार केलें,

तें

मुंबई येथें,

"माजगांव प्रिंटिंग प्रेस" या छापखान्यांत छापिलें.



शके १८०८ व्ययनाम संवत्सरे.

सन १८८६ इसवी.

श्रीमंत

# हाराज राजेबहादर रघुनाथराव भोसले
# ारदेसाई प्रांत कुडाळ व महालानिहाय
# संस्थान सुंदरवाडी

यांस

ह्यांचें चातुर्य, धूर्तपणा, प्रेक्षकता, विद्येची अभिरुचि
आणि स्वज्ञात्युन्नतिविषयीं उद्भवलेले सुविचार
ह्या अलौकिक गुणांची सुकीर्ति जगीं
कायम राहून तदनुसारें बंधुजनाचें
विद्याज्ञानवृद्धिनें खरें
हित व्हावें या
उद्देशानें
हें
पुस्तक
तयार करून
क्षात्रधर्म प्रतिपादक व
धर्मफंडोत्तेजक मराठे ज्ञातिच्या
सभेनें बहुआदरें व नम्रतापूर्वक
ह्यांच्या परवानगीनें अर्पण केलें असे.





# ईश्वरस्तवन.

## आर्या.

देवा दीनदयाळा, नाम तुझें होय वा बहु गोड ॥
ध्याया तें नित्यमुखीं देई सद्बुद्धिची अह्मां जोड ॥ १ ॥

जरि लीला गायाला, आह्मीं आहोंत सकल जन अज्ञ ॥
परि तव गुण गणगातें, शक्त्यनुसारेंचि बोलती सुज्ञ ॥२॥

ही जगरचना केंव्हां, कैशी केलीस तूं जगन्नाथा ॥
इच्छा मात्रें अपुल्या, निर्मिशि ऐशा प्रसिद्ध तवगाथा ॥३॥

पृथ्वी आप तेज तशीं, वायू आकाश हीं महातत्वें
निर्मियलीं पांच तुवां, सृष्टीचीं साधनें महासत्वें ॥ ४ ॥

रवि शशि नक्षत्रादिक, गगनांत भ्रमण पावतात सदा ॥
शोभा रमणीय दिसे, फारतयांची नहोय गणति कदा ॥५॥

या सृष्टींत निरंतर, दुष्कर्मे करिति अज्ञ जन कोटी ॥
त्यां लाविसी सुमार्गा, घालुनि अपराध सर्व ते पोटीं ॥ ६ ॥

ऐसा तूं परमात्मा, धांवसि वा भक्त दुःख वाराया ॥
तुजविण कोण दुजा भो, दुरितें वारूनि दीन ताराया ॥ ७ ॥

आह्मां क्षत्रिय लोकां, वरि निर्दयता किमर्थ ही देवा ॥
केली तुवां विसरलों, कीं करण्याला अह्मी तुझी सेवा ॥८॥

मुकतां तुझ्या कृपेला, झालों आह्मी अनाथ सर्व परी ॥
द्वेष मत्सर निंदा, नित्य कसे छळिति दुष्ट शत्रुपरी ॥ ९ ॥

---

ऐशा ह्या शत्रुं करीं, सांपडलों मंद होउनि शौर्य ॥
गेलें वित्त परघरीं, होतां तें नष्ट बापुडें धैर्य ॥ १० ॥

---

भुलुनी मधुर रवाला, भ्रष्टविली शुद्ध कीर्ति वीरांनीं ॥
मुकुनी स्वतंत्रतेला, सिंह जसे बंध पावती रानीं ॥ ११ ॥

---

हीं दुरितें कळवाया, आह्माला बुद्धिबळ नसे साच ॥
दुर्घट अशापरी हा, दासत्वाचा नसोसवे जाच ॥ १२ ॥

---

हा क्षात्रवंश रक्षी, विघ्नें वारूनि सर्व वा अमुचीं ॥
दे वरदान दयाब्धे, कीं जेणें जोड हो सुकीर्तिची ॥ १३ ॥

---

हे इश भक्तवत्सल, कृपानिधे प्रेमळा दिनानाथा ॥
आलों शरण पहाहे, दीन तुझ्या ठेवितों पदीं माथा ॥ १४ ॥

सभा.

---

# प्रस्तावना

आह्मां मराठे लोकांस पराधीनता प्राप्त झाल्यास बराच काळ मागें पडल्या कारणानें हल्लीं आह्मां लोकांची स्थिति अगदीं विलक्षण प्रकारची बनून गेली आहे; तेणेंकरून परस्परांत हमेशा व्यर्थ वादविवाद होऊन असंख्य तोटे होत असतात. तेव्हां अशा ह्या शोचनीय स्थितीचा पालट होणें फारच जरूरीचें आहे असें सर्वानुभवें सिद्ध होत आहे. ह्मणून आह्मांत प्रीति व ऐक्य वाढून सुखवृद्धि कोणत्या उपायानें होईल इत्यादि सुविचार बंधु कर्णी घालावे याजकरितां जी येथें सभा स्थापन झाली आहे तिनें आपलें कर्तव्य कर्म कोणत्या प्रकारें बजाविलें आहे. व मुंबई शहरीं मराठे ज्ञातीच्या उपयोगार्थ स्वसत्तेचें सार्वजनिक स्थळ नसल्यामुळें प्रसंगोपात ज्या अनेक अडचणी सोसणें भाग पडत आहे तीही न्यूनता दूर व्हावी या इराद्यानें जो फंड चालू केला आहे तो हल्लीं कोणत्या थरास जाऊन पोंहोंचला आहे वगैरे हकीकतीचें हें लहानसें पुस्तक बंधु जनाचे सेवेंत सादर करण्यांत येत आहे.

या पुस्तकांत जे विषय आले आहेत त्या प्रत्येकाचे शेवटीं व्याख्यानकाराचें व निबंधकाराचें नांव दिलें आहे आणि ज्याचे खालीं " सभा. " असें दर्शविलें आहे तो विषय सभेचे सेक्रेटरी यांजकडून प्रतिपादन झालेला आहे. ह्या सर्व विषयांच्या मुख्य मुख्य मुद्यांवर चांगली चर्चा होऊन ते सभेनें पसंत केले आहेत. त्या बद्दलची वाटाघाट ज्या ज्या सभेंत झाली त्या त्या सभांचे नंबर प्रत्येक विषयाचे शेवटीं दिले आहेत.

या पुस्तका विषयीं तारिख १ जानेवारी सन १८८६ रोजीं एक

मोठी खास सभा होऊन सर्वानुमतें हें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत आलें आहे. पुस्तकातील माहिती पासून प्रत्येकास विशेष लाभ होईल अशी आमची पूर्ण खात्री होते परंतु हें सर्वांस घेतां आलें पाहिजे ह्मणून याची किंमत ( सभेनें आपल्या श्रमाकडे लक्ष न देतां ) फारच अल्प ठेविली आहे. यास जरी " क्षत्रियोन्नति दर्पण " असें नांव दिलें आहे तरी यातील विषयांची योजना सार्वजनीक हितास अनुलक्षूनच आहे सबब महाराष्ट्रहितेच्छू जनांहीं इकडे अवश्य लक्ष द्यावें अशी विनंती आहे.

या पुस्तकाची योग्य व्यवस्था लावण्या करितां बंधु हितचिंतक रा० रा० धोंडबाराव पाटणकर ऊर्फ भाऊ साहेब इनामदार रहाणार वाडी व रा० रा० नारायणराव मेघाजी लोखंडे मुंबई या गृहस्थांनीं जे श्रम घेतले त्यांजबद्दल आह्मीं त्यांचे फारच आभारी आहों.

सभेचे अध्यक्ष.

**तुकारामजी हरजी पाटील साळुंखे कुसवरकर.**

# अनुक्रमणिका.

## प्रकरण पहिलें.

### भाग १

## प्रकरण तिसरें.

श्री

# क्षत्रियोन्नतिदर्पण.

## प्रकरण पहिलें.

### भाग १.

## क्षात्रधर्मप्रतिपादक व धर्मफंडोत्तेजक मराठे ज्ञातीची सभा.

ही सभा श्रावण शुद्ध ५ शके १८०४ तारिख १९ माहे आगष्ट सन १८८२ रोजीं उदय पावली; हिचा इच्छित हेतु दीनवत्सल सिद्धीस नेवो अशी आह्मीं प्रार्थना करितों.

या जगविख्यात मुंबई शहरीं निरनिराळे देशांतील भिन्न भिन्न धर्मांच्या मनुष्यांची व मतानुयायी जनांची सुमारें साडे सात लक्ष संख्या असून त्यांत आह्मां मराठे लोकांची निदान पंधरापासून वीस हजार पर्यंत लोकसंख्या असावी असा अदमास आहे. असें असतां येथें ज्याप्रमाणें इतर धर्माच्या व जातीच्या लोकांकडून आपापल्या ज्ञाति लौकिकास्तव व सुखसोईकरितां अनेक प्रकारचीं धर्मकृत्यें घडून आलीं आहेत व निराश्रितांस मदत मिळण्याकरितां फंड चालू आहेत त्याप्रमाणें आमचे ज्ञातीकडून कांहींच करण्यांत आलें नाहीं ही मोठीच सखेदाश्चर्याची गोष्ट आहे.

याविषयीं सूज्ञ व समदृष्टी बंधुवर्गाकडून विचार व्हावा या आशेनें कित्येकांनीं बहु नम्रपणानें ज्या सुचना केल्या त्यांबद्दल पांच सभा होऊन कांहीं वादविवाद झाले; परंतु त्यांपासून कांहींच निष्पन्न न होतां

श्रम व्यर्थ जाण्याचें चिन्ह दृष्टीस पडूं लागलें. त्या समयीं रा. भानजी बापुजीराव आंगणे यांनीं रा. गणपतराव लक्ष्मण भुजबळराव यांच्या सल्यानें मंडळीस विनयपूर्वक कळविलें कीं, ज्या विषयाच्या संबंधी इतकी वाटाघाट करून शेवटीं निराश होण्याचा प्रसंग येत आहे त्याच विषयाच्या संबंधानें मंडळीस कांहीं सुचना कराव्या असें मनांत आलें आहे करितां आणखी एकवेळ तसदी घेऊन पुढील सभेची योजना करावी. ही गोष्ट सर्वांस कबूल होऊन त्याप्रमाणें ता. १ आक्टोबर ( सभा ६ ) रोजीं सभा भरली तींत भानजीराव यांनीं एकंदर सर्व योजनेचे तयार केलेले चार निबंध वाचून दाखविले. त्यांत फंड कोणत्या प्रकारें चालू करावा, त्याचे रक्षणाची तजवीज कशी असावी, त्या कामीं कोणकोणाची कसकशी योजना असली पाहिजे, आणि त्याअन्वयें मंडळीनें वागण्याचे नियम इत्यादि सर्व प्रकारचें स्पष्टीकरण केलें होतें. ही सदरची सुचना त्या सभेंत हजर असलेल्या सर्वांस पसंत पडून कित्येकांचे असे उद्गार निघाले कीं हेच निबंध पुन्हा एकवेळ पुढील सभेंत वाचून त्यांत दिलेल्या सुचनेप्रमाणें तजवीज चालवावी. त्याप्रमाणें ता. ८ आक्टोबर रोजीं मंडळी अतिशय जमली होती, त्यावेळीं मागील प्रमाणें तेच लेख वाचले गेले. नंतर त्यांस अभिप्राय नवीन आलेल्या मंडळीनें दिल्यावरून वर्गणीचें काम चालविण्याचा निश्चय ठरला; इतक्यांत एका गृहस्थानें सभेस असा प्रश्न केला कीं, " धर्मकृत्य व्हावें अशासाठीं मंडळी वाटाघाट करीत आहे पण धर्मकृत्य ह्मणजे करावयाचें काय "? याचा बरोबर निर्णय न झाल्यामुळें कित्येकांचा संशय दूर झाला नाहीं यास्तव अगोदर याचा विचार व्हावा.

या सदरील योग्य प्रश्नाचा मंडळीनें बराच विचार करून असें ठरविलें कीं, एखादी धर्मशाळा किंवा सभागृह या ठिकाणीं आपल्या ज्ञातिकडून उभारलें जाणें मोठें अवश्यकतेचें व लौकिकाचें काम होय तेव्हां त्याप्रमाणें तजवीज होणें योग्य आहे. या दोन्हीं कृत्यांच्या अवश्यकतेबद्दल ज्या सुचना झाल्या त्या येणेंप्रमाणें:—मराठे लोक प्रवासांत असतां येथें ज्या वेळीं त्यांचें येणें होतें त्यावेळीं त्यांस उतरण्याची

सोय मुळींच नाहीं; कदाचित् झाल्यास तें स्थळ अति गैर सोयीचें असतें; अशा अडचणीच्या जागीं त्यांस दुसऱ्याकडून धिःकारयुक्त शब्द सहन करणें भाग पडतें. ज्या एक दोन धर्मशाळा येथें परयाती गृहस्थांकडून बांधल्या गेल्या आहेत त्यांत त्यांनीं प्रवाशांस फारच थोडा वेळ दिला आहे; तितक्या मुदतींत जर प्रवाशी तेथून न गेला तर तेथील रक्षकांचें अयोग्य रीतीचें वर्तन त्यांस सहन करणें भाग पडतें. अशा प्रकारची अपेक्षा न व्हावी यास्तव धर्मशाळा असणें फार जरूरीचें आहे. त्या उभारलेल्या सुस्थळीं विश्रांती पावलेले याति परयातीचे प्रवाशी किती तरें आभार मानतील! ते प्रवाशी जिकडे जिकडे जातील तिकडे तिकडे आपल्या ज्ञातबंधूंचें औदार्य व परोपकार बुद्धि यांचें वर्णन केल्याविना राहणार नाहींत; तर ह्या कामीं आपण मनोभावें झटणें मोठें उचित होय. येवढ्या वरूनच आपल्या लोकांत धर्मशाळा असणें किती जरूरीचें आहे, हें दिसून येतें. शिवाय सभागृह असल्यानें नित्य अथवा कारणपरत्वें ज्ञातबंधूंस एकत्र जमण्यास हें स्थळ अति सोईचें होणार आहे, आणि, अशी कांहीं नियमशः मंडळी जमत असल्यानें आपणांमध्यें कोणत्या प्रकारची उणीव आहे व ती कोणत्या उपायानें दूर होईल, हें आपणास कळेल. शिवाय दुरभिमानाचा कलंक आपणांस आहे कीं काय व तो असल्यास कशानें जाईल आणि तो गेल्यानें काय काय फायदे होतील इत्यादि गोष्टी आपणांस समजतील. या खेरीज स्वज्ञातींतील निराश्रित मुलांस विद्या देण्यास त्या जागीं एखादा वर्ग चालू करितां येईल. हल्लींच पहा जातीसंबंधीं एखाद्या कामाकरितां अगर इतर कोणत्याही बाबतींत स्थळाची जरूर लागल्यास बहुश्रमानें व भाडें देवून ही जागा मिळणें आमच्या बंधुवर्गास कठीण जातें. यदाकदाचित् जागा मिळाल्यास तेथील मालक कांहीं वेळानें कोणाचीही परवा न करितां ती जागा त्वरित रिकामी करून देण्यास त्यांस भाग पाडतो. यामुळें ज्या कामाकरितां लोक एकत्र झालेले असतात तीं कामें सर्व एका बाजूस ठेवावीं लागतात. त्यांचें काम शेवटास नेण्याकरितां पुनः एखाद्या नव्या स्थळाची योजना मंडळीस करावी लागते अशा प्रकारची अव्यवस्था होणें हें

लांछनीय नव्हे काय? याजकरितां स्वतःचें सभागृह असणें फारच जरूरीची व विशेष लाभाची गोष्ट आहे.

याप्रमाणें सभेकडून मूळ उद्देश समजतांच ता० १९ आक्टोबर रोजीं (सभा ८) असा विचार ठरला कीं ह्या दोहोंपैकीं एखादें कृत्य उभारण्यास जो रक्कम पाहिजे ती आपले ज्ञातबंधू (मराठे) कडून हक्कानें, परंतु मर्जीनुरूप शक्त्यनुसार घेत जावी, त्याचप्रमाणें जे परजातीय सूज्ञ व परोपकारी गृहस्थ या सत्कृत्याच्या कामीं आपणास द्रव्यद्वारें अगर हरएक प्रकारें साह्य देतील त्यांजकडून तें घेत जावें. आह्मांस पूर्ण आशा आहे कीं, आमचे स्वधर्मानुयायी व स्वराष्ट्रीय बंधु या कामीं कोणत्याही प्रकारचा परकीयपणा व त्या योगें वाढलेला कुत्सितभाव एकीकडे ठेवून मोठ्या ऐक्यत्वानें व उदार वृत्तीनें आश्रय देण्यास मागें घेणार नाहींत. पैशासंबंधीं वगैरे निर्णय सभेच्या नियमांत पुढें केला आहे. या ठरावास अनुलक्षून त्या दिवशीं त्या सभेंत बारा-असामींनीं बुकें नेऊन उगरणीचें काम चालू केलें; नंतर तोच क्रम पुढें चालू झाला.

येथपर्यंत ही हकिकत झाल्यावर, ह्या जमा होणाऱ्या पैशाची नीट व्यवस्था रहावी व सभाही कायम करण्यांत यावी एतद्विषयींची वाटाघाट सुरू झाली त्यावेळीं सभेचें महत्व व तिची अवश्यकता याजविषयीं रा. तुकारामजी हरजी पाटील साळुंखे यांनीं उत्तम विवेचन केलें आणि त्याचप्रमाणें रा. शिवराम देवराव कालेकर, रा. पांडुरंग भिकाजीराव विश्वासराव, रा. दाजीराव कृष्णाजीराव दळवी व रा. कृष्णाजी यशवंतराव चव्हाण यांनींही सभेपासून होणारे लाभ यांचें विशेष स्पष्टिकरण केलें.

सदरील गृहस्थांचे उद्गार सर्वांस पसंत पडून सभा कायम करण्याचा निश्चय झाला आणि ती संमति जरीं सर्वांचीच होती तथापि त्यांपैकीं ज्यांनीं आपलीं विशेष मत्तें प्रदर्शित केलीं त्यांचीं नांवें:—

रा. रत्नोजी हिरोजी सावंत, रा. शिवराम कृष्णाजीराव दळवी, रा. रामजी कृष्णाजी लाखम, रा. रामजी हिरजी सावंत, रा. गणपतराव लक्ष्मण भुजबळराव, रा. लाडोजी कृष्णाजी प्रभु, रा. रघुनाथ बाबाजीराव मालप

रा. सूर्याजी धनाजी नाईक निळवर्ण, रा. कृष्णाजी बाळोजी सावंत झाडगांवकर, रा. बाळाजी आत्माजीराव राणे, रा. भाऊ बापुजीराव पाटोळे, रा. राघोजी बापुजी नाईक बने, व रा. भिकाजी गोविंदराव चवाण. त्याचवेळीं रा. भानजी बापुजीराव आंगणें यांजकडून अशी सूचना करण्यांत आली कीं, ईश्वर कृपेनें ही सभा इतके दिवस चालून तिची कायमची योजना आज रोजीं ज्ञात बंधूंकडून करण्यांत आली हें पाहून चित्त समाधान पावलें. ह्या त्यांच्या स्तुत्य अनुमताबद्दल आभार मानावे तितके थोडेच आहेत. ज्यापेक्षां ही सभा तीन महिने सतत चालून इतक्या रंगा रूपास आली आहे, व पुढें ही ज्यास्त येण्याचा संभव आहे, त्यापेक्षां हीस एखादें योग्य नांव देणें अवश्य आहे.

ह्या सभेचा इरादा फंड जमवून एक स्वतंत्र धर्मशाळा किंवा सभा गृह उभारण्याचा दिसतो, त्यापैकीं धर्मशाळेचा उपयोग, बडोदें, ग्वाल्हेर इंदूर, पुणें, सातारा, व रत्नागिरी आदिकरून लहान मोठ्या शहरांतील व गावांतील मराठे व इतर प्रवाशी यांस व्हावा, आणि सभा गृहाचा उपयोग तेथें आह्मीं वेळोवेळीं एकत्र जमून ज्ञातीची उन्नति होण्याविषयीं कांहीं उपाय योजावेत असा सभेचा मानस दिसत आहे, ह्मणून या सभेस "क्षात्रधर्म प्रतिपादक व धर्म फंडोत्तेजक ( मराठे ज्ञातिची ) सभा" हें नांव देणें उचित आहे असें मला वाटतें; यावर सुशिक्षीत व जुने माहीतगार वयोवृद्ध असे पुष्कळ गृहस्थ हल्लीं येथें आहेत, त्यांस कांहीं कमजास्त कळविणें असल्यास त्यांनीं कळवावें, ह्मणजे सर्वांनुमतें त्याचा योग्य विचार केला जाईल.

सदरील सूचना सर्वांस ग्राह्य होऊन वरील नांव पसंत झाल्याबद्दल टाळ्यांचा एकच गजर झाला. (ता० २९ नोव्हेंबर) ह्या प्रकारें वाटाघाट होऊन कायम व्यवस्था होईपर्यंत १४ सभा झाल्या, त्यांत एकंदर २१४३ ज्ञातिगृहस्थ हजर होते. हें कृत्य होण्याकरितां त्यांजकडून योग्य अभिप्राय वेळोवेळीं मिळत गेल्या कारणानें मंडळीस मोठी इर्षा उत्पन्न झाली. त्या सर्वांच्या अनुमोदनावरून ज्या गृहस्थांची या कामीं योजना करण्यांत आली त्यांचीं नांवें.

**अध्यक्ष व खजीनदार.**

१ तुकारामजी हरजी पाटील साळुंखे.

**दुय्यम खजीनदार.**

१ बाळकृष्ण अर्जुन सावंत भोंसले ( सरदार, इनामदार. )

***जोखमदार व चिटणीस.**

१ भानजी बापुजीराव आंगणे ( इनामदार. )

**दुय्यम चिटणीस.**

१ रघुनाथ विठोजी जाधवराव ( यशवंतराव, फडनाईक. )

**जोखमदार***

रामजी कृष्णाजी लाखम्.
रत्नोजी हिरोजी सावंत इंजर पटेल.
रामजी हिरजी सावंत देसाई.
लाडोजी कृष्णाजी प्रभू गांवकर.
रघुनाथ बाबाजीराव मालप उर्फ बाबासाहेब.
गणपतराव लक्ष्मणराव माने ( भुजबळराव सभा नाईक. )
गंभाजी भानजी राणेराव.
पांडुरंग भिकाजी विश्वासराव सरनाईक
कृष्णाजी यशवंतराव चवाण प्रभुगांवकर.
दाजी कृष्णाजीराव दळवी ( सेनापति. )
राघोजी सखोजी सावंत.
सखाराम रावजीराव साळुंखे ( अनेराव सरनाईक. )
सुभानजी खेमजी नाईक तावडे.
आबाजी बाळोजी नाईक तावडे.
कृष्णाजी जयरामराव गायकवाड.
साबाजी सखोजीराव मुळिक प्रभु मसुरे.
व्यंकोबा सदाशिव सावंत.
सुर्याजी धनाजी नाईक नीळवर्ण उर्फ चालुक्य.

---

* जोखमदार–म्हणजे पैशाची आफरातफर व सभेची अव्यवस्था न होण्याविषयीं ज्यांजकडे विशेष जबाबदारी आहे ते ?

राघोजी बापुजी नाईक वने उर्फ पवार.
बाळाजी अत्माजीराव राणे.
विठोजी खंडोजीराव पिसाळ.
रामचंद्र पांडुरंगराव बागवे. देसाई ( मसुरे. )

**व्यवस्थापक.**

केशवराव रामचंद्र साळुंखे ( अनेराव, सरनाईक. )
महादेव रघुनाथ विश्वासराव सरनाईक.
शिताराम बापुजीराव जाधव प्रभु वांदिवडे.
भिकाजी बापुजीराव पाटोळे उर्फ साळुंखे ( मोकाशी. )
गोपाळ भिवाजीराव दळवी.
भाऊ बापुजीराव पाटोळे उर्फ साळुंखे.
यशवंत आनंदराव इचारे.
पांडुरंग विश्रामराव जाधव प्रभु, वांदिवडे.
लक्ष्मण तातोजीराव भोंसले,
शिवरामराव देवराव कालेकर ( सरखोत )
बळवंत रावजीराव मालप.
जिवाजी अमृतराव जाधवराव ( यशवंतराव फडनाईक )
भलाजी नारायणराव कदम.
विटोजी राघोजीराव चवाण.
काशीरामराव लक्ष्मणराव माने ( भुजबळराव, सभा नाईक. )
लाडोजी सुभानजी राणेराव.
गोविंद नारोजी नाईक तळेकर.
हरबाजी दाजीराव कदम.
शिताराम श्रीधर नाईक तावडे.
बाबाजी अनाजी नाईक साठम.
संभाजी हरजी नाईक साठम.
येसू बापुजीराव बागवे देसाई.
बाबाजी अनाजीराव साळुंखे ( अनेराव सरनाईक. )
गोपाळ विठोजी नाईक साठम.

भिकाजी गोविंदराव चवाण देशमुख.
अमृतराव गोविंदराव माने ( भुजबळराव, सभा नाईक. )
बाबाजी राघोजीराव चवाण.
घन:शाम भाऊ सावंत भोसले.
आपाजी दौलतराव चवाण.
जयरामराव लक्ष्मणराव माने ( भुजबळराव, सभा नाईक. )
सोनजी यशवंत राणेराव.
बाबाजी रघुनाथ राणेराव ( इनामदार. )
विठोजी दौलतजी सावंत.
गणपतराव बाळाजीराव माने ( भुजबळराव सभा नाईक. )
राघोजी बाबाजी नाईक दळवी
रत्नोजी महीमाजीराव कदम.
शिवराम गंगाजीराव माने ( भुजबळराव सभा नाईक. )
तुकाराम सदुजी गांवकर साळसकर.
रामजी बच्चाजी नाईक अहीर.
गोपाळ बापुजीराव मुळिक प्रभु मसुरे.
दाजी बाळाजीराव सुर्वे.
श्रिपतराव महीपतराव माने ( भुजबळराव सभा नाईक. )
भाऊ आत्माजी नाईक तावडे.
लक्ष्मण अनाजी राणेराव.
दिपाजी बाळाजीराव साळवी.
रामचंद्र नारायणराव माने ( भुजबळराव सभा नाईक )
येशवंत बापुजीराव सुर्वे.
रावजी श्रिपतराव कदम.
नारायण अमृतराव कदम.
शिताराम जिवाजी जाधवराव ( येशवंतराव फडनाईक. )
रावजी बापुजीराव चवाण
रामजी बाळोजी झाडिक.
नारायण बापुजीराव कनवजे.

रावजी बच्चाजीराव साळवी

धाकु गंगाजीराव दळवी पटेल.

विठुजी राघोजी नाईक सरपरे उर्फ साळुंखे.

लक्ष्मण पांडजी नाईक लोटणकर.

वाळुजी धनाजीराव घाग उर्फ यादव,

कृष्णाजी भिवाजीराव आंगणे.

गोविंद विठोजी नाईक नीळवर्ण उर्फ चालुक्य.

विठोजी जोतबाराव कदम.

जयराम राघोजीराव पाटोळे ऊर्फ साळुंखे.

बाबाजी बापुजीराव कदम.

महादेव महिपतराव दळवी.

सदाशिव धनाजीराव माने. ( भुजबळराव सभानाईक.)

---



# प्रकरण १ लें.

## भाग २ रा.

आतां सभेमार्फत जे जे ठराव झाले व नियम ठरले त्यांचें लेखन करणें जरूरीचें आहे; कारण ज्या पायावर एखादी इमारत उभी करणें असते तो पाया इमारतीच्या भारानें ढासळला न जावा यास्तव प्रथमच त्याची विशेष काळजी बाळगून तो मजबूत घालावा लागतो तदनुसार एखादी सभा किंवा लहान मोठा मेळा सदोदीत सुरळीतपणें चालण्यास त्या त्या पक्षाचे नियम किंवा ठराव हेच कारणीभूत होत असतात. ते जसजसे सरळ सोईचे व निःसंशयाचे असतात तसतशी मंडळी टिकाव धरून कीर्तीस पात्र होते ह्मणून सभेचे नियम दर्शविणें योग्य होय.

## सभेचे नियम.

१ सभा प्रत्यही आठ दिवसांनीं शनवारीं भरत जाईल.

२ सभा रात्रौ आठ वाजतां सुरू होऊन दहा वाजतां बरखास्त होईल. या दोन तासांपेक्षां जास्त वेळ न जावा याजकरितां विशेष काळजी ठेविली जाईल.

३ सभेंत आलेल्या गृहस्थांनीं शिरींचें भूषण खालीं ठेवून अव्यवस्थितपणें बसूं नये व धुम्रपान करूं नये.

४ अव्यवास्थित पणानें सभेस येणारास सक्त मनाई आहे.

५ सभेंत कोणीही उंच स्वरानें ( रागानें ) व कोणास लक्षून भाषण करूं नये; कारण तसें करणें सभेस दूषणीय आहे.

६ सभेचें काम सुरू करणें ह्मणजे प्रथमतः सभेच्या कामदारांपाशीं जमलेल्या पैशाचा हिशोब पाहावा; नंतर नवीन आलेल्या गृहस्थांस सभेचा स्तुत्य उद्देश चिटणीसानें कळवावा. जे या कामीं उगरणी जमा करण्यास श्रम घेऊं इच्छितील त्यांस पावती व नांवनीशीं बुकें देण्यांत येतील, व त्या संबंधीं जोखमदारी पुढें दर्शविलेल्या नियमान्वयें

कळवून त्यांच्या सह्या नियम बुकावर घेतल्या जातील. आणि त्यांचीं नांवें त्यांच्या राहाण्याच्या टिकाणासहित रजीस्टर बुकांत नोंदलीं जातील. जे कोणी बुकांची जोखमदारी न पतकरतां, आपली स्वतः-चीच वर्गणी देतील त्यांजपासून ती घेऊन, त्यांस पावती देण्यांत येईल. कोणी नियमित वेळांत रकम पोहोंचती करण्याच्या इराद्यानें सभा लिस्टावर आंकडा देत असल्यास तसेंही करतां येईल.

७ चिटणीस, पांडुरंग भिकाजी विश्वासराव, दाजीराव कृष्णाजीराव दळवी, शिवराम देवराव कालेकर, कृष्णाजी यशवंतराव चवाण, बळ-वंत रावजीराव मालप व घनःश्याम भाऊ सावंत ह्यांपैकीं पहिल्या पांच असाम्यानीं सभेंत आलेलीं बुकें तपासून शेवटील पानावर आपापली सही करावी. सदरील सर्व गृहस्थांस सभेंत एखाद्या उपयुक्त विषयावर भाषण करण्यास सभेच्या वतीनें मोकळिक आहे. भाषण समयीं ह्यां-जकडून एखाद्या प्रसंगीं विषयांतर झाल्यास त्यांचे भाषणास नियम ११ प्रमाणें व्यत्यय येणार नाहीं; परंतु त्यांची भाषणें संपल्यावर भा-षणांमधील संशयांचें निर्सन किंवा विषयांचें मंडन अध्यक्ष यांजकडून केलें जाईल. सभेंत झालेल्या भाषणांवर अध्यक्षांनीं आपला अभिप्राय देणें तो त्यानीं त्याच सभेंत अथवा पुढील खेपेस देत जावा, कीं जेणेंकरून ग्राह्याग्राह्यतेचा निर्णय होत जाईल.

८ हिशोब तपासून जी रक्कम जमा होईल ती खजीनदार यांचे स्वाधीन करावी ते गैर हजर असल्यास चिटणीस यांनीं ती घेऊन खजीनदार यांजकडे पोहोंचती करावी. ज्या कामदाराकडूत रकमा जमा झाल्या असतील त्यांस, अध्यक्षासहित पांच असाम्यांच्या सह्यांची पावती द्यावी.

९ जमेचा आंकडा प्रत्येक महिनाअखेर चिटणीसांनीं वर्तमान-पत्रीं प्रसिद्ध करीत जावा.

१० जमेपैकीं खर्चाकरितां दहा रुपये चिटणीस यांजकडे ठेविले जातील.

११ सभेच्या उत्तेजनार्थ कोणास कांहीं भाषण करणें जाहल्यास सभेच्या नित्यक्रमानंतर नि. ६ प्रमाणें व वेळ असल्यास त्यांस

मोकळीक आहे परंतु भाषण गैरशिस्त दिसल्यास तें अध्यक्ष यांजकडून बंद केलें जाईल.

१२ रत्नोजी हिरोजी सावंत, लाडोजी कृष्णाजी प्रभू, रघुनाथ बाबाजीराव मालप, गणपतराव लक्ष्मणराव माने व बाळकृष्ण अर्जुन सावंत भोसले यांनीं सभेंत आलेल्या गृहस्थांचें कांहीं कमजास्त बोलणें असल्यास तें ऐकून त्याचें निराकरण मोठ्या सौम्यतेनें करावें व सभेचें काम नियमान्वयें चालत आहे किंवा नाहीं इकडे विशेष लक्ष द्यावें.

१३ सूर्याजी धनाजी नाईक नीळवर्ण, सुभानजी खेमजी नाईक तावडे, संभाजी हरजी नाईक साठम, केशवराव रामचंद्र अनेराव, महादेवराव रघुनाथ विश्वासराव व गंभाजीराव भानजीराव राणे यांनीं, सभेंत जाती प्रकरणीं कोणी बोलणें काढल्यास त्यांस फार धूर्ततेनें ( कोणतिही गोष्ट विकोपास न जाईल अशा विचारानें व सभेस दूषण न येण्याजोगें ) योग्य उत्तर द्यावें. विशेष महत्वाचें असल्यास अध्यक्षांचे विचार त्या कामीं कायम धरावे.

१४ सभे संबंधी हरएक बाबतीचे लेख चिटणीस यांजपाशीं असतील त्यांपैकीं कांहीं कोणास पहाण्याची मर्जी असल्यास सभेंत दाखविले जातील. सभेच्या साह्यार्थ ज्ञाति परज्ञाति गृहस्थांस येथील अगर बाहेरगांवीं पत्र व्यवहार करणें तो चिटणीस यांजकडूनच व्हावा.

१५ जे सभासद सभेंत हजर असतील त्यांनीं सभेच्या कृतीकडे पूर्ण लक्ष देऊन कोणे गोष्टीचा संशय आल्यास तत्क्षणीं चुकीची दुरुस्ती करवावी परंतु अयोग्य प्रश्न करून व्यर्थ वेळ घालविण्याचे कामीं पडूं नये व कोणाचा अपमान करण्यास झटूं नये.

१६ जे जे गृहस्थ या सभेच्या साह्यार्थ वर्गणी देऊं इच्छितील त्यांनीं ज्यांकडे सभेचीं बुकें असतील त्यांजपाशींच द्यावी, आणि त्यांजपासून त्यांच्या सहीची पावती तावडतोब घ्यावी, पावती घेण्याची हयगय होऊन दिलेल्या पैशाची दुर्व्यवस्था झाल्यास सभेकडे जोखम नाहीं.

१७ जे जे गृहस्थ वर्गणीद्वारें मदत देऊं इच्छितील त्यांजकडून ती सभेच्या कामदार असाम्यांनीं घेऊन त्यांस आपल्या सहीची तारिखवार पावती देत जावी. दहा रुपयांपेक्षां ज्यास्त रक्कम देणारांस,

सभेंत येण्यास विनंती करावी, असे साहाय्य देणारे गृहस्थ सभेंत आल्यावर त्यांनीं दिलेल्या योग्य रकमेबद्दल चिटणीस यांनीं त्यांचे आभार मानून नियम ८ प्रमाणें त्यांस पावती देण्यांत यावी.

१८ कोणी ज्ञातबंधु या कृत्यास साह्य देणारा असून कांहीं संशयानें तें नाकारीत आहे असें समजण्यांत आलें असतां, प्रथम चिटणीसांनीं त्या गृहस्थास सभेस येण्यास विनंतीपत्र लिहावें त्या पत्राप्रमाणें कदाचित् त्याचें येणें न झाल्यास, त्याची भेट घेणें सभेस उचित दिसल्यास सभेकडून कांहीं मंडळीची योजना व्हावी, त्यांनीं त्या गृहस्थाची भेट घेऊन सभेचे योग्य विचार कळवावे इतकेंही करून त्यांचे संशयाचें निरसन न झाल्यास त्याचा तिरस्कार करूं नये कारण "सत्यमेवजयते" या वाक्याप्रमाणें सभेचे स्तुत्य हेतु कधींच पराङ्मुख पावणार नाहींत.

१९ ज्या ज्या वेळीं वर्गणी दिलेल्या गृहस्थांचीं नांवें उतरून घेण्यास बुकें पाहिजेत अशी सूचना चिटणीस यांजकडून सभासदांस होईल त्या त्या वेळीं प्रत्येकानें आपापली पावती व नांवनिशीबुकें सभेंत आणावीं व जीं बुकें भरून पुरीं होतील तीं दप्तरीं शिल्लक रहाण्याकरितां परत घेतलीं जातील व त्या ऐवजीं नवीं दिलीं जातील.

२० या परोपकारी व लौकीकाचे कामीं कोणा उदार गृहस्थाकडून एखादी मोठी रक्कम पोहोंचेल तर मात्र ती त्याच वेळीं वर्तमानपत्रीं प्रसिद्ध करण्यांत येईल. बाकीच्या सर्व रकमा सभेकडून प्रसिद्ध होणाऱ्या बुकांतून नांव, गांवासहित प्रसिद्ध केल्या जातील.

२१ जे परयाति गृहस्थ द्रव्यद्वारें मदत देतील त्या बद्दल सभेकडून योग्य तजवीज ठेविली जाईल, कदाचित त्यांचे साह्याचें अनुमान फारच योग्य असल्यास त्या गृहस्थांचे औदार्याची मासलेदार उदाहरणार्थ अति उत्तम योजना केली जाईल.

२२ ज्या बाहेर गांवच्या सूज्ञ गृहस्थांकडून ह्या कृत्याकरितां वर्गणी पोंहोंचती होईल त्यांस नियम ८ प्रमाणें सभे मार्फत पंचांच्या सहीची पावती पोंहोंचती करण्यांत येईल.

२३ नियम ७ ह्यांत दर्शविल्या प्रमाणें प्रत्येक कामदाराकडून जमा झालेल्या पैशाचा हिशोब एकेक महिन्यानें घेतला जाईल या मुदतीबाहेर रक्कम कोणाजवळही ठेविली जाणार नाहीं. एखादे वेळीं त्यांज पाशीं पंचवीस रुपयांपेक्षां जास्त रक्कम जमल्यास ती त्यानें महिना भरे तोंपर्यंत न ठेवितां सभेंत हजर करावी. आणखी कामदार लोकांनीं हेही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, प्रत्येक महिना अखेर वर्गणी जमा होवो अथवा न होवो त्यांजपाशीं असलेलीं पावती बुकें सभेंत आणून त्यांजवर तपासणारांच्या सह्या घेतल्या पाहिजेत.

२४ ह्या नियमा प्रमाणें जे कोणी सभेचे कामदार होऊं इच्छितील त्यांनीं सभेचे ठराव लक्षपूर्वक समजून घेऊन सभेकडून पावती बुकें न्यावीं, परंतु असें करण्याच्या अगोदर त्यांनीं आपले शक्त्यनुसार सभालिस्टावर आंकडे देऊन ते पुढील सभेंत भरपाय करावेत.

२५ सभेच्या कामदारांकडे वर्गणी जमा करण्याकरितां जीं बुकें सभेकडून दिलीं जातील त्यांजविषयीं त्यांनीं फारच काळजी घेतली पाहिजे त्या बुकांची त्यांजकडून कोणत्याही प्रकारची अफरातफर होतां उपयोगीं नाहीं जर कोणाकडून त्याची अव्यवस्था होऊन तीं बुकें निरुपयोगीं होतील किंवा त्यांचे निष्काळजीपणानें हरवलीं जातील तर त्या बुकांचे प्रत्येक पानास आठ आणे प्रमाणें घेतले जातील अथवा त्यांबद्दलची खरी हकीकत सभेस कळवून जो त्या वेळीं पंचाकडून निकाल करण्यांत येईल तो त्या गृहस्थांस मान्य करावा लागेल.

२६ सभेच्या प्रत्येक कामदारानें प्रति सभेस हजर असलें पाहिजे एखादे वेळीं फार जरूरीचें व अगत्याचें काम असल्यास सभेच्या नांवें त्याजकडून चिठी आली पाहिजे. कोणास एखादे प्रसंगीं एक दोन महिन्याचे रजेनें बाहेर गांवीं जाणें असल्यास त्यानें आपणाकडे जमलेल्या पैशांचा हिशोब देऊन जावें, अति निकडीच्या कामामुळें सभेंत येणें न होईल असें असल्यास शिल्लक रक्कम चिटणीस यांजकडे पोंहचती करावी. एखाद्यास मुंबई सोडून जाणें भाग पडेल ( ह्मणजे त्याचें येणें पुन्हा होणार नाहीं ) त्यानें सभेस हिशोब देऊन बुकें परत करावीं असें झाल्यावर त्या गृहस्थाकडून सभेस जें साह्य पोहोंचलें असेल त्या-

विषयीं त्या वेळीं नियम ७ यांत दर्शविल्या गृहस्थांपैकीं कोणा एका-कडून योग्य भाषण होऊन त्या गृहस्थाचे आभार मानले जातील.

२७ सभेच्या कामदारांपैकीं कोणी नियमाविरुद्ध जाईल तर त्या-जकडे सभेनें सोंपवीलेली जोखमदारी दूर होऊन त्याचे फक्त नांव सभा पटांत राखलें जाईल. कामदारांपैकीं कोणास सभेंतून नांव काढणें झाल्यास त्यानें योग्य कारण दर्शवून स्वदस्तूरचा राजिनामा पाठ-विल्याखेरीज तसें करतां येणार नाहीं; परंतु त्या राजीनाम्यांत दिलेलें कारण सभेस रास्त दिसेल तर तो मंजूर केला जाईल.

२८ ह्या कृत्याच्या कामीं जी रकम उभी राहील ती खजीनदार यांचे नांवें सेव्हिंग ब्यांकेंत ठेविली जाईल.

२९ जमेपैकीं एखादी मोठी रकम खर्च करणें योग्य दिसल्यास जोखमदार ह्यांचे समत्तीशिवाय तिचा व्यय केला जाणार नाहीं. क-दाचित् ते सर्व हजर नसल्यास निम्मेंपेक्षां जास्त असाम्यांची संमति पसंत केली जाईल.

३० ज्या उदार गृहस्थांनीं द्रव्यद्वारें या कृत्यास मदत दिली असून ती कोणत्याही विकल्पामुळें ते आपली स्वताची अथवा जमा केलेली रकम परत घेऊं इच्छितील तर त्यांस ती दिली जाणार नाहीं. कारण सत्कृत्यास जमा झालेली रकम तशाच योग्य कार्णीं व्यय करणें मोठें मह-त्वाचें आहे आणि तीचा अशाच रीतीनें खर्च व्हावा याबद्दल मात्र सभा जबाबदार आहे.

३१ ह्या सभेपुढें जे निबंध, परोपकारी व सुधारणेच्छु ज्ञाति पर-ज्ञाति गृहस्थांकडून वाचले गेले आहेत व पुढेंही वाचले जातील त्यां-जवर सर्व प्रकारची मालकी सभेची आहे.

**सभा.**

वर दर्शविलेले नियम व व्यवस्था सभेकडून करण्यांत आली आहे तिचा सर्वत्रांनीं योग्य विचार करून लौकीक कृत्यांचे कामीं साह्य दे-ण्याचें मागें घेऊं नये जितक्या त्वरेनें साह्य मिळत जाईल तितक्या अल्प काळांत एखादी इमारत तयार होईल नंतर पुढें त्या कामाची नीटपणें व्यवस्था राहिली पाहिजे यास्तव जे पंच नेमणें ते लायक

व परोपकार्यी ह्मटणारे असे गृहस्थ प्रत्येक तालुक्यांतील किंवा महालांतील नेमिले जातील त्यासंबंधी सर्व प्रकारचें जोखम सभा आपल्याच आंगावर घेऊं इच्छित नाहीं. करितां कोणी कांहीं कुतर्क काढून परिश्रम घेणारांचीं मनें दुःखित करण्याची व्यर्थ खटाटोप करूं नये असें सभेकडून विनंतिपुर्वक कळविण्यांत येत आहे.

ह्याशिवाय पुढारी लोकांस व सर्व ज्ञातबंधूंस सभेच्या अनेक प्रकारच्या योग्य सूचना हस्तलिखित नियमबुक नंबर १ व त्या लगतीची पुरवणी ह्यांत दिल्या आहेत त्या सर्वांचा येथें उल्लेख करावा परंतु लिहिण्याचें काम फारच वाढतें यास्तव तसें करण्यांत आलें नाहीं.

याप्रमाणें सभेचें काम यथायोग्य व्यवस्थेनें सुरू झाल्याकारणानें दिवसेंदिवस त्या कामास जास्त उत्तेजन येऊन तारीख २० माहे ज्यानेवारी सन १८८३ ( २० सभेपर्यंत ) ५३ पावती बुकें वर्गणी जमा करण्याकरितां सभेकडून देण्यांत आलीं आणि इतक्या दरम्यान ज्या सभा झाल्या त्यांत प्रत्येक वेळीं सभेचे उद्देश समजून घेण्यास व कित्येक उत्तेजनार्थ संमत्ति देण्यास अतिशय मंडळी जमत असे तिची सरासरी संख्या प्रत्येक सभेत सवाशेंपासून दिडशेंपर्यंत होती त्यावेळीं कांहीं विचारी बंधुजनांनीं जे आपापले उद्गार बाहेर काढले, त्यांवरून त्यांची ज्ञांतिउन्नती विषयीं उत्कंठा, भाषण शैली, सरळपणा, विनयता, शिवाय खटपट करण्याचा उल्हास इत्यादि अवर्णनीय गुण सभेच्या उत्कर्षास कारणीभूत होत आहेत.

अशा परोपकार बुद्धीनें ज्या ज्यावेळीं जी मंडळी सभेत येत गेली व तिनें त्या त्यावेळीं जीं भाषणें केलीं त्यांतील सारांश व सभेंत जे निबंध वाचले गेले त्यांचें इत्थंभूत स्वरूप सभेच्या अभिप्रायासह पुढें दर्शविण्यात आलें आहे. कारण सभा स्थापन होऊन तिजकडून कोणकोणते विषय कसकसे प्रतिपादन झालें याचें दिग्दर्शन करणें विशेष जरूरीचें आहे. कारण त्यापासून सदुद्योगी गृहस्थांचे विचार प्रसरण पावून त्यांस व त्यांचे अल्प समाजांस अंशतः तरी लाभ झाल्यावांचून राहणार नाहीं. अशी या सभेस पूर्ण अशा आहे.

सभा.

# प्रकरण २ रें.

आजची सभा किती सुशोभित दिसत आहे, याजवरून सभेचे व्यवस्थापक व इतर मंडळी, या सभेचें काम चालविण्यास फार उत्सुक आहेत व ते मोठ्या आस्थेनें व श्रमानें तडीस नेतील याजविषयीं आजची सभाच साक्ष देत आहे. ही आजची सभा जरी २१ वी आहे तथापि इजला आपण पहिली सभा ह्मणणें योग्य होय; कारण आज पर्यंत या सभेविषयीं बऱ्याच प्रकारची चर्चा होऊन नियमाची वगैरे जुळवणी झाली आहे तेणें करून या समाजास सभेचें खरें स्वरूप प्राप्त झालें आहे, व सभेस नावही योग्य प्रकारचें देण्यांत आलें आहे.

सभेच्या नियमा प्रमाणें, कामदारांनीं व ज्ञात्युन्नति इच्छिणारे बंधुवर्ग यांहीं आपापली उगरणी आणली आहे, हे सर्व प्रकार पाहून सर्वांस मोठा आनंद होत आहे. या पुढें या सभेनें अशा उपयुक्त विषया संबंधीं आपले सुविचार लोकांत प्रगट केले पाहिजेत कीं, जेणें करून या सभेचें अस्थित्व बंधु जनांचे स्मरणांत चिरकाळ राहील व आपणांतील अव्यवस्थितपणा दूर होण्याचीं चिन्हें दृष्टीगोचर होतील. ज्या पेक्षां आपली सर्वांची अशी इच्छा आहे कीं, ज्ञात्युन्नति व्हावी, त्या पेक्षां एकी, विद्या, क्षात्रधर्मांचे सुविचार व फंड वृद्धि या चार मुद्यांवर प्रत्येकानें आपआपल्या माहिती प्रमाणें बरेच श्रम घेऊन ह्या विषयांचें विवेचन केलें पाहिजे. शिवाय ज्या ज्या इतर गोष्टींची विशेष जरूरी दिसेल त्यां त्यां बद्दल निबंधरूपी किंवा व्याख्यानें देऊन निर्णय केला पाहिजे. या प्रकारें या सभेकडून सदसद्विचार लोककर्णीं पडतील तरच ही सभा स्थापन केल्याचें खरें सार्थक्य होणार आहे. याजकरितां सर्वत्रांस अशी विनंति आहे कीं आपण नित्यशः सभेंत येण्याची अवश्य कृपा करावी, आणि ज्या बंधु जनांस अल्पस्वल्प विद्या ज्ञान प्राप्त झालें आहे त्यांनीं स्वतःच्या मानापमानाचा कांहीं एक संदेह न बाळगितां आपले सुविचार स्पष्ट रीतीनें सभेस कळवावे त्यायोगें होणारे श्रमाकडे लक्ष न दिल्यानें आपण ज्ञान संपादन करून ज्ञातिचें हित

केल्याचें खरें सार्थक्य होणार आहे. नाहीं पेक्षां केवळ स्वार्थसाधकपणाचा व पोकळ डौलाचा दोष निर्मळ विद्या गुणास लागणार आहे, असें करूं नये असें सविनय कळविणें आहे, पहा ह्या वरील चार ही विषयांचें आह्मीं अज्ञपणानें आज दीन पर्यंत विचार न करितां ते निष्काळजीपणानें इतके दूर झुगारून दिले आहेत कीं, ते आमच्या नजरे समोर कधींच येऊं नयेत. त्यामुळें आह्मांस सांप्रतची शोचनीय स्थिति प्राप्त होऊन केवळ आह्मीं दुसऱ्याचे अनुकरण करूं लागलों आहों. ईश्वर कृपेनें ह्या सदरील न्यूनता काळें करून जसजशा कमी होत जातील तस तसा आमच्या स्थितीचा पालट होऊन मानवी देहाचें खरें कर्तव्य व स्वतंत्रतेचें उत्तम सुख आह्मांस प्राप्त होईल. ह्या विरहित इतर सर्व साधनें व्यर्थ होत.

पुढील सभेंत "सभेपासून होणारे लाभ" या विषयावर व्याख्यान होणार आहे. यास्तव मंडळीनें अशीच तसदी घेऊन हजर असण्याची कृपा करावी.

**सभा.**

ता० २७ ज्यानेवारी सन १८८३

## सभेची व्याख्या व तिजपासून होणारे लाभ.

प्रिय बंधुसमुदाय वेळोवेळीं बराच मोठा जमावा व सर्वांस सभेपासून होणारें खरें हित प्राप्त व्हावें अशी इच्छा धरून हा विषय हातीं घेतला आहे. आजचे प्रसंगीं बराच वेळ खर्ची पडण्याचा संभव आहे त्याजबद्दल तसदीची माफी असावी.

**"सभा."**

या शब्दाची व्याख्या; स, ह्मणजे सहित आणि भा ह्मणजे कांति (योग्यता, पात्रता) तेव्हां कांति सहित ह्मणजे शोभायमान जो जन समूह किंवा मंडळी ती "सभा" मग अर्थातच अशा सभेंत किंवा

जन समुदायांत जे वागण्यास योग्य, ते " सभ्य " आणि सभ्यांचा जो धर्म ती सभ्यता. ह्यावरून सभा ह्मणजे सभ्य व शहाणे लोकांचा जमाव हें उघड आहे.

आतां मनुष्यमात्रांस जशी सुख मिळविण्याची इच्छा असते. तशीच त्यांस सभ्यता मिळविण्याचीही असते. " सभ्य " या शब्दाचा अर्थ असाही होतो कीं ज्याला निती व रीतीभाती चांगल्या प्रकारें समजतात व जो त्याप्रमाणें सदाचरणानें वागतो त्यालाच सभ्य असें ह्मणतात. सभ्यतेचें महत्व फारच मोठें आहे सभ्यतेशिवाय कोणताही मनुष्य " गृहस्थ " ह्या संज्ञेस पात्र होणार नाहीं. सभ्यते शिवाय जन समूह टिकणार नाहीं, सभ्यपणास पात्र झालेल्या मनुष्यावर काळ चक्रामुळें जरी कांहीं संकटें आलीं तरी तो मिळविलेल्या सभ्यतेचा त्याग करीत नाहीं कारण सभ्यतेच्या तोडीचें सुख या भूमंडळीं दुसरें नाहीं तर मग हें निर्विवाद आहे कीं " सभ्यता " ही जन सुखाचा व जनसमूह रक्षणाचा पाया आहे. अशा अनेक गुणसंपन्न लोक समुदायास सभा असें ह्मणतात.

## सभेपासून होणारे लाभ.

कोणतेंही काम करणें झाल्यास प्रथम त्या कामाला मूळ उद्देश बीजरूपी असतो, तो उद्देश जेव्हां सभे पुढें ठेविला जातो तेव्हां त्याच्या परिणामावर नजर देऊन सभाजन त्या विषयीं चांगली चर्चा करितात. शेवटीं त्याचा निकाल सर्वांनुमत्तें जो होतो तो बिनचूक असतो, यामुळें सभेचीं मतें सर्वांस ग्राह्य असतात. जर एखादा मनुष्य कोणत्याही कामा बद्दल स्वतःच विचार करूं लागला तर बहुशः तो त्याचा विचार सदोष असा असतो ह्मणून कोणत्याही महत्वाच्या कामारंभीं सभा भरून त्या कामाचा उद्देश सभेपुढें ठेवून पुढील व्यवस्था सभेच्या मार्फत चालविण्याचा प्रघात पूर्वापार चालत आलेला आहे.

ज्या ज्या देशांत व राष्ट्रांत सभेची योजना नसते त्या देशाची व राष्ट्राची गणना अडाणी व अज्ञान पंथांत केली जाते; कारण लोक

स्थिति सुधारण्यास सभे वांचून दुसरें स्वल्प साधन नाहीं. आणि तेंच जर त्यांजपासून दूर आहे तर स्थितीचा पालट कशानें व्हावा? सभेंत शहाणे लोक एकत्र होऊन ते आपल्या पोक्त व महत्वाच्या विचारानें राष्ट्रांतील सर्व गोष्टींत फेरफार करूं शकतात.

मागील काळच्या इतिहासा वरून, व हल्लींच्या चालू राज्यव्यवस्थेवरून आपल्या वाचनांत व पहाण्यांत येत आहे कीं, मोठ मोठ्या सरकारी व सावकारी कामावरील हुद्देदार व कामदार लोक सभेवांचून नेमले गेले नाहींत व नेमले जात नाहींत, शिवाय सर्व प्रकारचे कायदे कानु सभे शिवाय कायम ठरत नाहींत. फार तर काय पण धर्मकृत्याचीही बात मोठ मोठ्या सभेच्या मंडळ्यां खेरीज प्रसरण पावूं शकत नाहीं या प्रमाणें ज्या ज्या कृत्या करितां चार मतें एकत्र होतात तीं चिरायू होऊन रहातात.

पहा, सभेच्या मार्फत काम चालविण्याचा प्रघात या देशांत पूर्वी मोठा प्रबळ असावा असें प्राचीन हकिकती वरून कळतें; परंतु तोच प्रकार हल्लीं या देशापेक्षां युरप व अमेरिका खंडांतील बहुतेक राष्ट्रांत मोठ्या जारीनें चालत आहे ह्मणूनच तद्देशीय लोक आह्मां ( हिंदु ) पेक्षां अनेक उपयुक्त कला, व्यापार, नावीक शास्त्र व राज्य कारस्थान इत्यादि कामांत पुढें बरेच गेले आहेत. त्यांची बरोबरी करण्यास जरी आह्मांस बराच काळ लागेल, तथापि एक कवी पुढील श्लोकांत ह्मणतो;

अल्पानामपि वस्तूनां संहतिः कार्यसाधिका ॥
तृणैर्गुणत्वमापन्नै र्बध्यन्ते मत्त दंन्तिनः ॥

असें जर आहे तर आपण निराशेनें स्तब्ध बसून आपलें आयुष्य व्यर्थ खर्च करणें हा आमचा वेडेपणा नव्हे काय? असो ; सभेच्या मार्फत जीं कामें होतात तीं किती व कशीं फलदायक होतात या विषयीं जो वर थोडा निर्णय करण्यांत आला आहे त्याजवरून सभेचें महत्व आपल्या लक्षांत सहज येण्याजोगें आहे. अशा व्यवस्थेच्या सभा व त्यांचें अगत्य यांचें अल्प मतीनें आह्मी स्पष्टीकरण केलें आहे.

तथापि आणखी थोडा वेळ सभाजनांकडून मागून घेऊन हेंच व्याख्यान किंचित् लांबवावें असा आमचा हेतु आहे;

सभेंत नित्य गेल्या आल्यानें परस्परांत प्रीतिभाव उत्पन्न होतो. लोकांचे भिन्न भिन्न विचार व त्यांचे खंडण मंडणार्थ झालेलीं भाषणें हीं सहजगत्या समजून ज्ञानवृद्धि होते सौजन्य, नम्रता, हे गुण प्रत्येक व्यक्तीच्या आंगीं वास करीतात चौघांत समयोचित भाषण करण्याची उत्तम सवयी लागून बहुश्रुतपणा प्राप्त होतो. व व्यक्ति मात्राचा समज वाढून आंगीं वक्तृत्व शक्ति येते, सभाधीटपणा व स्नेह उत्तरोत्तर जास्त वाढतो सभेंत अनेक धर्मपंथाचे ही वादविवाद होऊन जगाचें खरें स्वरूप लक्षांत येतें, लोकांतील बऱ्या वाईट रीति भातीचेंही चित्र मनोवृत्ती वर चांगलें रेखिलें जातें त्या योगें ग्राह्याग्राह्य वस्तूंचा विचार सुरू होऊन बुद्धिजडत्व नष्ट होतें. सभेंत जीं जीं व्याख्यानें दिलीं जातात व निबंध वाचले जातात त्यांतील विषय सर्वांस रूचले पाहिजेत सबब लेखकांस व व्याख्यानकारांस त्यांच्या विचार शक्तिप्रमाणें दोन किंवा चार दिवस परिश्रम घेऊन ते जुळवावे लागतात, त्यांचे श्रमाचा लाभ सभाजनांस एका किंवा अर्ध्या तासांत होतो; तेव्हां सभेस जाणें ही किती लाभाची गोष्ट आहे बरें! ज्या गांवांत व शहरांत सार्वजनिक, अथवा जातीची सभा नसते तेथें लोक इतरांशीं काय परंतु स्वजातीशीं सुद्धां अगदीं बेपर्वाईनें व निर्दय पणाणें वागतात, तेणें करून त्यांस परांचें दास्यत्व प्राप्त होतें. यास्तव आपल्या जातींत एक सभा स्थापन करून ती सदोदीत चालविणें विशेष अगत्याचें आहे; याचीं कारणें मागें दिलीं आहेत. बंधुजनहो विचार करून पहा कीं, या मुंबई शहरीं मराठे ( क्षत्रिय ) लोकांची इतकी मोठी संख्या असून त्यांच्या हातून एक ही सार्वजनिक कृत्य न होणें हें त्यांच्या नावास दूषणीय आहे हे दुषण दूर करणें आपलें कर्तव्य होय. सबब आजरोजीं हजर असलेल्या सद्गृहस्थांनीं ह्या भाषणांचा पूर्ण अर्थ ध्यानीं घेऊन, जी ही आपण सभा स्थापन केली आहे ती निरंतर चालण्यास ज्यानीं त्यानीं काया, वाचा मनें करून व शक्त्यनुरूप धनें करून झटावें ह्मणजे आपले हेतु प्रभु दयाळ शेवटास नेईल.

**सूचना.**—पुढील सभेपासून मराठे शब्दाची उत्पत्ति व जाति भेद ह्या विषयांवर कांहीं माहिती देऊन त्या बद्दल एक दोन सभेंत चांगलें निराकरण करावें असा हेतु आहे. **सभा.**

ता० ३ फेब्रुवारी १८८३ ३- ४- ५- ६.

# मराठे शब्दाची उत्पत्ति.

# व.

# जाती भेदादी विषय.

---

कोणत्याही वाक्याचें किंवा शब्दाचें विशेष स्पष्टीकरण करणें झाल्यास त्याचें मूळ स्वरूप ध्यानीं घेतल्याविना त्याचा सिद्धांत करणें अवघड असतें; तसेंच त्याच्या सिद्धते करितां अनेक उदाहरणेंही घ्यावीं लागतात; यास्तव आजचा विषय बराच लक्षांत ठेवण्यासारखा होणार आहे.

जगत्पालकानें ज्यावेळीं सृष्टीची रचना केली त्यावेळींच सर्व प्राणिमात्र व वनस्पत्यादी अनेक वस्तु निर्माण केल्या असाव्या असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. या पृथ्वीचे दोन मुख्य भाग आहेत; त्यांपैकीं, एक पाणी; व दुसरा जमीन; या दोन्ही भागांत विपुळ अशी वनस्पती व त्यांचा उपभोग घेण्याकरितां अगणित प्राणि त्या प्रभु समर्थाचे इच्छा मात्रेंकरून उत्पन्न झाले आहेत. त्या प्राण्यांस त्यांच्या स्थलान्वयें भूचर व जलचर असें ह्मणतात. त्यांपैकीं भूमि प्रदेशीं वागणारे पशु पक्ष्यादि अनेक प्राणी आपापल्या रंगारूपानें आकृतीनें व पृथक पृथक रहाटीनें अगदीं भिन्न आहेत. ह्या सर्वांपेक्षां ईश्वरानें मनुष्यप्राणी बुद्धिबळानें अधिक मांडित केलेला आहे.

हे मनुष्यादि इतर सर्व प्राणी ईश्वरेच्छेनें ज्या ज्या स्थळीं उत्पन्न झाले आहेत, ते सर्व त्यांच्या निरनिराळ्या नांवाच्या योगानें त्यांचें मूळ ठिकाण ( जन्मभूमि ) यांवरून ते सहज ओळखितां येतात.

हे प्राणी पूर्वी अगदीं एकाच पद्धतीचे ह्मणजे रानटी स्थितीचे होते, असें मागील इतिहासावरून सिद्ध होतें. परंतु मनुष्य प्राण्यांमध्यें बुद्धि विशेषत: अधिक असल्यामुळें त्यांची उत्तरोत्तर जास्त सुधारणा होत चालली आहे. आतां मनुष्यांमध्यें बुद्धि हा गुण जरी श्रेष्ठ आहे, तथापि पृथ्वी उत्पत्ति नंतर त्यांचा बराच काळ अज्ञानस्थितींत गेला असावा. तो काळ किती, याचा अजमास करतां येत नाहीं; कारण ईश्वरानें हें जग केव्हां निर्माण केलें याचा निर्णय मनुष्यांच्यानें होणें अगदीं अशक्य आहे. अर्वाचीन काळीं जसजशी मनुष्यांमध्यें सुधारणा होऊन लेखन पद्धत स्थापन होत गेली तसतसें त्यांजकडून काळाचें लेखन होत गेलें; ह्मणून ते कित्येक सात, सहा, पांच, तीन, दोन हजार वर्षे अशीं त्यांच्या धर्म स्थापनेचीं प्रमाणें देऊं शकतात.

इतकाच काय तो काळ भरंवसा ठेवण्यासारखा मिळतो. आणि हाच काळ सुधारणुकेचा पाया होय. त्यापूर्वींचें जगाचें इत्थंभूत स्वरूप जाणण्याचें साधन दुर्लभ आहे.

या सृष्टि सुधारणुके संबंधी असा कोणी तर्क लढूं नये कीं पूर्वी मनुष्याची स्थिति चांगली होती आणि आतां रानटी होत चालली आहे, तर हा समज अपुर्ता होय. कदाचित् असें होऊं शकेल कीं कोणी एखाद्यानें आपल्या सत्तेच्या जोरावर आपस्वार्थीपणानें दुसऱ्याचे वैभवांत विष कालवलें अथवा त्याचे सुधारणुकीचे मार्ग बंद केले तर मात्र त्या मनुष्यास किंवा राष्ट्रास, कनिष्ट स्थिति प्राप्त होऊं शकेल, आणि त्या प्रसंगीं त्यास मागील काळ चांगला होता, स्थिति उत्तम होती असें ह्मणावें लागेल. परंतु असा प्रकार सर्व जगास लागू होत नाहीं, कारण कोठें तरी मनुष्यांची उत्तम सुधारणा चालतच असते आणि अशाच प्रकारें मनुष्यांच्या बुद्धीचा फैलाव होऊन त्यांमध्यें उत्तरोत्तर ज्यास्त सुधारणा होत गेली, नंतर कांहीं काळानें त्यांनीं आपला देश सोडून लांब लांब प्रवास करण्याचें धारिष्ट केलें तेणेंकरून त्यांस आपल्या सारखीं माणसें आणि इतर प्राणी पृथ्वी पृष्टावर आहेत असें समजून आलें; नंतर त्या सर्वांचें एकमेकांशीं दळणवळण चालून विशेष परिचय झाला आणि आपल्या देशांत कोणत्या वस्तूंची उणीव

आहे व ती कशी घालवावी इत्यादि अनेक गोष्टींवर विचार करून त्या वस्तूंचा ते सांठा करूं लागले. त्या कित्येकांपैकीं जे विशेष शोधक व शहाणे निघाले त्यांनीं दुसऱ्यांस आपल्या ताब्यांत राखून त्यांजवर आपलें स्वामित्व वजाविलें. कांहींकांनीं पुढें दुसऱ्यांचें वैभव व देश हरण केले. कित्येक मोठमोठे तत्ववेत्ते निपजले याजबद्दल त्यांचीं कृत्यें अद्याप साक्ष देत आहेत.

या प्रमाणे जे लोक शहाणे व शोधक होऊन गेले त्यांनीं या पृथ्वि गोलाचे मुख्य चार भाग करून त्यांस एशिया, युरोप, अमेरिका व आफ्रिका अशीं नांवें दिलीं आहेत. त्या प्रत्येक भागाचे ( खंडाचे ) लहान मोठे विभाग पाडून त्यांस देश, प्रांत शहरें व खेडेगांव अशीं निरनिराळीं नांवें दिलीं आहेत त्या नांवाच्या योगानें तेथील मुळ रहिवाशी प्रजेस ओळखतां येतें जसें युरोपियन, अमेरिकन, आफ्रिकन, फ्रेंच, पोर्च्युगिज, टर्की, इराणी, चाइनी, इत्यादि. तद्वत एशिया खंडामधील हा जो आपला देश हिंदुस्थान याचेही लहान मोठे विभाग केले गेले आहेत; हिंदुस्थानचा घेर सुमारें पांच लक्ष कोसांचा आहे; याचे मुख्य भाग.

| | |
|---|---|
| बंगालप्रांत | मध्यप्रांत |
| अयोध्याप्रांत. | सौराष्ट्र ( गुजाराथ देश ) |
| पंजाबप्रांत. | महाराष्ट्रदेश, मद्रासप्रांत |

शिवाय लहान मोठे भागही पाडले गेले आहेत या हिंदुस्थान देशाच्या व गांवाच्या सीमा मागील काळीं जे मनु, ध्रुव, उत्तानपाद, वेन, पृथु इत्यादि शूर व पराक्रमी राजे होऊन गेले त्यांच्या कारकीर्दींत बांधल्या गेल्या असाव्या व यांस तीन साडेतीन हजार वर्षे झालीं असावीं असा अजमास होतो. या प्रमाणें ज्या काळीं देशांच्या व गांवांच्या हद्दी ठरल्या त्यावेळीं त्या स्थळांस नांवें झाडांवरून, देवस्थानांवरून, लोकांच्या चाली रीती व स्वाभाव कृतीवरून, कित्येक लोक संखेच्या मानानें व कांहीं गांवांच्या संख्येवरून देण्यांत आलीं होतीं. त्यांतील कित्येक निरनिराळ्या राज्य क्रांतीमुळें बदललीं गेलीं आहेत.

हिंदुस्थानांतील इतर प्रांताच्या किंवा गांवांच्या सीमांत फेरफार झालेला आढळण्यांत येत नाहीं; परंतु दक्षिण व मध्य प्रांतीं दुर्गादेवी दुष्काळा नंतर सन १४२९ सांत कांहीं हद्दी कमजास्त झालेल्या आहेत.

हिंदुस्थानांतील लोक निरनिराळ्या प्रकारच्या भाषा बोलतात.

### दक्षिणेंत.

कानडी, मलबारी, तेलंगी, द्राविडी.

### मध्य हिंदुस्थानांत.

मराठी, गुजराथी, मेवाडी, मारवाडी, कच्छ व सिंदी.

### पूर्वेस.

माळवी, रांगडी, व्रिज, मुलतानी, पंजाबी, काश्मिरी.

### त्याचे पूर्वेस.

हिंदी, बंगाली, उडियी, नेपाळी.

येणे प्रमाणें वीस प्रकारच्या भाषा लोक बोलतात. आणि त्या त्या भाषा बोलणारे लोक वेगळ्या स्वभावाचे, वेगळ्या पोषाखाचे, वेगळ्या रीति भातींचे असल्याकारणानें निवळ वीस जातीच झाल्या आहेत असें ह्मणतां येतें. या सर्वांचा जो धर्म त्यास सामान्यतः हिंदुधर्म असें एकच नांव आहे. त्यांत वैदिक[1], बौद्ध[2], व जैन[3] असे तीन भेद आहेत. ह्या तिन्हीं धर्मांचे पोट भेद ( पंथ ) सुमारें शंभरांवर आहेत त्यांतील कित्येकांची नांवें.

| | | |
|---|---|---|
| नानकपंथ | प्रणामी | बीजमार्गी |
| दादुपंथ | लिंगायत | जंगम |

१ वैदिक धर्म, इ. स. पूर्वि १४ व्या शतकांत व्यासानें स्थापन केला, त्यास हल्लीं ३२८५ वर्षे झालीं.

२ बौध्यधर्म. इ. स. पूर्वि ६ व्या शतकांत शाक्य मुनीनें प्रगट केला त्यास २४८५ वर्षे झालीं.

३ जैनमत्त इ. स. नंतर आठव्या शतकांत चालु झालें. त्यास सुमारें अकराशें वर्षे झालीं.

| | | |
|---|---|---|
| उदासी | सत्संगी | गोसावी * |
| कबीरपंथी | साधु | मलुकदासी |
| सत्नामी | रामदासी | अघोरी |
| रामस्नेही | शैव | वैष्णव |
| जोगी | वाममार्गी | पाशुपत |
| नाथपंथी | कौल | अवधूत मार्गी |

भक्तिमार्गी, हरव्यासी. इत्यादि मतें वैदिक व जैनधर्मापासून उत्पन्नझालीं आहेत व यांशिवाय आणखी पुष्कळ आहेत; या खेरीज बौद्ध धर्माचे ८४ पंथ आहेत.

सुमारें बाराशें वर्षांपासून हिंदुस्थानचें सार्वभौमित्व प्राप्त व्हावें या-आशेनें पठाण, मोंगल, शिक व इंग्लिश या लोकांनीं मोठीच धुमाळी उडविल्यामुळें हा देश अगदीं निकृष्ट स्थितीस येऊन पोंहोंचला आहे त्यांत आलीकडे परसत्तेचा तर बराच पगडा बसून हिंदु धर्म व सत्ता दुरावली.

येथपर्यंत सामान्यतः हिंदुस्थान व इतर भूमि प्रदेश यांविषयीं हकी-कत झाली. आतां आपणास आपल्या महाराष्ट्र देशासंबंधी कांहीं सांगितलें पाहिजे.

महाराष्ट्र देशाची सीमा विंध्याद्रि पर्वता समांतर जी एक पर्वताची ओळ आहे ती उत्तर सिमा; गोंव्यापासून बेदर शहरावरून वर्धा नदी वरील चांद शहरापर्यंत दक्षिण सीमा, पूर्वेस वर्धा नदी असून पश्चिमेस समुद्र आहे. यांतील प्रदेशाचे गोंडवण,वऱ्हाड, खानदेश, पुणें प्रांत, वाईदेश मिरज प्रांत, कोंकण, बालेघाट येणें प्रमाणें आठ मुख्य भाग आहेत. येथील लोक कानडी, तैलंगी, हिंदवी, गुजराथी व मराठी अशा पांच प्रकारच्या भाषा बोलतात आणि यांतील लोक बहुतांशीं वैदिक धर्मानें

* हा पंथ इ. स. पूर्वी ८०० वर्षां पासून चालु आहे आणि तो जरीं वैदिक धर्मापासून उत्पन्न झाला आहे तरी त्यांतील लोक आपणांस इतर धर्मापासून पृथक मानितात परंतु यास पंथ किंवा धर्म बिलकूल म्हणतां येत नाहीं, इतकी त्यांत अव्यवस्था आहे.

गुंतले आहेत व थोडेसे जैन मताचे आहेत; या दोन्ही मतान्वयें बरेच पंथही सुरू आहेत. जसें लिंगायत, कबीर पंथ, रामदास पंथ, नाथपंथी, जंगम, शैव, वैष्णव, भक्तिमार्गी, जोगी, गोसावी, साधु, अघोरी, वाममार्गी इत्यादि; ह्या सर्व मतांचे लोक एकास एक तुच्छ मानितात आणि आपला पंथ खरा ह्मणून वितंड वाद घालीत बसतात, परंतु असे वाद घालण्यापासून इतकाच अर्थ निघतो कीं, देव ( जगत्पालक ) तर कोणास मिळत नाहींच पण परस्परांत विरुद्ध मतें वाढून सृष्टिसुखास मुकावें लागतें; असो.

इतर राष्ट्रीय लोकांस जशीं देश संबंधाचीं नांवें चालतात तद्वत हिंदुस्थानांतील लोकांसही देश संबंधाचीं; बंगाली, पंजाबी, गुजराथी, ( रजपूत्स्थानाच्या योगानें ) रजपूत, तैलंगु, मद्रासी आणि मराठे अशीं नावें आहेत. परंतु हीं नावें तेथील मूळ रहिवाशी लोकांच्या स्वभाव कृतिवरून देशांस दिलीं आहेत हें वर सांगितलेंच आहे. याशेवटच्या नांवाचा अपभ्रंश देशसंबंधानें महाराष्ट्र असा झाला आहे. महाराष्ट्र या शब्दाची उत्पत्ति अशी आहे कीं, महा=मोठें अथवा फार व रट्ठे=राकट, उग्र व कठोर मनाचे लोक यावरून मऱ्हाट देश असें नांव येथील लोकांवरून ( मराठे लोकांवरून ) पडलें असून त्या नांवाचा पुढें असा अर्थ बनविला गेला कीं महा ह्मणजे मोठें व राष्ट्र ह्मणजे प्रजा किंवा लोकसंख्या यावरून महाराष्ट्र देश.

आतां, हीं दोन्ही कारणें संयुक्तच ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. कारण या महाराष्ट्र देशांतील मराठे लोकांची वस्ती व लोक संख्या हिंदुस्थानांतील इतर देशांपेक्षां आद्यकाळाची व फारच मोठी आहे आणि येथील मराठे लोकही मोठे पाणीदार, धीट व करडे स्वभावाचे होते व अद्यापिही आहेत. यांवरून महाराष्ट्रीय मूळ लोकांस ( जरीं त्यांमध्यें अनेक जातिभेद झाले आहेत तरी ) मराठे ह्मणणें वाऊगें होणार नाहीं; पण तसें न होतां मराठे हें नांव एकाच क्षत्रिय यातिकडे राहिलें. बाकीच्या इतर लोकांनीं आपापल्या धंद्यांचीं नावें जातिवाचक शब्दाचे ठिकाणीं उपयोगास आणून संतोष मानिला. परंतु ज्या लोकांच्या स्वाधीन आपल्या भूमीचें स्वामित्व राहिलें व ज्यांनीं आपल्या स्वभूमी

रक्षणार्थ मोठ्या अभिमानानें आपलें जीवित संकटांत घातलें त्यांजकडेसच मराठा हा शब्द जातिवाचक रूपानें अद्याप कायम राहिला आहे. आणि खरोखर ही एक आनंदाची गोष्ट समजली पाहिजे कीं, मराठे हे जातिवाचक नांव मागील लोकांनीं चालू ठेविल्यामुळे फारच उत्तम झालें; कारण या नांवानें आह्मी या जन्मभूमीचे आहोत असें आह्मांस कळून येण्यास बरेंच पुष्टिकरण झालें.

सुमारें अडिचशें वर्षांमागें, मराठे व महमदी धर्माचे लोक यांमध्यें मोठे संग्राम झाले, त्या कित्येक प्रसंगीं ते लोक मराठ्यांस द्वेशानें "मरहट्ट" असें ह्मणत असत, ह्मणजे त्यांचा भावार्थ असा कीं, हे मराठे लोक "मरते है लेकीन हटते नहीं" आणि ह्याही नांवांत आमचे कित्येक लोक थोरपणा मानतात पण ती त्यांची चूक आहे कारण अशा नांवानें ते महमदी लोक मराठ्यांची कुचेष्टा करीत होते असें स्पष्ट दिसतें.

येथें अनेक देशाचे व धर्माचे लोक येऊन जरी त्यांनीं देशसंबंधी व धर्मसंबंधीं बरीच ढवळाढवळ केली तथापि गांव संबंधी व्यवस्था पूर्वींचीच कायम राहून तीस थोडी जोडही झाली.

पूर्वीं गांवची व्यवस्था तेथील वतनदारां मार्फत चालत होती; त्यांमध्यें दोन वर्ग होते.

| १ | २ |
|---|---|
| सरकार निसबत पाटील, कुळकर्णी, महार, रामोशी. | रयत निसबत. देशमुख, मजरेचा खोत, नाटकर, चौघुला, महाजन, शेटे, आवटी, डांगे, पथकी. |

या व्यवस्थे सारखेच पूर्वीं प्रत्येक गांवीं बारा बलुते होते. त्यांपैकीं अकरावा बलुता उपाध्या जोशी व मुल्लाणा बारावा हे दोन फार अलीकडे गांवसंबंधी व्यवस्थेंत घुसडले गेले. ह्याखेरीज गांवचे लोक दुसऱ्या अनेक कारागिरी लोकांचा समुच्चय करीत असत. फार जुन्या काळापासून गांवची व्यवस्था वतनदार मार्फत चालत होती व अद्यापही कांहीं ठिकाणीं चालू आहेच. परंतु हल्लीं तर बहुतेकांचे हक्क बुडत

चालले आहेत. याचें कारण राज्यसत्ताधीश निरनिराळे धर्मांचे व जातींचे व देशांचे होत गेले ह्मणून असा प्रकार घडत चालला.

हा हिंदुस्थान देश पूर्वीपासून सुपिक, चांगल्या व्यवस्थेचा व स्वराज्यसत्तेचा होता याविषयीं शंकाच नको. कारण तसें नसतें तर पर राष्ट्रीय लोकांस येथें येण्याची इच्छा होणें अगदीं दुरापस्त होतें आणि ह्या परराष्ट्रीय लोकांनीं हा देश बळकाविण्याकरितां कसकसे प्रयत्न केले हें इतिहासरूपानें जगविख्यात आहे. ह्या आशाबद्ध लोकांनीं वेळोंवेळीं आपली सत्ता स्थापून येथील मूळ राष्ट्रीय लोकांस मन मानेल तशीं दूषणें देऊन त्यांस रानटी व हलक्या स्थितीचे करून सोडिलें. त्या द्वेषविजानें मुळच्या लोकांची संख्याही बरीच कमी झाली व राहिले ते अन्नास मोताद झाले असेंही ह्मणतां येतें. असो, या हकीकती बद्दल लिहूं लागलें तर एक मोठा ग्रंथ होईल ह्मणून हा विषय येथें संपवून दुसऱ्या प्रकरणाकडे वळूं.

आरंभीं आह्मीं दर्शित केलेंच आहे कीं, मनुष्यांस जसजशी ज्या ज्या वस्तूंची गरज लागत गेली तसतशा त्या त्या वस्तु तयार करण्यास जो लहान मोठा जमाव पुढें सरला, त्यामुळें निरनिराळ्या मंडळ्या स्थापन झाल्या. पुढें त्या कारागिरीचा जसा एकामागून एक वाढ होत गेला तसा हा कारागिरी वृक्ष विस्तिर्णतेस पावला. आतां ह्या कारागिरीच्या निरनिराळ्या मंडळ्या होणें हें साहजीक आहे आणि देशांत कारागिरी जास्त वाढणें हें एक देशाचें सुदैवच होय, आणि कारागिरीपासून मनुष्यांच्या बुद्धीचा विकाशितपणाही लक्षांत येण्याचीं प्रत्ययें आहेत. प्रत्येक मनुष्यास आपल्या गर्जा आपल्या स्वतांच्याच श्रमानें पूर्ण करून घेतां येत नाहींत ह्मणून एकानें एका वस्तुविषयीं व दुसऱ्यानें दुसऱ्या वस्तु विषयीं श्रम घेणें जरूर आहे; अशा श्रमावांचून सृष्टिक्रमं मुळींच चालावयाचा नाहीं असें उघड दिसतें.

परंतु ह्या सर्व कारागीर लोकांनीं आपण सर्वत्र एक राष्ट्रीय बांधव आहों असें समजून परस्परांशीं स्नेहानें व प्रीतिनें वागणें मोठें सुखावह आहे परंतु अशा प्रकारचा समज या देशांतून ( हिंदुस्थान ) नष्ट झाला ह्यामुळें या लोकांमधील प्रीतिभाव लय पावून देशोन्नतीचीं कामें था-

ण्यास लागलीं. त्यांतून या आमच्या महाराष्ट्र देशांत तर जातीभेदांची कमाल होऊन गेली. काय सांगावें! प्रत्येक समुदायास (जातीस) आपण इतरांपेक्षां श्रेष्ठ असावें अशी वांछा होऊन ज्यांनीं त्यांनीं आपल्या जाती पुष्टयर्थ एक एक दोन दोन ग्रंथ तयार करून चाली रीतींतही थोडासा फेर बदल केला. आणि आपली अमुक देवापासून उत्पत्ति, व आपल्या वंशास अमुक पुरुषाचें गोत्र इत्यादि बरींच समर्पक उदाहरणें जोडून त्यांनीं आपापल्या जातीस बरीच बळकटी आणिली. इतक्यानें तरी त्यांची तृप्ति झाली काय? तिही नाहीं; त्या प्रत्येक जातीचे दोन दोन तीन तीन असे पोटभेद झाले आणि पुढें त्या पोटभेदांत आणखी निरनिराळे तट उत्पन्न झाले आहेत; अशा ह्या भिन्नत्वामुळें एका जातीचे लोक दुसऱ्यांची परवा करीतनासे झाल्यामुळें परस्परांत श्रेष्टत्वासंबंधीं कज्जे कफावती होऊन उत्तरोत्तर द्वेषबीज वृद्धिंगत होतच गेलें. पहा बरें वास्तविक न्याय रीतीनें पाहिलें असतां जर एकास दुसरा नीच ह्मणूं लागेल तर तें त्यास कितपत रूचणार आहे? आणि नीचत्वाची आवड कोणास कशी असेल.

जर करितां धंद्याच्या योगानें लोक नीच होऊं शकतात तर ते नीच धंदे उत्तम नरदेहरूपी मानवी प्राण्यांनीं कां ह्मणून करावेत. व अशा धंद्यांच्या योगानें नीचत्व पावलेल्या लोकांनीं तयार केलेल्या वस्तु आपणास वरिष्ट ह्मणविणारांस कशा पवित्र व्हाव्यात. आणि त्या वस्तूंच्या योगानें त्यांचा उदरनिर्वाह, देहाच्छादन व देह रक्षणादिप्रकार कां उत्तम रीतीनें व्हावेत. असे सहज प्रश्न निघून राष्ट्रीय लोकांचीं मनें विकल्पभरीत होतात आणि तोच प्रकार कित्येक जातीच्या लोकांच्या मनांत येऊन ते आपला हेवा करणारांचा कंटाळा करूं लागतात; अशा अनेक कारणांनीं एकाचें साहाय्य दुसऱ्यास मिळणें मुष्कील झालें फार तर काय पण अशा व्यर्थ अभिमानानें त्यांच्या मधील स्वदेश बांधवांची अज्जी ओळख बुजून गेली.

ह्या वरील सर्व कारणांवरून विचारांतीं असें कळतें कीं, जितक्या ह्मणून जाति झाल्या तितके या राष्ट्राचे तुकडे तुकडे झाले व द्वेष वाढले. तेव्हां मग अशा अल्प विचारांचे लोक बनल्यावर देशोन्न-

तीचीं कामें, शांतता व सुख हीं कशानें वाढावीं ? ह्मणून अशा ह्या जातीभेदांचें व धर्म पंथांचे या भूमीवर एक अरिष्टच कोसळलें आहे असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

परराष्ट्रां विषयीं पहा त्यांच्यांत हा गोंधळ नसल्यामुळें उत्तरोत्तर धंद्यांची संख्या विशेष वाढत चालली आहे व ते सर्व आपण एक राष्ट्रीय समजून एकमेकांचे उन्नतीस मनोभावें झटत आहेत, अशा त्यांच्या एकोप्यामुळें त्या लोकांकडे अथवा त्यांच्या देशांकडे कोणीही वक्र दृष्टी करूं शकत आहे काय ? नाहीं तर, आमच्या हिंदु लोकांची ऐट, आह्मी पवित्र, आमची भाषापवित्र, आमचा देशपवित्र, आमची विद्या तीही श्रेष्ठ व आमचा धर्म तोही वरिष्ठ, पण आमचें कर्तव्य कोणतें ह्मणाल तर एकानें दुसऱ्यास नीच ह्मणावें आणि आपलें भूमी स्वामीत्व तिसऱ्याचे ( पराचे ) गळ्यांत घालावें आणि आपण त्याचें दास्यत्व पतकरावें हेंच कीं नाहीं ? असो. येथें जीं जातीभेद होण्याचीं कारणें दिलीं आहेत, त्यांविषयीं खरा समज लोकांनीं एका बाजूस झुगारून देऊन त्या ऐवजीं विलक्षण अवडंबरें रचिलीं आहेत त्यांजबद्दल जर कोणी एखादा शहाणा मनुष्य विचार करूं लागला तर त्यास ह्या जातिभेदांस बळकटी आणून लोक ( राष्ट्र ) समुदायास छिन्न भिन्न करूं इच्छिणारांचा स्वार्थ काय असावा हें सहज कळतें.

आतां आपल्या महाराष्ट्र देशांत किती प्रकारच्या जाति चालू आहेत हें पाहूं गेलें असतां मुख्य जाति भेद ७४ आढळतात शिवाय त्या प्रत्येकाचे पोट भेद व तट यांचें अनुमान करतां येत नाहीं. हे जे वर मुख्य भेद सांगितले त्यांचीं नांवें येथें देणें इष्ट होतें पण त्या सर्व जाति एकास एक नीच मानितात, यास्तव खालीं वर नांवांसाठीं त्यांची मनें अस्वस्थ होण्याचा विशेष संभव आहे ह्मणून त्या खटपटींत न पडतां फक्त मुख्य भेदांची संख्या देऊन हा विषय पुढें चालू केला आहे.

---

१ हिंदु लोकांत सुमारें चार हजार जाति आहेत असा एक शोधक एका पुस्तकांत लिहितो.

ह्या सदरील जातिपैकीं चवदा जातीचे लोक आपल्या देशबंधूंच्या मत्सरी स्वभावामुळें ते निराश्रित पणानें रानेंवनें वसवून दिवस क्रमण करीत आहेत आणि आपला कोणी कैवारी उत्पन्न होतो कीं काय याची इच्छा करीत आहेत, काय करतील बिचारे! जसें एखादें नांदतें घर फुटून चौंघे चार दिशेस जातात आणि साह्य कर्ता कोणी नसल्यामुळें विपत्ति भोगीतात तद्वत् ह्या सर्वांची स्थिती होऊन राहिली आहे; असो.

ह्या ७४ वरील जाति येथील स्वराष्ट्रीय असून त्यांची परस्पर कशी ओळख बुजाली असेल ती असो आह्मांस तर याचें मोठें आश्चर्य वाटतें.

अहो आपण जे अभिमानानें एकमेकांस तुच्छ मानितों हें काय ह्मणून बरें ? श्रेष्ठपणा मिरवून तरी हातीं काय आलें ? कांहीं नाहीं, इतकें मात्र झालें कीं, परस्पर प्रीति नष्ट होऊन सर्वत्र उदास वृत्तीनें नादूं लागलों; तेणें करून देशाभिमान प्रत्येकाकडून दूर होऊन परतंत्रता प्राप्त झाली, अरेरे केवढें अरिष्ट हें! ह्याचा कोणी निःपक्षपाती गृहस्थ विचार करील तर त्यास हें सबळराष्ट्र असें दुर्बळ होण्याचें खरें व योग्य कारण दिसून त्यास अशा जाति भेदाचा तिरस्कार आल्याविना कधींच राहणार नाहीं.

पहा बरें! आपण सर्व एकाच धर्म पंथाचे अनुकरणीय असून आपली सर्वांची भाषाही एकच, कुळदैवतें सर्वांचीं सारखींच आहेत, आडनांवें ( उपनांवें ) तीं ही बहुतेक एक सारखींच आहेत, सर्वांची रहाटी चालीरीति एकाच प्रकारच्या आहेत आणि शिवाय सर्वांच्या देहाकृति व शक्ति प्रमाणही एक सारखेंच आहे; सर्वत्र एकाच देखाव्याचे व रंगारूपाचे असून बुद्धि शक्तीचाही ओघ एक सारखाच आहे. तेव्हां ह्या सर्व प्रमाणां पेक्षां ऐक्य राष्ट्रीयपणाचीं दुसरीं कोणतीं लक्षणें हवींत. पहा बरें आपण स्वदेश बंधु असतां एकास दुसऱ्यानें हलक्या जातीचा ह्मणावें आणि त्याची चेष्टा करावी, शिवाय कोणास कोणाचें पाणी चालत नाहीं, कोणास अन्न चालत नाहीं, कोणाचा स्पर्श सहन होत नाहीं, कोणाच्या सावलीचा विटाळ होतो, कोणास कोणाचा शब्द सर्पदंशा प्रमाणें भासतो, एखादा कोणी गुणी निपज-

ल्यास तो शत्रुवत् दिसतो. अशी तऱ्हा सर्वोपरी चालली आहे; बरें सार्वजानिक कामें तरी एका जुटीनें होतात काय ? तर तसेंहीं घडत नाहीं, अशा वेपर्वाईमुळें धर्माचीं खरीं तत्वें कोणास ही कळेनाशीं झालीं, तस्मात विद्या ती ही दुर्मिळ झाली, मग काय ! वेबंदी राष्ट्र बनलेंच आणि याच कारणानें राष्ट्रांतील एक तृतियांश लोकांस पर धर्म स्विकारण्यास भाग पडलें ह्मणजें कित्येक महमदी धर्मास अनुसरले, व कांहीं ख्रिस्ताचे दास झाले आणि तेच उलटे हाड वैऱ्या प्रमाणें स्वदेश बंधूंस छळूं लागले..

याजवरून असें सिद्ध करतां येतें कीं, ज्यानीं जाति भेदांचें कडें या हिंदुस्थानांत स्थापन केलें व ज्यांनीं त्यास उत्तरोत्तर बळकटी आणिली ते स्वार्थसाधक व कुत्सित स्वभावाचे असावेत असें विचारी मनुष्याच्यानें ह्मटल्याशिवाय रहावणार नाहीं.

अतएव कोणी ह्या प्रकाराची चुकी काढून सद्विचारानें वागण्यास सांगूं लागला तर त्यास लोक मोठ्या उत्कंठतेनें व हेकटपणानें ( पूर्ता विचार न करीतां ) दूषण देण्यांत सदां सर्वदां तत्पर असतात. कोणी ह्मणावें हा उद्योगी मनुष्य आतां सर्व महमदी करावयास पहात आहे, दुसऱ्यानें ह्मणावें छ, हो ! हे पाद्रिलोकांचें गुरुत्व, तिसऱ्यानें ह्मणावें तुह्मीं कांहीं ह्मणा, पण मला वाटतें कीं हे सर्व चाळे होण्यास कली महाराजाचा प्रताप, दुसरें कांहीं नाहीं. शिवाय कित्येक उदास वृत्तीनें असेंही ह्मणतात कीं, अहो ! विचार कस्चा करतां ? घरोघर शहाणपणाचे स्तंभच उभे राहिले आहेत, ईश्वर जर कृपा करता तर मी एकदांचा या यांच्या सुधारणुकेपासून बचावलों गेलों असतों. या प्रमाणें मार्मिक व बाह्य स्वरूपाचे उद्गार जेव्हां जेव्हां इतर लोकांचे कानीं पडतात तेव्हां मग काय ? "आधींच उल्हास त्यांत फाल्गुनमास" अशा ह्या हेकट मनुष्यांच्या उलट प्रयत्नांमुळें स्वदेशीय बंधु व स्वयात बंधु यांस आपल्या ऐक्यरूपाची माहिती कशी व्हावी ? या मासल्याची लोकस्थिति झाल्यावर एखाद्या शहाण्या मनुष्याच्या विचारास उत्तेजन येणार कोठून ? मग अर्थातच परांचा पगडा आह्मांवर बसण्यास मार्गच झाला. आमचे लोक पराच्या लाघवी स्तुतीस व गोड

शब्दांस भुलून आपापल्या हानीस कारण झाले आहेत. केवढी आश्चर्याची व दुःखाची गोष्ट बरें!

आजच्या आमच्या ह्या प्रतिपादनाचा असा अर्थ कोणी करूं नये कीं, हे आह्मांस जातिभेद मोडून टाकण्यास सांगत आहेत. तर तसें नाहीं. अहो धंद्याच्या संबंधानें जाति ह्या चालणारच, पण कोणत्या ही धंद्यांतील मनुष्य जर गुणी आहे तर त्यास चांगला मानवून त्या गुणा बद्दल आपण मात्सर्य सोडून त्यास उत्तेजन देणें व प्रसंगानुसार परस्परांस साह्य करणें, हीच काय ती राष्ट्रीय प्रीति व्यक्तिमात्राच्या ठायीं असणें जरूर आहे आणि ती उणीवता दूर व्हावी आणि आपण या देशाची मूळ प्रजा असून आपणास रात्रंदिवस काबाडकष्ट करून ही उदर निर्वाहाचीं विघ्नें कां येत आहेत, इत्यादि गोष्टींवर सर्वांनीं विचार करावा एतदर्थ ही सर्व खटपट आहे. अशा प्रकारचा सद्विचार बंधुजनांच्या मनीं उद्भवल्यास अत्युत्तमच होणार आहे. आणि असें करण्यास ईश्वर आपणा सर्वांस सद्बुद्धि देवो, इतकें ह्मणून हा आजचा विषय संपवितों.

ता० १० माहे फेब्रुवारी सन १८८३ — सभा ३–४–५–६

## ऐक्य.

ऐक्य या शब्दाची व्याख्या विशेष गहन नसून अर्थही स्वल्प व साधा आणि चटदिशीं लक्षांत येण्या जोगा आहे; ऐक्यतेची उपयुक्तता सर्व प्राणीमात्रांस अति महत्वाची आहे.

जगत् पालकानें मनुष्यांदि सर्व प्राण्यांस त्यांचें जीवित्व रक्षिण्यास्तव कांहीं समंजसपणाच्या देणग्या दिल्या आहेत. त्यांपैकीं ऐक्यता हें एक साधन आहे. आतां याचा खरा व जास्त उपयोग सर्व प्राणी मात्रांत मनुष्य जसा घेऊं शकेल तसा इतर कोणताही प्राणी घेऊं शकणार नाहीं. कराण मनुष्यांत बुद्धिचापल्यता अधिक आहे. यास्तव मानवी प्राणी इतर सर्व साधनांनीं जरीं मंडित असला तथापि त्याचे आंगीं

ऐक्यतेनें वागण्याविषयीं विचार जों पर्यंत आले नाहींत, तोपर्यंत त्यास जगांतील खरें सुख अनुभवतां येणार नाहीं, हें निर्विवाद आहे. आतां जरी पृथ्वींतील सर्व मनुष्यें एकाच मार्गानें व विचारानें वागण्याचा संभव नाहीं तरी पण प्रत्येक देशांतील व धर्मातील मनुष्यें ऐक्यतेनें वागण्याचा विशेष संभव आहे. ह्मणून ज्या प्राणीमात्रांत, ऐक्यता नसून तिजबद्दलचे विचारही त्यांचे मनीं आलेले नसतात, असे जे लोक त्यांच्या व्यवहारांत बहुतकरून संकटें येत असतात. असो या विषयाचे संबंधानें जगाशींच केवळ गांठ घालून उपयोगी नाहीं परंतु आपल्या कर्तव्याप्रमाणें तुर्तकाळीं हिंदु लोकांत व त्यांतून विशेषतः आमचे मराठे लोकांत ऐक्यतेचें अस्तित्व किती आहे, याचा विचार अगोदर केला पाहिजे.

या उत्तम ईश्वरी देणगीची आमचे बंधु जनांत कोणत्या प्रकारची अव्यवस्था आहे या बद्दलचें चित्र त्यांचे मनोवृत्तीवर रेखलें गेलें ह्मणजे ते सहज त्याचा विचार करीतील.

प्रिय बंधु हो! आपण ऐक्यते पासून किती अंतरलों आहों याजबद्दल आपणास विचार कर्तव्य ह्मणून वर दर्शित केलें आहे. करितां हल्लीं आपलें वर्तन परस्परांशीं कसें आहे त्याचें स्पष्टीकरण करण्याकरितां कांहीं उदाहरणें आपणांस घेतलीं पाहिजेत, त्याविना विषयाचें मंडन बरोबर रीतीनें होऊं शकणार नाहीं. सबब तीं येथें देण्यांत येत आहेत.

अहा हा! आज काल आमची स्थिति कशी शोचनीय बनून राहिली आहे! कधीं तरीं आपले लोकांस, चार चौघे एकत्र बसून व्यवहार संबंधी, अथवा जन हिताविषयीं, किंवा इतर कोणत्याही उपयुक्त विषयांवर विचारशीलपणें भाषण करण्याचा रिवाज आहे काय? मुळींच नाहीं. कोणी एखादा आपला स्वयातीय आपल्या उद्योगबळानें कांहींसा उदयास आला कीं त्याची संगत करून त्यानें मिळविलेलें शहाणपण व लक्ष्मी हीं ज्या उपायानें त्यास साध्य झालीं असतील ते सद्गुण आपणांमध्यें येण्याचा प्रयत्न न करितां उलट लोक त्या सद्गृहस्थाचा मत्सर करूं लागतात; आणि त्यांची अशी इच्छा असते कीं, तो गृहस्थ आपणा सारखा कधीं होईल, अशी

इच्छा मनीं धरून रात्रंदिवस त्याच्या उलट प्रयत्न करीत असतात, असो. वरें कदाचित् सुदैवेंकरून जो कोणी थोड्या बहुत महत्वास चढलेला असतो त्याचा तरी स्वयातीकडे ओढा कोठें आहे. त्यास जसजसे ऐश्वर्य येत जातें तसतसा तो इतरांपासून अलग रहाण्याची इच्छा करीत असतो, इतकेंच नाहीं पण तो आपल्या ज्ञातबंधूंस, आपल्या वैभवाच्या धुंदींत दरीद्री, हलकट, व कम कुळाचे असे शब्दोच्चार काढण्यास कधींही मागें पुढें पहात नाहीं; मग अर्थांतच अशा वैभवशिल मनुष्याकडून इतरांस साह्य मिळण्याची आशा करणें नकोच. कोणी शहाणा ( विद्या भूषित ) मनुष्य तरी एखादी चांगली युक्ति काढीत किंवा सदुपदेश करीत आहे काय? तेंही आढळत नाहीं तेव्हां अशा मानानें आपणांस एकमेकांची प्रीति कोणत्या उपायानें प्राप्त व्हावी! जर शहाणेंच असें दुर्लक्ष करूं लागले तर अज्ञानी लोकांस दूषण देणें काय कामाचें? पहा इतर यातींत जे सुखी व शहाणे गृहस्थ आहेत, ते आपल्या गरीब व अज्ञ लोकांस फारच उपयोगी पडत असतात तेणेंकरून त्यांचें वैभव द्विगुणित वाढतें, व अजरामर कीर्ति मागें रहाते.

दुसरें—कोणे एखादे प्रसंगीं आमचे लोक जेव्हां जेव्हां जात गोताच्या कामीं जमत असतात त्या वेळचें त्यांचें वर्तन केवळ आश्चर्यकारक व दुःखप्रद असें भासतें. कारण परस्परांत सभ्यतेस युक्त असे शब्द वापरण्याची त्यांस संवय नाहीं. अशा जात गोताच्या कामीं जेव्हां एखादी मंडळी जमूं लागते, तेव्हां त्या स्थळीं कित्येक परस्परांच्या कानांशीं लागून अथवा उघड धीटपणानेंही परस्परांविषयीं कुत्सित भाव चालत असतो. तो असाः—कोणी ह्मणावें कांहो हा अमुक मनुष्य माझ्या शेजारींसा येऊन बसला आहे, आमची योग्यता किती थोर! आणि यानें आमची बरोबरी कांहून करावी? इत्यादि अनेक प्रकारचीं दूषणें एक मेकांस देऊन देऊन थकल्या नंतर एकदाचे गोतपतीचें काम सुरू करितात; पण नंतर कोण कोणास काय विचारील व काय सांगेल याचा नियमच नाहीं. अशा गडबडींत कोणी एखादा माहितगार मनुष्य एखादि चांगली युक्ति सांगूं लागला तर त्याचे शब्द

ऐकले न ऐकलेसे करून आपलाच हेकटपणा चालवीत असतात. या प्रमाणें कांहीसे वादविवाद करून एखादा ठोकळ मत्तावर पंच नामा तयार करितात. आणि शेवटीं त्या पंचनाम्यावर खालीं वर सह्या झाल्या असतां अभिमानानें एखादे वेळीं मारामारीचाही प्रसंग आणितात. शेवटीं ते सर्व एकमेकांचे रोषानें उठून चालते होतात. पुढें त्या रागानें ते परस्परांस पाण्यांत पाहूं लागतात. असो हा प्रकार येथेंच सोडून दुसरी एक विलक्षण पद्धत आह्मां लोकांत चालु असलेली येथें दिली आहे.

आह्मां लोकांचे वतनी गांव ( जेथें वडील नांदले ते ) आहेत, त्या गांवात एकाच कुळातील, शें पन्नास पर्यंत लोक वस्ति करीत असतात, ते आपसांत अनेक वेळां, अल्प स्वल्प कांहीं तरी कारण उपस्थित करून आपला कुळाजींत थोरपणा, द्रव्य, व शेवटीं लहान मोठा जमिनीचा तुकडा या सर्वांस अंतरतात, व कधीं कधीं त्यांचा या कामीं प्राणांतही होतो. कांहीं ठिकाणीं, दोन, चार, पांच, सहा, कुळांचे लोक मिळून एक किंवा दोन गांव असतात' त्या गांवांतील लोकस्थिति तर अति दुःखप्रद असते, ती कशीयाचा विचार तुह्मींच करूं शकाल कारण जेथें एका कुळाचे लोक असतात तेथें कशी तऱ्हा असते तें नुकतेंच सांगीतलें आहे तेव्हां जेथें अनेक घराणीं रहातात तेथें स्वस्थता कोणत्या प्रकारानें असणार! जितकीं कुळें ज्यास्त तितका द्वेष अधिकाधिक वाढत असतो आणि ते परस्पर कलह करून जितकीं कुळें नाहींशीं होतील तितका प्रयत्न करीत असतात, अशा कोत्या विचाराची सदां मशाल हातीं घेऊन, ते एकमेकांची घरेंदारें गुरेंढोरें, माणसें यांचा नाश करून परस्परांस वतन भ्रष्ट करून टाकतात, अरेरे! केवढा अविचारीपणाहा!! त्यांच्या अंतःकरणांत कसा बरें दयेचा अंश नाहीं. व त्यांच्या कृत्याचा त्यांस कसा बरें पश्चात्ताप होत नाहीं. अहो विचारकशाचा? गांवाची गोष्ट तर ठेवा एका बाजूस, पण लहान मोठी जीं कुटुंबें ( आई, बाप, भाऊ, बहिणी ) इत्यादि असतात, त्यांतील माणसें एकमेकाशीं किती विरुद्धमतानें वागतात. कधीं कधीं असा प्रसंग येत असतो कीं त्यांत बाप लेंकांचें व बंधुबंधूचें नातें आहे किंवा

नींहीं याची दुसऱ्यास भ्रांतिच पडते, ही त्यांची कृति विशेष आश्चर्याची व अति खेदकारक नव्हे काय? असो या विषयीं आपण कधीं तरी पुढें विचार करूं. आपल्या लोकांची प्रवास स्थिती तरी योग्य विचाराची असते काय, हें पाहूं.

कोणी एखादा मनुष्य जर आपल्या लाचार दशेस्तव आपला गांव किंवा देश सोडून कोठें चाकरी धंदा मिळावा या आशेनें प्रवासास गेला आणि ज्या स्थळीं त्याचें मुकाम होतें, तेथें आपल्या यातिपैकीं कोणी असल्यास, त्याच्याशीं स्नेह मिळवून उद्योगाचा यत्न त्यानें चालविला असतां त्यास कित्येक आपल्या ज्ञातबंधूकडून उडवाउडवी-चींच उत्तरें मिळतात. पण असा कोणी विचार करित नाहीं, कीं, तो मनुष्य आपल्या गांवचा, किंवा जातीचा, अथवा कुळाचा आहे, कदाचित त्या गरजू मनुष्यानें लगट करून जारी प्रयत्न केला तथापि त्याचा धिःकारच आंपल्या लोकांकडून होत असतो. असा प्रकाश स्वयातींचा पडल्यावर तो बिचारा अन्य यातीच्या आश्रयानें एखादा धंदा मिळवितो तरीं पण त्याच्याशीं ते आपले लोक विरुद्ध रीतीनें वागण्यांस कमी करीत नाहींत, पुढें सुदैवानें तो मनुष्य उदयास आला किंवा येत असला तर, त्याची द्वेष बुद्धीनें ते नुकसानी करीत असतात. कित्येक अल्प समजुतीनें ज्या ज्या स्थळीं असतात तेथें तेथें "आपण पोटा साठीं प्रवासास आलों आहों" याचा विचार न करितां एकमेकांच्या हट्टानें कित्येक काळ पर्यंत परस्पर द्वेषानें वागत असतात, या प्रकारें सर्वथैव विकल्प भरून उरलेलाच नजरेस येतो.

अहो! ह्या व्यवहारिक व प्रापंचिक गोष्टी तर राहूंच द्या; पण धर्मसंबंधी बाबतींत तरी कोठें ऐक्य आहे? याजबद्दल पुढील हकीकतीवरून कळेल. आह्मांपैकीं कित्येकांच्या गांवीं, एक किंवा दोन धर्मस्थानें (देवळें) असतात, तेथें प्रसंगानुसार सर्व गांवकरी जमतात, तेव्हां त्या ठिकाणीं सभ्यपणाचें वर्तन असणें किती जरूरीचें आहे बरें? असें असतांही ते सर्व जमल्यावर, कोणी देवाचा प्रसाद कमी मिळाल्याबद्दल व कांहींकांचा प्रथम मानाबद्दल इत्यादि अनेक कारणांवरून

वाद चालत असतो. असाच प्रकार किर्तनवेळीं, पुराण श्रवण कर्तेसमयीं, देवांदिकांच्या पूजार्चा कर्तेवेळीं किंवा हरएक बाबतींत वाद आणि भांडण याशिवाय दुसरी गोष्टच नाहीं.

सारांश ऐक्यता आह्मांत किती आहे व प्रेम कशा प्रकारचें आहे, हें कळण्याकरितां हीं वरील उदाहरणें देणें भाग पडलें, यांत आह्मीं कोणाची निंदा करितों असें समजूं नये. फक्त आह्मांत अव्यवस्था कशी आहे याचा सारांश घेतल्यावांचून ते गौण मार्ग कसे दूर व्हावेत, करितां आमचे शहाणे व दूरदर्शी लोक याचा विचार करून एकीनें, व्यवस्थितपणानें व प्रेमबुद्धीनें वागतील तर थोरपणास काय लांब जावें लागेल ?

पूर्वीं आपणांमध्यें ऐक्य होतें ह्मणून महान् महान् संकटें दूर करतां आलीं आणि हल्लीं तेंच राष्ट्र अशा कलहानें दुसऱ्याचें सेवक बनलें. हर हर किती लाजिरवाणी गोष्ट आहे.

अहो आपण किंचित लक्ष पुरविलें असतां असें कळून येईल कीं आह्मां मानवी प्राण्यांस द्वैत मार्गानें चालणें शोभतें काय ? पहा यःकश्चित् पशुपक्षादि प्राणीं आपसांत ऐक्य कसें रक्षण करितात, हें समजण्यास्तव क्षांहीं दाखले देतों. हरण, गव इत्यादि श्वापदांचे मोटमोठाले कळप एकत्र चरतानां व फिरतानां आपण हमेश पहातों, तसेंच राघु, लहावे व रानटी चिमण्या इत्यादि पक्षी शिवाय मधमाशा पहा कशा कळपानें एकत्र असतात, मुंगी हा प्राणी कितीसा लहान आहे पण त्यांच्यांत ऐक्यतेचें भांडार कसें मजबूद आहे याचा विचार केला असतां आश्चर्य वाटण्याजोगें आहे, असेंच अनेक इतर प्राणीं मोठमोठ्या जुटीनें आयुष्यक्रमण करितानां आपल्या दृष्टीस पडतात, ह्मणून ते प्राणी आपलें जीवित्व महान संकटापासूनही रक्षण करण्यास शक्तिमान् होतात, कारण अनेकांच्या बळाची जी थोरवी आहे तिचें वर्णनही करतां येत नाहीं; यास आणखी एक उदाहरण घेणे इष्ट दिसतें तें असें कीं, नारळी वृक्षाच्या फळापासून जो काथ्या उत्पन्न होतो त्याचे तंतु एकत्र केले ह्मणजे त्याच्या लहान रशा व मोठीं बळकट दोरखंडें होऊन त्या योगानें हवातेवढा भारी, वजनशीर व

बळकट पदार्थ व प्राणी उचलीतां, आकर्षण करितां येतो; गरिबांचे झोपडीवर आच्छादनार्थ जें गवत असतें तें एकमेकांच्या आश्रयानें पाण्यासारखाही पातळ पदार्थ बिलकूल आंत येऊं देत नाहीं तेव्हां तृणामधें एकत्रतेपासून इतकी शक्ति येते, ह्मणून अर्थातच एकोप्याचें बळ कोणत्या प्रकारचें आहे हें तुमच्या लक्षांत येईलच. बरें जे पशु पक्षादि प्राणी एकोप्यानें वागतात त्यांस तसें करण्यास, कोणी उपदेशक असतो काय ? असें जर नाहीं तर अर्थातच ही त्यांची उपजत तैलबुद्धि होय, असें ह्मणणें रास्त आहे, याचा विचार केला ह्मणजे असें कळेल कीं, ह्या इतर प्राण्यांत एकीचा इतका ओघ आहे तर त्या मानानें मानवी प्राण्यांत, त्यांपेक्षां शतपट जास्त असणें उचित आहे आणि तसें असण्यास ईश्वरी योजनाही असावी असा सिद्धांत होतो; कारण मनुष्य हा प्राणी ईश्वरानें या भूतलावर, सर्व प्राणी मात्रांत अत्युत्तम व सर्व वस्तूंचा उपभोग घेण्या साठीं निर्माण केला आहे. मग या प्राण्यांची ( मनुष्यांची ) बुद्धि व शक्ति विशेष आहे यांत संशय कोणता ? करितां त्या ईश्वरी देणगीचा ज्या काळीं आपण गैर उपयोग करितों त्या काळीं आपणांस विपत्ति काळ प्राप्त होऊन नाशाप्रत पावतों व पुढेंही तोच प्रकार चालला असतां अधिकाधिक विशेष विपत्ति स्थिति प्राप्त होणार आहे याजकडे सुज्ञ जनांनीं फार लक्ष दिलें पाहिजे.

आतां सृष्टितलावर मनुष्यें कोठें कशीं वागतात याचा विचार पाहूं. या पृथ्वींत ज्या ज्या लोकांनीं "एकी" या विषयाचा विचार करून तदनुसार आपलें वर्तन ठेविलें आहे त्यांचे सर्वस्वीं कल्याण होऊन ते जगमान्य झाले आहेत, जसें अमेरिकन, फ्रेंच, इंग्लिश, चायनीज, आरबीयन इत्यादि राष्ट्रें शाबास त्यांच्या बुद्धीची नाहीं तर आह्मीं धिःकार असो आमच्या जिवीत्वास. आमच्या हिंदुलोकांत एका जातीचे लोक मात्र आपल्या देश बंधूंस तर नाहींच पण स्वयातीस कांहींसे ओळखतात. पण उपयोग काय ? "दर्योमे खस खस" या ह्मणीप्रमाणें आहे. शिवाय त्यांमध्यें स्वार्थसाधकपणा विशेष आहे, असो. इतर राष्ट्रें पहा ऐक्यतेच्या बळावर, सर्व गोष्टींत अजिंक्य झालीं आहेत.

सृष्टींत "धर्म" ह्मणून एक बाब, शहाणे लोकांनीं आपापल्या दे-

शांत सोयी प्रमाणें अक्कल खर्च करून चालू केली आहे. त्यांचा मूळ हेतु असा कीं कोणत्या तरीं मिषानें लोकांत एकी असावी ह्मणजे त्या त्या देशांतील व धर्मांतील लोक आपण सर्व एकाच कुळाचे व-जिव्हाळ्याचें आहों असें समजून परस्पर प्रितीनें वागतील अशा हेतूनें मागील दूरदर्शी शहाणे लोकांनीं विचार करून त्यांत ईश्वरुपासना मार्ग, व जनसमुदायाची एकी अशा गोष्टींची सांगड घातली आहे पण त्या योजना ज्या देशांत कायम राहिल्या आहेत तेथील लोक सुखाचा अनुभव घेऊन परांपासून आपला व आपल्या देशांचा बचाव करीत आहेत आणि जेथें तो पाया ढासळला आहे त्यांची स्थिती आम्हां सारखी होऊन दास्यत्व प्राप्त झालें आहे.

शेवटीं आमचे ज्ञांतवर्गांस अशी विनंती आहे कीं कोणी कोणाची निंदा, मत्सर न करितां मोठ्या प्रीतीनें परोपकार बुद्धीनें, व एकमेकांचा कळवळा बाळगून आपलें ऐक्य रक्षण करा; द्वेषानें कधींही कोणास सुख प्राप्त झालें नाहीं व होणारही नाहीं, हा अमुक गांवचा, अमुक कुळाचा, तो देशस्थ, हा कोकणस्थ, मी कुळानें व आचारानें मंडित; हे सर्व प्रकार द्वेषाचें व नाशाचें मूळ होत. परांगता प्राप्त झाली तथापि डोळे झांकच प्रिय वाटत आहे; हें केवढें आश्चर्य होय. द्वेषबीज समूळ नाहींसें करा, आणि आपले देशबंधु व ज्ञातबंधू यांची ओळख करून घ्या; आपणांस एकमेकांच्या साह्यानें अनंत लाभ होतील. केवळ व्यर्थ हट्ट व दुराग्रह धरून "कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ" अशा दूषणांचा वांटा न घेतां ऐक्यता रूप श्रेष्ठ वस्तूचाच संग्रह करा ह्मणजे जगत्पति आपलें हित करील, इतकें ह्मणून हा निबंध येथें पुरा करितों.

आणखी सभाजनांस अशी विनंती आहे कीं, या विषयावर पुढें मंडळीकडून बरेच निबंध व व्याख्यानें व्हावीं कीं जेणेंकरून बंधुवर्गांस आपलें खरें कर्तव्य कळेल व ते आपणांस या सभे संबंधी विशेष साह्य देतील आणि आपल्या बंधूवर्गांच्या हिताचा लाभ करून घेतील.

## श्लोक

( स्रग्धरा. )

एके ज्ञानेंचि होतें सकळ हित जनीं हे धरोनी स्वचित्तीं ॥
संपादायास लागा अणुहि न धरितां मानसीं भ्रांति खंती ॥
जाणोनीया प्रसंगा स्थिर करुनि मनीं योग्य वागा विचारें ॥
विश्वेशाच्या कृपेनें मग सहज तुह्मां प्राप्त होईल सारें ॥

सभा.

७—८—९

ता. १० माहे मार्च सन १८८३

## विद्या.

विद्या ह्या शब्दाची व्याख्या:—(विद् ह्मणजे जाणणें) लेखन व वाचन कलेचें ज्ञान संपादन करणें, व त्या योगें जे लिहिलेले अनेक विषयांवरील ग्रंथ व पुस्तकें त्यांतील माहिती करून घेणें ह्मणजे ज्ञान वाढविणें, ह्मणून विद्या ह्मणजे ज्ञान असें ह्मटलें आहे, आणि जे अशी माहिती मिळवून ज्ञान वाढवितात त्यांस विद्वान् असें ह्मणतात.

ज्ञानाची उपयुक्तता सर्व मानवी प्राण्यांस फारच अगत्याची व जरूरीची आहे. विद्येवांचून मनुष्य केवळ अंध आहे. अशा अंध प्राण्यांस संसाररूप भवसागरांतून तरून जाण्यास विद्या ज्ञान हेंच एक उत्तम साधन आहे. आणि अंधास जसें काठीचें साह्य लागतें, तद्वत् विद्या उपयोगी पडते, ह्मणून या साधना वांचून इतर दुसरीं साधनें कष्टसाध्य होत. विद्येवांचून मनुष्यास आपलें खरें कर्तव्य समजत नाहीं, बुद्धि प्रसरण पावूं शकत नाहीं आणि या खेरीज देश, व लोक स्थितीचा पालट होऊं शकत नाहीं; याजकरितां आई बापानें, अथवा पालकानें आपल्या मुलां बाळास विद्याधन प्राप्त करून देण्याविषयीं अवश्य लक्ष पुरविलें पाहीजे. जरी करितां मनुष्यानें पुष्कळ द्रव्य संपादन केलें, मान मान्यता मिळविली, सत्ता, भूमि संपादन करून ठेविली तथापि

तीं सर्व एका ज्ञानाचे अभावीं विपत्तीस व पश्चात्तापास कारणीभूत होतात, पण विद्याधनास चोराचें भय नसतें. बरें जरी कोणास कितीही वैभव प्राप्त झालें तरी त्यास विद्वानाचे बुद्धिबळावांचून तें रक्षण करितां येत नाहीं.

## श्लोक.

**सर्व द्रव्येषु विद्यैव द्रव्य माहुरनुत्तमं ॥**
**अहार्यत्वा दनर्घ्यत्वा दक्षयत्वाच्च सर्वदा ॥ १ ॥**

**अर्थ**—सर्व द्रव्यांत विद्या हें श्रेष्ठ धन आहे कारण ती कोणांस ही हरण करतां येत नसून अमौल्य व सर्वदां नाशरहित आहे.

अशा ह्या अविनाशी धनाची कोणास बरें आवड होणार नाहीं? सर्वांस त्याची इच्छा असावयाचीच. असें असतां हिंदूंतील तीन चतुर्थांश लोक कशानें बरें मागें पडले असावे! असा एक प्रश्न उद्भवतो, परंतु त्याची चर्चा करीत बसण्यापेक्षां, तूर्त प्रसंगीं, आपणामध्यें विद्येची कितपत उणीव आहे याचा विचार करावा हें बरें.

आह्मां मध्यें लोक संख्येच्या मानानें सहस्रांत पांच उत्तम लेखक मिळणें मोठें दुरापस्त आहे, असें असूनही आमच्या लोकांस ती संपादन करून घेण्याची अभिरुचीही अगदीं कमी आहे, याचें कारण मोठ्या चौकसपणानें विचार करून पहातां, असें नजरेस येतें कीं, कांहीं तरी प्रतिबंधक होत असावा; मग तो लेखी ह्मणा अगर अंगप्रयत्नांचा ह्मणा. पण त्या प्रतिबंधाचा अम्मल लोकांच्या विचारावर मोठा प्रबळ होऊन राहिला आहे. हल्लींचे दयाळू सरकार, लोकांनीं शहाणें व्हावें ह्मणून जरी प्रयत्न करीत आहे तरी पण आह्मांस त्याचा लाभ होणें दुर्लभ झालें, जो तो आपल्या वडिलांचें उदाहरण पुढें करून आपल्या वंशजांस अज्ञान अंधःकारांत ठेवूं पहात आहे, ही केवढी शोचनीय गोष्ट समजावयाची! आणि कित्येक लोक तर आपला लंगडेपणा छपविण्यास असेंही ह्मणत असतात कीं, "आह्मी क्षत्रिय लोक आह्मास विद्या कशास हवी, फक्त दांडपट्टा, छरीपट्टा, हें कसब शिकलें ह्मणजे जन्मांचें सार्थक

झालें. " वः खासा समज व उत्तम युक्ति, या सारखा समंजसपणा इतर कोणत्याही जातींत अथवा स्व, पर राष्ट्रांत मोठ्या दुर्घट प्रयत्नांतींही मिळणें कठीण, तेव्हां अशा समंजसपणाचें बाळकडूं आमचे लोकांस कसें कोणी पाजिलें असेल तें असो. यद्यपि आमचे लोक जर किंचित् विचार करतील तर ह्या दुर्लौकिकापासून खचितच मुक्त होतील. अहो क्षत्रियांस तर काय,पण सर्वांसच विद्येचा लाभ होणें अवश्य आहे; जसें नासिकाविणे सौंदर्य निष्फळ; तद्वत मनुष्य देह ज्ञानाविना व्यर्थ समजावा. पहा एखादा मनुष्य मोठा धष्टपुष्ट असून त्याची उंचीही बरीच असली व रूपेंकरून सुंदरही असला तरीं तो नरदेह काय कामाचा, ! त्यास एखादा दुर्बळ, पण शहाणामनुष्यही फसवूं शकतो. विद्याहीनाचें जीवित्व केवळ ताड वृक्षा प्रमाणें आहे तो वृक्ष काय थोडा उंच व सरळ नसतो ? तसेंच हत्ती पहा किती उंच, पुष्ट शक्तिवान जनावर आहे तें ? त्याचें तोल केलें असतां मनुष्य प्राण्यापेक्षां तें सहस्रपट जास्त भरतें. असें असतां त्यास एक ल्हानसा मानवी प्राणी हवें तिकडे फिरवूं शकतो. तात्पर्य स्थूल देह ज्ञानाविणें ओझें वाहाण्याचेच उपयोगाचा आहे.

## श्लोक

**रूपयौवन संपन्ना विशालकुलसंभवाः ॥**
**विद्याहीना न शोभंते निर्गंधा इव किंशुकाः ॥**

**अर्थ**—रूपानें आणि तारूण्यानें संपन्न आहेत तसेंच श्रेष्ठ कुलोत्पन्नानें तथापि ते जर विद्याहीन आहेत तर पुष्पादिसंपत्तियुक्त सुगंध रहित पळसाचे वृक्षासारखे शोभत नाहींत.

याजकरितां मुलांचे आईबाप जशी, त्यांस उत्तम अन्न खाऊं घालून त्यांच्या देह पोषणांची काळजी बाळगितात त्याचप्रकारें त्या आपल्या प्रीय बालकाचें ज्ञान वाढविणें ( विद्या ज्ञान देणें ) हें त्यांचें मुख्य कर्तव्य होय. आणि तसें त्यांजकडून न झालें असतां ते त्या मुलाचे कसे हितकर्ते आहेत व तो मुलगा विद्वज्जनांत कसा गणला जातो हें पुढील श्लोकावरून कळेल.

## श्लोक

**मातावैरी पिताशत्रुर्बालोयेन नपाठयते ॥**
**सभामध्यें न शोभंते हंसमध्यें बकोयथा ॥**

**अर्थ**—ज्या मातापितरांनीं आपले पुत्र पढविले नाहींत ती माता वैरिण आणि तो बाप शत्रू, हंसा मध्यें जसे बक शोभत नाहींत तशीं तीं अविद्वान मुलें पुढें विद्वानांच्या सभेंत मान पावत नाहींत.

ह्या वरील वचनाचा विचार करून जर आमचे बंधुवर्ग विद्याज्ञान संपादण्याचा यत्न करूं लागतील तर खचितच त्यांनीं आपल्या मानवी देहाचें खरें सार्थक केलें असें होणार आहे. या नरदेहास विद्येवांचून दुसरें भूषणच नाहीं, उंच उंच किंमतीचीं वस्त्रे व अलंकार यांहीं देह शोभविणें हें केवळ वेषधारी नटा प्रमाणें होय, कारण.

## श्लोक

**विद्यानामनरस्यरूपमधिकं, प्रच्छन्नगुप्तंधनं ॥**
**विद्याभोगकरीयशःसुखकरी, विद्यागुरूणांगुरुः ॥**
**विद्याबंधुजनेविदेशगमने, विद्यापरादेवता ॥**
**विद्याराज सुपुजितानतुधनं, विद्याविहीनः पशुः ॥**

**अर्थ**—विद्या हेंच पुरुषाचें उत्तम रूप असून आच्छादन केलेलें अंतर धन आहे आणि ही विद्या, भोग, यश व सुख देणारे असून हीच सकल श्रेष्ठ वस्तूंत श्रेष्ठ आहे. तसेंच बंधू जनांत व परदेशांत गमन केलें असतां तेथें ही विद्याच रक्षक असल्यानें विद्याच सर्वांची परम दैवत असून तिची उत्तम रीतीनें पूजा राजा करितो तशी धनाची करीत नाहीं तस्मात् विद्याहीन जो पुरुष तो पशु जाणावा. तात्पर्य विद्या हें नराचें भूषण होय.

प्राचीन काळीं क्षत्रियादि इतर यातीचे लोक मोठ मोठाले विद्वान व देशाभिमानीं होऊन गेले त्यांचीं उदाहरणें पुराणांतरीं काय थोडीं आहेत? पण त्यांचा लक्षपूर्वक विचार करतो कोण? व हल्लींचें इतिहां-

सांतही मराठे ( क्षत्रिय ) यांचीं वर्णनें जीं थोडीं बहूत आहेत तीं तरी कोणास वाचण्याची किंवा ऐकण्याची इच्छा आहे काय?

आह्मांस लिहिण्यास मोठें दुःख वाटतें कीं, मराठे लोक पूर्वापार क्षात्र धर्मांत निपूण असून त्यांच्या विषयीं लेख कां बरें उपलब्ध नसावेत? मोंगलबादशाई अम्मल या देशावर बसण्या पूर्वीं, अथवा त्या वेळीं मराठे लोकांकडून कांहींच का हाल चाल झाली नसेल? फक्त श्री० छत्रपती शिवाजी महाराजांच्या वेळे पासूनच मराठे लोक जागे झाले होते काय? छे! अशी गोष्ट मुळींच प्रमाण धरतां येत नाहीं, कारण मूळ राष्ट्रीय लोक मोठे धीट, लढाऊ व राज्यकारस्थानीं होतें, परंतु त्यांचा पाडाव परदेशीय कपटी लोकांनीं केल्या मुळें सत्ता हरण झाली तेव्हां अर्थात् त्यांच्या विषयीं हकीकत कोण लिहितो! महमदी किंवा इतर लोकांस काय गरज एका ग्रांटडफ या नांवाच्या विद्वान युरोपियनानें कांहीं प्रयत्न करून फार अलीकडील मराठ्यांची हकीकत मिळवून सन १८६३ त एक पुस्तक तयार केलें होतें पण त्या पुस्तकास "मराठ्यांचा इतिहास" असें नांव देतांना त्यांची आपसांत बरीच चुरसा चुरस झाली होती; असें करण्यामध्यें त्यांचा काय हेतु असावा हें आमच्या सूज्ञ बांधवांस विचाराअंति कळेल. हा मजकूर येथें घेण्याचें कारण इतकेंच कीं जर आह्मांस विद्येचें खरें तत्व माहित असतें तर आह्मांस आमच्या गुणी पूर्वजांचे इतिहास ठेवण्याचा अभिमान असता. पण आह्मांत विद्येची गोडी जशी असावी तशी नसल्या मुळें सर्वच प्रकारची हानि होऊन गेली आणि परीणामही विपरित झाले व होत आहेत. अशा अल्प समजाची लोक स्थिति झाल्या कारणानें ते ज्या ज्या वेळीं आपलीं धर्म शास्त्रें या समजानें, शास्त्रें, पुराणें, स्तोत्रें व दुसरे कित्येक ग्रंथ ऐकतात व त्याच प्रमाणें अनेक स्वरांवर रचलेल्या कविता त्यांच्या कानीं पडतात व आणखी दुसरीं कित्येक कल्पित पुस्तकें त्यांच्या पहाण्यांत येतात, तेव्हां ते अगदीं चकित होऊन देहभान विसरून जातात.

आणि शेवटीं असें ह्मणतात कीं, हे अशा पद्धतीचे ग्रंथ मनुष्याच्यानें मुळींच व्हावयाचे नाहींत. पहा, त्यांतील, शब्द किती रसाळ!

भाषा किती सुंदर! आणि कवितांची रचना कशी उत्तम! हे सर्व ग्रंथ आणि हीं पुस्तकें ईश्वरानें स्वतःच येऊन रचिलीं असावीं, अशा नाना तऱ्हेच्या कल्पना करीत बसतात, आणि कित्येक तर त्यांतील कांहीं विषय घेऊन परस्पर कांहीं तास पर्यंत रिकामा वितंड वाद करीत असतात. मग अशा कल्पना करीत बसण्यापासून त्यांस काय लाभ होत असेल तो असो; परंतु असले पोकळ वाद घालीत बसण्या पेक्षां तसे ग्रंथ किंवा पुस्तकें स्वतः तयार करण्याचीं साधनें मिळविणें याजकडे कोणीच लक्ष देत नाहीं ही केवढी आश्चर्याची गोष्ट आहे बरें! या पुढें तरी आमचे लोक विद्येकडे विशेष लक्ष पुरवून कांहीं प्रयत्न करतील; कारण.

**श्लोक.**

**कामधेनुगुणा विद्या अकाले फलदायिनी ॥**
**प्रवासे मातृ सदृशी विद्या गुप्तं धनं स्मृतं ॥**

**अर्थ**—विद्येचे गूण कामधेनु सारखे आहेत विद्या अकस्मात् फलातें देते प्रवासीं विद्या, माते सारखें पोषण करिते तस्मात् विद्या गुप्त धन होय.

मनुष्यानें निदान पक्षीं स्वभाषेचें तरी पुर्ते ज्ञान संपादन केलें पाहिजे, त्या नंतर इतर भाषेचें ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न ज्याचे त्याचे सामर्थ्यानुरूप घडणारच आहे कोणत्याही देशांतील व राष्ट्रांतील मनुष्यास प्रथमतः स्वभाषेचें ज्ञान असणें विशेष महत्वाचें आहे आणि त्या एका भाषेंत त्याचें पूर्ण लक्ष पोंहचले ह्मणजे दुसरी कोणतीही भाषा शिकण्याचे श्रम अति स्वल्प पडतात.

असो आमचे लोक अति कष्टानें मोठ मोठे हुद्दे व द्रव्य संपादन करितात, पण त्यांच्या पदरीं असणारे अल्प वेतनी नौकर त्यास विद्येच्या उणिवतेमुळें केवळ तृणा समान गणून ते आपल्या भोळ्या धन्यास त्याच्या वैभवा पासून त्वरित भ्रष्ट करितात ह्मणून धनी जर विद्या भूषित असला तर आपल्या नौकराच्या आंगीं काय गुणदोष आहेत हें त्यास सहजांशी कळून येणार आहे आणि तेणें करून उभयपक्षीं हि-

१ केवळ लिहितां वाचतां आलें म्हणजे विद्या प्राप्त झाली असें समजूं नये.

तच होण्याचा संभव आहे याजकरितां प्रत्येक व्यक्तिमात्रास विद्या असणें फार जरूरीचें आहे.

विद्या ज्ञानाची प्राप्ति करून घेण्यास बाळपण हाच उत्तम काळ आहे, एकदां ती वेळ मागें पडून मनुष्य प्रापंचिक कामांत गुंतला कीं, हें कार्य असाध्य झालेंच. याज करितां मुलांचे पालकांनीं आपल्या मुलांचें कल्याण व्हावें व आपण त्यांच्या ऋणांतून मुक्त व्हावें अशी इच्छा धरून त्यांचें ज्ञान वाढविण्याकडे बहुत लक्ष द्यावें; जरी करितां मनुष्य प्रौढ वयांत ज्यास्त तीव्र होण्याचा संभव असतो तरी पण वयस्क मनुष्य एक वेळ संसारजाळ्यांत पडला कीं, त्याचें चित्त भ्रमण करीत असतें; व विषयाकडे त्याचा विशेष ओढा असल्यामुळें पाठ शक्तिस धक्का बसून विद्या ज्ञानाचे श्रम व्यर्थ होतात कदाचित् कोणी महाप्रयत्न केला तर कांहीं साध्य ही होईल; पण पूर्वींच्या ( बाळपणाच्या ) काळाचीं बरोबरी त्याच्यानें करवणार नाहीं. असें असतांही लोक त्याचा विचार न करितां पुढचें कृत्य आदीं उरकून आपणास धन्य मानितात; तें असें कीं, मुलगा सहा किंवा सात वर्षांचा झाला कीं, लगेच कांहीं ऋण काढून त्याचें लग्न करून टाकतात, पण ही त्यांची मोठी चूक आहे. तीच रक्कम जर त्यांनीं मुलाचे लग्ना ऐवजीं त्याचें ज्ञान वाढविण्याकडे खर्च केली तर मुलगा शहाणा होऊन शतपट ज्यास्त हित करील व मोठा लौकिक मिळवील लग्न करणें हें आईबापाचें किंवा पालकाचें मुख्य कर्तव्य नव्हे, तर विद्या ज्ञान देणें हेंच मुख्य कर्तव्य होय. अल्प वयांत लग्न केल्यानें काय परिणाम होतात, याचा खुलासा एखादे वेळीं पुढें करूं. विद्या धन मुलास दिलें ह्मणजे त्या बळावर तो काय करणार नाहीं! पाहिजे तें करूं शकेल, मग माझे मुलास, धन पाहिजे, वस्त्रालंकार पाहिजेत, सुख पाहिजे, इत्यादि गोष्टींचा विचार त्याचे पालकानें करण्याची विशेष जरूरी नाहीं.

श्लोक.

सद्विद्या यदि का चिंता वराकोदर पूरणे ॥
शुकोप्यशनमाप्नोति हरे राम इति ब्रुवन् ॥

**अर्थ**— जर उत्तम विद्या असली तर क्षुद्र उदर भरण्याची चिंता काय आहे; कारण हरे राम बोलणारा राघुहि भोजन पावतो.

तात्पर्य:— कोणातिहि एखादि चांगली विद्या असली ह्मणजे निर्वाह होण्यास कांहीं कठिण पडत नाहीं. विद्ये शिवाय ही निर्वाह होतो, परंतु मग पशु प्रमाणें काबाडकष्ट अथवा गुलामगिरी करावी लागते.

याजकरितां आपणांस विद्या शिकण्याचे कितीही श्रम पडले तरी ते सहन करून ज्ञान संपादिलें पाहिजे. पहा आपले मराठे लोक जर विद्या ज्ञानानें मंडित असते, तर मराठ्यांचा पुन: एक वेळ झालेला उत्कर्ष अल्प काळांत लय पावला असता काय? व आपणास अशी दशा प्राप्त होऊन, चरणोदक घेण्याचा अति नीच प्रसंग आला असता काय? कदापि ही गोष्ट घडली नसती. एक ज्ञानाविना सर्व खटपट व्यर्थ गेलीं व जीवित्वही निष्फळ झालें.

सर्व सृष्टींत इंग्लिश, फ्रेंच, अमेरिकन इत्यादि परराष्ट्रीय लोक राजकीय कामीं व उपयुक्त कला कौशल्यादि अनेक शोधांत अग्रगण्य होऊन राहिले आहेत, व त्यां पैकीं कित्येक आपणावर सत्ता बजाऊन गेले व बजावीत आहेत. याचें कारण पहातां ऐक्यता, व विद्याज्ञान यां शिवाय तिसरें कांहीं नाहीं. आपण ह्मणाल आह्मीं गरीब लोक आहों, आमचे जवळ द्रव्यांश अगदींच कमी आहे तेव्हां अशा विपत्तींत विद्या संपादन आह्मांकडून होते कशी? तर बंधु जनहो! आपणास अशा विवंचनेंत पडण्यास कांहीं कारण नाहीं; आपली लोक संख्या फारच मोठी आहे, तेव्हां सर्वांनीं आपल्या उत्पन्नांतून थोड थोडा द्रव्यांश एकत्र करून एखादा फंड जमा केला तर त्याजपासून विद्येची उणीव दूर होऊन अनेक दुसरे उत्तम गुण संपादन करण्यास कोणत्याच प्रकारची अडचण पडणार नाहीं; पहा बरें हल्लीं आपले लोक अनेक प्रकारच्या दुर्व्यसनांत गुंग होऊन किती पैसा व्यर्थ खर्च करीत आहेत. या शिवाय एखाद्या मानापानाच्या संबंधानें व त्यांतील अल्प लाभाच्या आशेनें लक्षावधि रुपये व्यर्थ खर्चून स्वत: धुळीस मिळत चालले आहेत तेव्हां अशा उथळपट्टिच्या व अविचारीपणानें खर्च होत असलेल्या रकमा जर ज्ञान संपादनार्थ खर्च

केल्या तर त्यांचा उत्तम व्यय होईल कीं नाहीं? आणि त्या ज्ञानाच्या योगानें आपली स्थिति उत्तरोत्तर जास्त सुधारली जाईल कीं नाहीं? हल्लीं ज्या लोकांचें आपण दास्यत्व करीत आहों, ते इतक्या उर्जित दशेस एकाच काळीं आलेले नाहींत त्यांस या स्थितींत येण्यास बराच काळ लागलेला आहे; आणि त्याच प्रमाणें आपण प्रयत्न केले असतां कांहीं वर्षांनीं सुखोत्पत्तीस पोंहोंचूं. बंधूहो तुमच्या अशा प्रयत्नांस कोणी आड येऊन तुह्मांस असेंही ह्मणतील कीं महाराज आपण दैवशाली लोक अहां करितां आपणांस ही खटपट कशास पाहिजे तुह्मीं थोर, राजेलोक, सरदारबहादर, तेव्हां आपणांस काय कमी आहे तुमचा काळ ह्मटला ह्मणजे खाण्यापिण्यांत व ऐष आरामांत जावा, यासारखें दुसरें सुखच नाहीं, उगाच तुह्मांस व तुमचे मुलांस विद्या शिकण्यांचा त्रास काय उपयोगाचा? अथवा कोणी असेंही धिःकारयुक्त भाषणोद्गार काढतील कीं, तुह्मीं जड बुद्धीचे नीच व्यवस्थेचे, तुमच्या कुळांतील लोकांनीं पूर्वीं विद्येविषयीं कधीं प्रयत्न केला होता काय? आणि हल्लींच तुह्मांस हे द्वाड चाळे कसे लागले? तुमचा धंदा अमूक आणि तोच तुह्मीं करून रहावें ह्मणजे झालें. अशीं नाना तऱ्हेचीं जाळीं तुह्मांपुढें उभीं करतील परंतु त्या त्यांच्या बोलांवर व लेखांवर कदापि भरवसा न ठेवितां, ते कुत्सित व आपस्वार्थी लोक आहेत असें समजून आपल्या सुप्रयत्नास मागें घेऊंनये कारण अशा उलट उपदेशकांचा हेतु असा असतो कीं, इतर लोक विद्यारहित असले ह्मणजे आपणास त्यांजवर स्वामित्व मिळविण्यास ठीक पडेल, परंतु आपणास त्याचा विचार करून पाहिलें पाहिजे कीं, ज्या जगत्पतीनें मनुष्यासारखा उत्तम प्राणी या जगांत उत्पन्न केला आहे त्या प्राण्यास आपलें खरें कर्तव्य समजण्यांस व त्याच्या अवश्यकतेचे गुणसंपादन करितां यावेत ह्मणून त्यानें बुद्धि सामर्थ्य देऊन ठेविलें आहे. त्याचा त्याने योग्य उपयोग करून सुखानें व आनंदानें आपलें आयुष्य क्रमण करावें. एतद्विषयींचीं उदाहरणें तुमच्या डोळ्यांपुढें हजारों आहेत. पहा मनुष्य कोणत्याही देशांतील असो अगर कोणत्याही धर्मांतील अथवा पंथातील असो; गरीब असो किंवा द्रव्यवान असो त्यास श्रमानें

विद्या ज्ञान प्राप्त होतें आणि त्या विद्या दीपानें त्याच्या स्थितीचा फेरफार होऊन तो जगमान्यतेस पात्र होत असतो. आतां शेवटीं एक श्लोक घेऊन हें व्याख्यान पुरें करण्यांत येत आहे.

श्लोक.

**विद्वान्प्रशस्यतेलोके विद्वान्सर्वत्रगौरवम् ॥**
**विद्यया लभतेसर्वं विद्या सर्वत्र पूज्यते ॥**

**अर्थ**—विद्वान सर्व लोकांमध्यें प्रशंसतेतें पावतो आणि जनांत महत्वही पावतो; विद्येनें ज्या दुर्लभ वस्तु त्या सुलभ होतात. तस्मात् विद्याच सर्वत्र पूज्य होय तात्पर्य विद्वानासारखी दुसऱ्याची प्रतिष्ठा होत नाहीं.

ह्या आमच्या श्रमाचा सूज्ञ बंधु जनांनीं विचारकरून ज्ञान संपादन करून घ्यावें कीं ज्यायोगें आपण आपलें कुळ साजरें केल्याचें फळ प्राप्त होईल.

**सभा.**
११–१२.

ता० १४ एप्रील सन१८८१.

## क्षात्रधर्म

या सभेस स्वधर्माभिमानी गृहस्थांनीं जें "क्षात्रधर्म प्रतिपादक वधर्म फंडोत्तेजक" नांव दिलें आहे त्यावरून या सभेचीं दोन प्रकारचीं कर्तव्य कर्में आहेत असें उघड दिसतें. पैकीं फंड चालु करण्या करितां वेळोवेळीं सर्वत्रांस अनेक प्रकारें समजूत देऊन तो चालू करण्यांत आला आहे. तद्वत् क्षात्र धर्माचें प्रतिपादन या सभेकडून कोणत्या प्रकारें होतें तें ऐकण्यास सर्वत्रांचीं मनें फारच उत्कंठित झालीं असावीं; तेव्हां सभेनें या विषया संबंधीं जितकी माहिती देववेल तितकी देण्यास मनःपूर्वक झटलें पाहिजे तरच सभेचें नांव योग्य असें होणार आहे. आतां जरी मागील कित्येक सभेंत क्षात्र धर्माबद्दल

कांहीं विद्वान् जनांकडून व्याख्यानें देण्यांत आलीं होतीं, तरी त्या प्रत्येक वेळीं मंडळीचें लक्ष तिकडे लागावें तसें लागलें नव्हतें, कारण सर्वांचा कल फंड वृद्धिकडे अधिक होता परंतु हल्लिं फंडाचा स्थाईकपणा होऊन व्यवस्थाही बऱ्याच प्रकारची चालली आहे ह्मणून या वेळीं जें कांहीं आपणांस आपल्या स्वधर्माचे विचार पहाणें ते पाहिल्यास योग्य रीतिचें होणार आहे. बंधु वर्गही त्याचा चांगल्या प्रकारें विचार करतील असें त्यांच्या उल्हासितपणावरून दिसून येतें.

**क्षात्रधर्म**–याची व्याख्या अशी आहे कीं मूळ शब्द "क्षत्" (शस्त्रघातेंकरून पडणाऱ्या क्षतापासून रक्षण करणें) या धातु पासून आहे ह्मणजे भूमि, प्रदेश किंवा राष्ट्रीय जनसमुदाय आणि सत्ता हीं परचक्रापासून रक्षण करणें. आणि अशा कामीं जे पुढें सरले ते क्षत्रिय होत, आणि त्यांचें जें कर्तव्य कर्म तो "क्षात्र धर्म."

**दुसरा**–" क्षत्र " या शब्दाचा अर्थ अधिकार किंवा शक्ति असा आहे. आणि जे वीर परचक्राशीं सामना करण्यास पुढें होतात त्या सर्वांचा समज असा असतो कीं या भूमीचे आह्मीं अधिकारीच आहोंत तेव्हां प्राणांत होईपर्यंत आह्मांस तीचें रक्षण केलें पाहिजे आणि अशा अर्थान्वयपरांशीं रणीं भिडणारे जे सर्व त्यांचें तें एकोप्याचें बळ तीच राष्ट्रीय शक्ति होय ह्मणून ती जशी प्रबळ असेल त्या प्रमाणें राष्ट्रीय जनांचें किंवा भुमीचें त्यांजकडून रक्षण होण्याचा विशेष संभव असतो ह्मणून "क्षत्र" याचा भावार्थ रणीं भिडणारे जे ते सर्व क्षत्रिय असा होतो. असें असून कित्येक "क्षत्र" या शब्दाचा अर्थ असा बनवितात कीं, जो राष्ट्र चालविणारा " राजा " तोच " क्षत्रिय " परंतु ते या अर्थाची चुकी करितात असें नजरेस येतें. कारण–परचक्राशीं सामना करणें हें एकट्या राजानें होऊं शकत नाहीं परंतु राजाच्या अभावीं राष्ट्रीय जन समुदाय तें परचक्र निवारण करून आपली भुमी रक्षण करूं शकतो तेव्हां अर्थातच अशा कामीं शस्त्र धारण करणाऱ्या हजारो वीरांचा समुच्चय असतो आणि ते सर्व जयापजयाचे मालकच असतात ह्मणून ते रणीं भिडणारे सर्व क्षत्रिय होत. अशा क्षत्रियां पैंकीं जो अति कुशल व विशेष चपळ

कृतिचा मनुष्य असतो त्यास सर्वांनुमतें राष्ट्राधिकारी नेमून "राजा" हें-प्रयुक्त पद जोडिलें जातें. त्याच प्रमाणें प्रधान, सेनापती सरदार, शिलेदार बारगिर आणि रणशूर शिपाई इत्यादि ल्हान मोठ्या लष्करी पदव्या ज्यांच्या त्यांच्या गुण विशेषें करून देऊन राष्ट्राचें रक्षण केलें जातें ह्मणून "क्षत्रिय" हें पद त्या सर्वांसच अनुलक्षून असतें.

क्षत्रिय धर्म चालविणाऱ्या वीराच्या आंगीं शौर्य, वीर्य, धैर्य, बुद्धि, शक्ति व पराक्रम हे सहा गुण अवश्य असले पाहिजेत.

क्षात्रधर्माविषयीं असें ह्मटलें आहे कीं—

## श्लोक.

क्षत्रियो हि प्रजारक्षन् शस्त्रपाणिः प्रदण्डवान् ॥
निर्जित्य परसैन्यानि क्षितिं धर्मेण पालयेत् ॥ ६०।२
द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमण्डल भेदिनौ ॥
परिव्राड्योगयुक्तश्च रणे चाऽभिमुखो हतः ॥ ३२-३
यत्र यत्र वसेच्छूरः शत्रुभिः परिवेष्टितः ॥
अक्षयाँल्लभते लोकान् यदि क्लिवं न भाषते ॥ ३३-६
यस्तु भग्नेषु सैन्येषु विद्रवत्सु समन्ततः ॥
परित्राता यदा गच्छे—त्स च क्रतु फलं लभेत् ॥ ३५-३ ॥
ये यज्ञ संघैस्तपसा च विप्राः स्वर्गेषिणो वाऽत्र तथैव यान्ति
क्षणेन यान्त्येवहि तत्र वीराः प्राणान् सुयुद्धेन परित्यजन्ते ॥ ३८-३॥
जितेन लभते लक्ष्मी—मृतेनाऽपि वरांगनां ॥
क्षणध्वंसिनि कायेऽस्मिन् का चिंता मरणे रणे?॥ ३९-३॥
ललाट देशे रुधिरं स्रवच्च यस्या हवे तुप्रविशेत वक्त्रं ॥
तत्सोम पानेन किलाऽस्य तुल्यं संग्रामयज्ञे विधिवच्च दृष्टं ॥ ४०-३॥

लघु पाराशर.

अर्थ—१. क्षत्रियानें हस्ताच्या ठायीं शस्त्रें धारण करून प्रजेचें

रक्षण करावें, प्रजा आडमार्गानें गेली असतां तीस शासन करावें; आपल्या देशावर पर चक्र आलें असतां त्याचें निवारण करावें आणि भुमि धर्मनितीनें रक्षावी.

— २. योगाचरण करणारा सन्याशी आणि रणामध्यें घुसून लढून प्राणास मुकलेला वीर असे हे दोघे पुरुष या पृथ्वि तलावरून सुर्य बिंब भेदून मूक्तिप्रत जातात.

— ३. जो शूर पुरुष जिकडून तिकडून शत्रूंनीं वेष्टित होत्साता रहातो त्याला अक्षय स्वर्गवास प्राप्त होतो, परंतु त्याचें तें असें रहाणें अजागळ सारखें मात्र नसावें.

—४. आपल्या सभोंवति असलेलें सैन्य पराभव पावून सैरावैरा धांवत असतां त्यास धीर देण्यास जो पुढें सरसावतो त्यास यज्ञ केल्याचें फळ प्राप्त होतें.

—५. विप्र, स्वर्ग प्राप्त्यर्थ हजारो यज्ञ तपश्चर्या इह लोकीं करून ज्या लोकाप्रत जातात तो लोक जे वीर उत्तम प्रकारें युद्ध करून आपल्या प्राणाची आहुती देतात त्यांनां एका क्षणांत प्राप्त होतो.

—६. युद्धांत उत्तम प्रकारें लढून शूर पुरुष जिवंत राहिला असतां त्यास संपत्ति लाभते; आणि मृत्यु पावला तरी उत्तम सुख प्राप्त होऊन जीवन्मुक्तता प्राप्त होते, तेव्हां ही क्षणभंगुर असा जो आपला देह त्याचा रणा मध्यें नाश होईल ह्मणून चिंता कां?.

—७. युद्धाच्या ठायीं मस्तकावरून वहाणारें रक्त तोडांत जर गेलें तर तें विधी प्रमाणें केलेल्या संग्राम रूपीं यज्ञां मध्यें सोमरस प्राशन केल्या सारखें आहे.

या प्रमाणें व्यास पिता जो पाराशर मुनीं त्यानें "क्षात्र" धर्मासंबंधीं आपलीं वचनें लिहिलीं आहेत. आतां *मनुस्मृती, क्षत्रिय धर्मा विषयीं काय ह्मणते तें आपणांस पाहिलें पाहिजे.

---

* १. मनुस्मृतिची रचना इ० स० पूर्वी नवव्या शतकांत झालेली आहे.

### श्लोक.

प्रजानां रक्षणं दानमिज्याध्ययन मेव च ॥
विषयेष्व प्रसक्तिश्च क्षात्रियस्य समासतः ॥ १ ॥
॥ मनु० ॥

अर्थ— प्रजा रक्षण करणें, दानदेणें, होम हवन करणें, वेदाध्ययन करणें, आणि गीत, नृत्य, स्त्री संभोग इत्यादि विषयांच्या ठायीं वारंवार आसक्त नसणें हीं कर्मे क्षत्रियां साठीं स्थापन केलीं आहेत.

### श्लोक.

स्वधर्मो विजयस्तस्य नाहवेस्यात्पराभवः ॥
॥ मनु० ॥

अर्थ— शस्त्रें करून जय प्राप्ति आणि संग्रामांतून पळून न जाणें हे दोन धर्म क्षत्रियांचे होत.

### श्लोक.

आहवेषु मिऽन्योऽन्यं जिघांसं नांमहि क्षितः ॥
युध्यं मानाः परं शक्त्या स्वर्गं यांत्यपरा ङ्मुखाः
॥ मनु. ॥

अर्थ— परस्परांची स्पर्धा करित होत्साते युद्धाचे ठायीं परस्परांला जिंकण्या विषयीं इच्छिणारे क्षत्रिय समोर उभे राहून जे युद्ध करितात त्यांस अंतीं स्वर्ग प्राप्त होतो.

### श्लोक.

उद्यते राहावे शस्त्रैः क्षत्रधर्म हतस्यच ॥
सद्यः संतिष्ठते यज्ञस्तथा शौचमिति स्थिति ॥
॥ मनु. ॥

अर्थ— क्षत्रिय आपला स्वधर्म बजावीत असतां शस्त्रघातें करून

रणाच्या ठायीं मृत्यु पावला तर परम यज्ञ व शौच वृत्ति हीं त्या ठायीं पूर्ण होतात. याप्रमाणें क्षत्रियानें आचरण केलें असतां तो परम धर्म आचरला व त्याचें सुफळ त्यास स्वर्गीं प्राप्त होईल.

याच प्रमाणें भगवद्गीतेंतही क्षत्रियांचें कर्तव्य कर्म याविषयीं सांगितलें आहे परंतु त्या वचनांचा भावार्थ सदरील वाक्या प्रमाणेंच असल्यामुळें तीं घेतलीं नाहींत.

पहा बरें! मागील काळच्या सद्वचनी, निर्लोभी व समदृष्टि पुरुषांनीं क्षात्रधर्मास कसें उत्तेजन दिलें होतें, आणि त्यामुळेंच भारतवर्षीय क्षत्रियांचा परदेशीय व पर धर्मीय राष्ट्रें यांजवर दाब बसून गेला होता, असो.

क्षत्रियांस विपत्काळ प्राप्त झाला असतां त्यांनीं आपलें जिवित्व कोणत्या उपायानें रक्षण करावें याविषयीं मनु असें ह्मणतो कीं.

### श्लोक.

शस्त्रास्त्र भृत्वं क्षत्रस्य वणिक्पशुकृषिर्विशः ॥
अजीवनार्थं धर्मस्तु दानमध्ययनं यजिः ॥ ७९-१० ॥

॥ मनु ॥

**अर्थ**—शस्त्रें ( खड्गादिक ) व अस्त्रें ( बाणादिक ) हीं दोन धारण करणें हे क्षत्रियांचें कर्म; व्यापार पशुरक्षण, शेति हीं कर्में वैश्यांची होत; तथापि हीं क्षत्रियांला व वैश्यांस उपजीविकाभूत जाणावीं. आणि अध्यन, दान देणें, यज्ञ करणें हीं दोघांसही धर्मार्थ आहेत.

या सदरील वाक्यावरून क्षत्रियांनीं आपल्या विपत्काळीं ( परांकडून पराजितपणा प्राप्त झाल्यास ) व्यापार शेति व पशुपालन करून उदर निर्वाह चालविला असतांही ते क्षत्रिय वंशापासून किंवा क्षत्रियधर्मा पासून भ्रष्ट होतात असें नाहीं. परंतु विद्या भूषीत असून प्रसंगोपात आपली शस्त्रास्त्र क्रिया दर्शविण्यास कदापि मागें घेऊंनये हाच काय तो या वाक्याचा उद्देश होय. सदरील तिहींपेक्षां विद्या गुणावर आपला चरितार्थ चालविल्यास अत्युत्तम मार्ग होय असें

जाणावें. अशा प्रकारचे पूर्वकाळचे लेख निःपक्षपाति व सरळ हेतुचे असल्यामुळें सर्वच मोठ्या सुखानें आपलें आयुष्य क्रमण करीत होतें. असें असून हल्लीं त्याच हिंदुस्थानची स्थिती पाहूं गेल्यास मोठें आश्चर्य वाटतें. या सुपीक भूमीची आशा परराष्ट्रांस उत्पन्न होऊन त्यांनीं महत्प्रयत्नांनीं आपलें कार्य करून घेतलें परंतु क्षत्रिय पक्ष नाहींसा झाला असा अर्थ नाहीं. यदा कदाचित्त असेंही कोणी ह्मणूं शकेल कीं येथें क्षत्रियांचा एवढा मोठा भरणा असून परक्या लोकां चा हिंदूंवर पगडा बसण्याचें कारण काय असावें? त्याचा विचार करितां असें नजरेस येतें कीं आमच्या पुराणांदि शास्त्रकर्त्यांनीं क्षत्रिय पक्ष गलित करण्याच्या हेतूनें त्यांची निर्भत्सना करण्याची जी एक युक्ति लढविली ती जाणण्यास क्षत्रियांच्या आंगीं विद्याज्ञानाचें तेज राहिलें नाहीं; सबब त्यां मध्यें अविचारानें कलह वृद्धि विशेष झाली तथापि मुळचा क्षत्रियवंश व क्षात्रधर्म नष्ट करण्याचा जो शास्त्र-कर्त्यांचा हेतु तो तर साध्य झाला नाहींच पण उलट दूषणांस पात्र व्हावें लागलें असें असूनही अद्यापि ते आपल्या गीता पाठाचा जप करितच आहेत हें केवढें नवल आहे! पहा बरें परशुरामानें एकवीस वेळ निःक्षेत्री भुमी केली, किंवा भारथी युद्धा नंतर क्षत्रिय वीर राहिले नाहींत अथवा कोणी क्षत्रिय कुळाचें नांव काढल्यास कपाळास आंटी घालणें इत्यादि प्रकारावरून आपणास त्या लेखांचा व अपवादाचा थोडासा विचार कर्तव्य आहे ह्मणून एक दोन दाखले घेऊन पाहूं. पहा पुरांणांतलिच प्रमाण घेऊन पहातां परशुरामानंतर सुर्यवंशी राम यदुवंशी कृष्ण, व सोम वंशी युधिष्ठीर व दुर्योधन यांजपाशीं असंख्य क्षत्रिय वीरांची दळें होतीं आणि मथुरेंत तर एका यादव कुळाचे छपन्न कोटी लढाऊ शूर होते ह्यावरून इतर कुळांचे क्षत्रिय किती असावे याचा कोणीही विचार करूं शकेल शिवाय रामाश्वमेध व धर्मा श्वमेध ग्रंथ पहातां वीरांची संख्या अवाढव्य आढळते तेव्हां जर परशु रामानें क्षत्रियांचें बीज नाहींसें केलें होतें तर एवढा मोठा क्षत्रिय वर्ग

---

१. पुराणें इ० स० नवव्या शतका पासून १६ व्या पर्यंत झाल्याचा आधार मिळतो.

परशुराम निजधामास जाण्यापूर्वी व नंतर कसा चालू राहिला बरें? असो. भारथी युद्धांत क्षत्रिय निवर्तले ह्मणावे तरी देखील त्या लेखांची बलिष्टता नजरेस येत नाहीं कारण अर्जुनाचा नातु जो परिक्षिती त्याचे वशांतील क्षमक नामे राजा पर्यंत एकुणतीस भूपति झाले त्यानंतर पृथक पृथक वंशांतील पन्नास पुरुपांनीं हस्तनापुरीं राज्य केलें; पुढें विक्रम, शालिवान व इतर दुसऱ्या वंशांतील ४० पुरुपांनीं हस्तनापुर ( दिल्ली ) उज्जनी व पैठण येथें राज्य केलें यावरून भारथी युद्धानंतर ११९ सदरील तीन ठिकाणीं राजे झाले ते सर्व आपणांस ( "सार्वभौम असें ह्मणत असत,") तेव्हां अर्थातच हिंदुस्थानचे इतर भागावर पुष्कळ मांडलीक राजे होते असें सिद्ध करितां येतें. आणि त्या मांडलीक राजां- वर आपली सत्ता चालावी ह्मणून सार्वभौम राजांस पुष्कळ लष्कर बाळगावें लागलें असेल कीं नाहीं? आणि खरोखर तसें केल्याशिवाय कसें चालेल असें उघड असतांही कित्येक ग्रंथांत असें लिहिलें गेलें आहे कीं शालिवहानानें आपलें लष्कर मातीचें बनविलें होतें व विक्र माचें लांकडी होतें आणि तीं दोन्हीं दळें नर्मदा नदींत गळालीं. असें जर होतें तर बाकी काय राहिलें,? असा सहजी प्रश्न निघतो आणि जर या दोन पुरुषां खेरीज दुसरें कोणि उरलें नव्हतें तर मग यांणीं जें रा- ज्य केलें तें कोणाच्या बळावर व कोणावर, कारण लष्कराविना कोण कसा राज्य करूं शकेल? तेव्हां पहा बरें केवढें आश्चर्य हें कीं ज्या पुरु षांचे अद्याप पर्यंत शक चालू राहिले आहेत त्यांस त्या वेळीं मनुष्याचें बळ मुळींच नव्हतें काय? आणि ते ज्या ज्या देशांत राज्य करीत होते तेथें मानवी प्राणी बिलकुल नव्हते काय? आणि जर नव्हते ह्म- णावे तर या दोन्हीं राज्यांनीं आपली सत्ता कोणावर बजाविली होती आणि ते जर एकेकटे प्राणी होते तर त्यांस सार्वभौमत्व कसें व कोणी दिलें होतें आणि त्या हकिकतींत शालिवहान नीच कुळाचा राजा होता असेंही ह्मटलें आहे, हीं दुषणें त्याच्या पश्चात् कोणी द्वेशी लेखकानें लिहिलीं असावीं. तेव्हां असल्या इतिहासास ह्मणावें तरी काय? आमची तर अशी खात्रि होते कीं शालिवहान हा क्षत्रिय कुलोत्पन्न महा शूर व पराक्रमी वीर असून मोठ्या भारी दळभारासह दक्षणेंत

राज्य करीत होता आणि दक्षिण प्रांतीं राष्ट्रीय प्रजेचा मोठाच समुच्चय होता असावा यांत संशय कोणता. त्याच प्रमाणें विक्रम ही सर्व गुण मंडित व ऐश्वर्य संपन्न होता यांत तिळमात्र अंदेशा नाहीं, असो. मागील काळीं राम, कृष्ण किंवा भारथीय राजे सबळ अशा क्षत्रिय वर्गासह नांदत होते, परंतु त्यास फारच काळ मागें पडला व विक्रम आणि शालिवहान यांस ही हल्लीं दोन हजार वर्षे होत आलीं यास्तव त्या अलिकडे क्षत्रियांनीं काय काय केलें तें आपणांस पाहिलें पाहिजे.

हिंदुस्थानची सत्ता आपणास प्राप्त व्हावी, असे आशा बद्ध झालेले जे मोंगल, पठाण, दुराणी, व रोहिले इत्यादि परस्थलोक यांजबरोबर सन ६६४ सालापासून क्षत्रिय धर्माभिमानी मराठे, शीक, जाट व रजपूत यांनीं शौर्य, धैर्य, सहास व प्रसंगोपात उत्तम युक्ति यांहीं करून त्या परस्थांशीं सामना केला आणि अनेक वेळां त्यांस हत्‌विर्य करून सोडिलें होतें. त्यांतून रजपुतादि इतर लोकांपेक्षां मराठे वीरांनीं तर फारच आश्चर्य वाटण्या सारिखीं शौर्याचीं कामें करून सन् १७६१ पर्यंत आपली सत्ता उत्तरेस सिंधु नदी व हिमालय पर्यंत व दक्षणेस केप कन्या कुमारि ( रामेश्वर ) याचे जवळ जवळ नेऊन भिडविली होती त्यायोगें मराठी राष्ट्राची मोठी किर्ति वाढून मराठ्यांचा सर्व हिंदुस्थानावर दाब वसून गेला होता त्या अलिकडे सन् १८१८ पर्यंत ह्मणजे इंग्लिश सत्ता कायम होण्याच्या वेळे पावेतों मराठे लोकांनीं कांहीं कमी पराक्रम केले असें नाहीं. शेवटीं जरी त्यांस पराजीतपणा आला तरीही इंग्लिश अधिकारा खालीं मराठ्यांनीं मोठमोठीं महत्वाचीं कामें करून कीर्ति मिळविली व अद्याप पर्यंत मराठ्यांचीं कित्येक संस्थानें आहेत इत्यादि अनेक प्रमाणांवरून क्षात्रिय वर्ग हा वेळ पर्यंत अस्थित्वांत असून जो त्यांचा स्वधर्म तोही ते बजावीत आहेत तेव्हां क्षत्रियांच्या नष्टते विपर्यीं बोलणारे केवळ त्या कुळाचे मत्सरी आहेत असें ह्मणणें आह्मांस भाग पडतें.

दुसरी एक विलक्षण तऱ्हा ग्रंथांतरी नजरेस येते ती अशी कीं मागील काळीं क्षत्रियांनीं आपला बाप, भाऊ व मुलगा आणि इतर नातेवाईक अथवा स्वधर्मीजन किंवा स्वदेशीय बंधुजन यांची ओळख न

ठेवितां अथवा विचार न करितां एकमेकांचे वैरी बनून आपण आपलीच खाक करून टाकिली आणि सुखी देश किंवा सुखी राष्ट्र अथवा सुखी कुटुंबें केवळ दुःखाचें माहेरघर करून सोडिलें आणि शेवटीं अगणित मनुष्यवधाचें पातक झालें असें जाणून त्या पातकाचे शमनार्थ (पोकळ पुण्याईकरितां) अश्वमेधाचें सोंग उभें करून जे कोणी चुकून शिल्लक राहिलेले क्षत्रिय असतील त्यांस त्या यज्ञकुंडाच्या आहुतीस घातले याबद्दल रामायणांत व हरिविजयांत पुष्कळ दाखले आहेत; तसेंच भारथियुद्ध व यादवी निर्मूलन इत्यादि गोष्टींचा विचार करूं जातां आश्चर्य वाटल्याविना रहाणार नाहीं आणि तोच प्रकार बहुशः अद्याप पर्यंत चालत आला आहे. आतां असे बेविचारी पणाचे गुण या हिंदु राष्ट्रांचे स्वभावतःच असावे किंवा ग्रंथांतरींचे लेख पाहून व ऐकून तद्वत क्षत्रियांनीं आपलें वर्तन चालू केलें असावें याचा सिद्धांत तूर्त करित बसत नाहीं तथापि असें मात्र सिद्ध करतां येतें कीं मनुष्याचा मूळ स्वभाव अज्ञानी, भित्रा व दयार्णव असा आहे पण त्यास जसें रूप द्यावें तसा स्वभाव बनतो; यावरून आपण आपसांत भांडून मरून जावें हेंच उचित होय असा ग्रंथकारांचा उपदेश क्षत्रियांनीं बळकट चित्तीं वागविला असावा असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं असें आह्मांस वाटतें आणि अशा स्वभावाची प्रवृत्ति विशेषतः अद्याप नजरेस येत आहे यावरून प्रत्येक राष्ट्रांत क्षत्रिय वर्ग कां असावा याविषयीं खऱ्या समाजाचा थोडा भास झाला असें अनुमान करितां येतें. सबब क्षत्रियांचें महत्व प्रत्येक राष्ट्रांत कसें असावें व क्षत्रिय वर्ग स्थापण्याचा हेतु कोणता याबद्दल दोन शब्द आपणांस कळविले पाहिजेत ते असे कीं.—प्रत्येक राष्ट्रांत क्षत्रियांचें अस्थित्व विशेष महत्वाचें आहे. क्षत्रिय ह्मणजे बळ आणि त्या बळाच्या योगानें प्रत्येक मनुष्य अथवा राष्ट्र आपली वस्तु किंवा सत्ता परांपासून रक्षण करूं शकतो ह्मणून क्षत्रिय ह्मणजे रक्षक असा सिद्धांत शहाणे जनांनीं केला आहे, आणि राष्ट्रांतील प्रत्येक मनुष्य पुरा शिपाई बनेल तेव्हांच तें राष्ट्र इतरांपेक्षां विशेष सुधारणुकीचें व महत्वाचें होणार आहे; आणि कदाचित तेंच राष्ट्र पृथ्वींत अजींक्यही होऊं शकेल. आतां इतकें

मात्र आह्मांस कबुल केलें पाहिजे कीं राष्ट्रांतील प्रत्येक मनुष्य क्षात्र धर्मांत तरबेद होणें कांहींसें अवघड व श्रमाचें खरें तथापि कोणत्याही राष्ट्रापैकीं एक चतुर्थांश किंवा कांहीं जास्त लोक वंश परंपरेनें क्षात्र धर्मांत सिद्ध असल्यास कांहीं गैरसोयीचें होईल असें ह्मणतां येत नाहीं ह्मणून क्षात्रपक्ष मोठा बळकट व तयार असण्याच्या पूर्ण हेतुनें त्या पक्षास राष्ट्रीय जनांकडून हमेशा उत्तेजनार्थ हरएक प्रकारचें साह्य असणें मोठेंच महत्वाचें व विशेष जरूरीचें होय. असा स्वरक्षणार्थ स्थापित झालेला क्षत्रिय वर्ग जर परांकडून पाडाव होण्याचा समय आला तर स्वराष्ट्रीय बंधुजनांनीं आपला देशाभिमान बळकट चित्तीं वागवून आपल्या राष्ट्रीय ऐक्यबळानें व क्षत्रिय वर्गास उत्तेजन देऊन सर्वांनीं शत्रुपासून अवश्य निवारण केलें पाहिजे आणि असें झाल्या खेरीज स्वदेश स्वसत्ते खालीं राहूं शकणें अगदीं अशक्य होय. परचक्र हमेशा येण्याचा विशेष संभव असतो, कारण मनुष्यास लोभाची बाधा उत्पन्न होत असल्यामुळें ज्यास त्यास आपलें महत्व वाढावें ही इच्छा असते, तेणें करून मनुष्य प्राण्याच्या मुळ स्वभाविक गुणांत बदल होऊन त्या ऐवजीं ज्ञान, सहास व लोभ हे गुण पुढें जडतात; त्या योगें द्वेशाचें बिजारोपण होतें ह्मणून प्रत्येक राष्ट्रास क्षात्रिय वर्गाची फारच जरूरी असते. अशा अनेक कारणापासून देश रक्षण होण्यास जेथें क्षात्रियांची योजना नसते, अथवा क्षत्रिय कुळधर्म चालविणारांस उत्तेजन मिळत नसतें तो देश किंवा राष्ट्र पराच्या हातीं जावून त्वरित वैभव नष्टतेस पात्र होतें याजबद्दल उदाहरण पाहिजे असल्यास आपल्याच देशाचें घ्या.

कोणत्याही देशांत स्थापित झालेला जो क्षत्रिय पक्ष या विषयीं एक फार अगत्याची सूचना देणें उचित दिसल्यावरून तिचा येथें उल्लेख करण्यांत येत आहे तो असा कीं. क्षत्रिय ह्मणजे बळ असें वर सांगितलेंच आहे तेव्हां कोणी क्षत्रिय त्या बळाचे धुंदींत आपल्या बळाची कितपत तयारी आहे याचें प्रत्यंतर पहाण्याचे इच्छेनें आपल्या एका हस्तास शस्त्राचें साह्य देवून दुसरा तोडण्याचा यत्न करील किंवा तोडील तर त्याचें तें कृत्य निंदेस पात्र होऊन त्यास सुखास व

कीर्तिस मुकावें लागेल कारण जो क्षत्रिय वर्ग प्रत्येक राष्ट्रांत तरतूद केलेला असतो तो आपल्या स्वयातीय, स्वदेशीय व स्वधर्मीय लोकांच्या विरुद्ध जाण्याकरीतां नव्हे तर त्याचा मूळ उद्देश स्वदेशांत शांतता स्थापन करणें आणि आपली भूमि परचक्रापासून रक्षण करणें असा असून जर आपलें कर्तव्यकर्म कोणतें हें राष्ट्रीय जनांस किंवा क्षत्रियांस नकळतां ते परस्परांत विरोध व कलह माजवून एकमेकांच्या नाशास प्रवृत्त होतील तर ते थोड्याच काळांत परांच्या स्वाधीन होऊन आजन्म परसेवेंत राहतील हें निर्विवाद होय. दुसरी सूचना अशी कीं, क्षत्रियधर्म चालविणारांनीं सदांसर्वदां फारच धूर्तपणानें व सावध रितीनें असणें विशेष अगत्याचें असल्यामुळें त्यांनीं कैफी ह्मणजे मद्य, अफू इत्यादि अम्मल आणणारे पदार्थ व जार कर्म अथवा वेश्यागमन किंवा इतर कुकर्मे जीं क्षत्रियधर्मास केवळ शत्रुवत आहेत त्यांजपासून दूर असलें पाहिजे. याप्रमाणें नेमधर्म न पाळतां जो क्षत्रिय आपले अविचारी वर्तन ठेवील तो क्षात्र धर्मास तर काय पण आपली संपत्ति, संतति, सत्ता व मान यास मुकला जावून आपल्या सुकुळास कलंक लावण्यास कारणीभूत होईल असें खचित समजावें.

येथपर्यंत सर्व प्रकारची वाटाघाट होऊन क्षत्रियांस युक्तायुक्त कर्मे कोणतीं व या भूतलावर (हिंदुस्थानांत) हा वेळपर्यंत क्षत्रियांचे अस्थित्व सिद्ध करण्यांत आलें आहे; कारितां आमचे क्षत्रिय कुलभूषण प्रियबंधु जनांनीं ह्या सुविचारांकडे विशेष लक्ष द्यावें असें त्यांस सभेचें कळवीणें आहे.

येथून पुढें क्षत्रियधर्म चालविणारीं मराठ्यांचीं ९६ कुळें आहेत त्यांविषयीं माहिती देणें जरूर आहे असें जाणून विषय चालु केला आहे.

| कुळें. | कुळें |
|---|---|
| १ भोसले. | २ गायकवाड. |
| ३ पवार. | ४ शिंदे. |
| ५ सावंत. | ६ मोहिते. |
| ७ चवाण. | ८ इंगळे. |
| ९ ह्याडिक. | १० कदम. |
| ११ माने. | १२ काळे. |

१३ आंग्रे. १४ जाधव.
१५ साळुंखे. १६ हुंडे.
१७ कांकडे. १८ राणे.
१९ घाटगे. २० जगताप.
२१ चालुक्य. २२ यादव.
२३ ढमढेरे. २४ लाड.
२५ जगदळे. २६ ढवळे.
२७ दाभाडे. २८ धुमाल.
२९ थोरात. ३० दळवी.
३१ नलावडे. ३२ पानसरे.
३३ पिसाळ. ३४ मालप.
३५ फाळके. ३६ आंगणे.
३७ सिसोदे. ३८ इचारे.
३९ मालुसरे. ४० तावडे.
४१ मोरे. ४२ खैर.
४३ बागवे. ४४ राऊत.
४५ रेणुसे. ४६ वाघ.
४७ पांढरे. ४८ भोगले.
४९ वागराव. ५० भागवत.
५१ मुळिक. ५२ सुर्वे.
५३ क्षिरसागर. ५४ शितोळे.
५५ ठाकुर. ५६ शंखपाळ.
५७ शिरके. ५८ तुवार.
५९ मधुरे. ६० ह्मांबर.
६१ बांडे. ६२ तेजे.
६३ देवकांते. ६४ शेलार.
६५ सांबारे. ६६ फांकडे.
६७ हरफळे. ६८ निकम.
६९ दरबारे. ७० कोंकाटे.

| | |
|---|---|
| ७१ ढेंकळे. | ७२ थोटे. |
| ७३ अहीर. | ७४ पारटे. |
| ७५ साळव. | ७६ पालांडे. |
| ७७ फाटक. | ७८ जगधने. |
| ७९ धायबर. | ८० पिंगळे. |
| ८१ फडतरे. | ८२ भोंवारे. |
| ८३ रसाळ. | ८४ खडतरे. |
| ८५ दाडे. | ८६ ढोणे. |
| ८७ निसाळ. | ८८ पाठारे. |
| ८९ बाबर. | ९० भोइटे. |
| ९१ गव्हाणे. | ९२ गवसे. |
| ९३ जालिंधरे. | ९४ ढमाले. |
| ९५ पाळवे. | ९६ खंडागळे. |

हीं ९६ क्षत्रिय कुळें एतद्देशीय (महाराष्ट्रीय) असून तीं सर्व भिन्न-भिन्न वेळीं प्रख्यातीस आलीं आहेत आणि ते आपला वंशपरंपरेचा क्षत्रियधर्म व आचार विचारादि नेमधर्म चालवीत आहेत. ह्या सदरील कुळांतील कित्येकांस कांहीं कारणपरत्वें अनेक प्रकारचीं आडनावें जडलीं गेलीं आहेत. कित्येकांस सुमारें दोनशें वर्षांआलिकडे ह्मणजे स्वराज्याच्या वेळीं व विजापुर कराच्या कारकिर्दींत ज्या बहुमान्यतेच्या पदव्या मिळाल्या होत्या, त्या त्यापुरुषांच्या वंशाकडे केवळ आड नावांदाखल प्रचारांत आहेत व कांहीं जन आपल्या गावांच्या नावांस "कर" असें जोडून तेंच आड नांव चालवीत आहेत. त्यांचा खुलासा येथें करण्यात आला आहे.

## भोसले.

याची उपकुळें (आडनावें)

१ नकासे. २ लोखंडे.

## गायकवाड.

१ भाते. २ मवाते. ३ डिगे. ४ हुबे. ५ डेवरे. ६ सडवर.

## पवार.

१गुजर. २ मालपवार. ३बने. ४ दुखंडे. ५ रोकडे. ६ पतयाने. ७ जगपाळ. ८वागजे. ९ लांडगे. १० उवाडे.

## शिंदे.

१ कुर्वा. २ शिशुपाळ. ३ महत्काळ. ४ सकतपाळ. ५ जय. ६ विजय. ७ दुर्दैया. ८ नेकुळ. ९ शितज्या. शिंद्यांचीं उपकुळें १२ असून तीन मिळत नाहींत.

## सावंत.

१ कंवले. २ वाइंग. ३ गाताड. ४ विसाटे.

## मोहिते.

१ कांमरे. २ आचटे. ३ भारे. ४ धुधुळे. ५ कुलुंगडे.

## चवाण.

१ धडम. २ वारंग. ३ दलपते. ४ हावळे. ५ रोठे. ६ रविंद.

## इंगळे.

१ कनवजे. २ ठुकरूल.

## झाडिक.

१ गवळी. २ भोईर. ३ आटोळे. ४ घावरे.

## कदम.

१ विरथ. २ बोढर. ३ वोराटे. ४ भिरसलगडे. ५ खडपे. ६ कावळे.

## माने.

१ देवमाने. २ राजमाने.

## जाधव.

१ साठम. २ काटवटे. ३ अपराधे. ४ हगरे. ५ भोगसाठे. ६ शेवटे. ७ बोटावे. ८ पुढाळे.

## साळुंखे.

१ पाताडे, अथवा पाटोळे. २ वाघमारे. ३ सरपे. ४ पडवळ. ५ झाड.

६ तांबे. ७ चंदनशीव. ८ तावसे. ९ बावरे. १० मोरवे. ११ मोठे. १२ आतकारी. १३ साकळे. १४ सेवाळे.

**हुंडे.**

१ वानरे. २ सेडोळे. ३ वडावळे.

**राणे.**

१ दुधे. २ सिगवण.

**जगताप.**

१ कांटे. २ काशिंदे. ३ दुबळे. ४ निमसे.

**चालुक्य.**

चालुक्य अथवा चाळके १ नीळवर्ण.

**यादव.**

१ घाग. २ जोगले. ३ जारे. ४ दळु. ५ जसवंत. ६ धुमक. ७ घोगले. ८ सिरगोरे. ९ अघोक. १० भोजक. ११ वघले. १२ अमृते. १३ सुहसेन. १४ चेददीन. १५ यागीत. १६ घोणे. १७ कुकुर. १८ कडलग.

**धुमाळ.**

१ धुलप. २ धुले. ३ धुरे. ४ नागणे. ५ कासले. ६ आवारे. ७ माळचिमणे. ८ जाळगुज. ९ वेसे.

**नलावडे.**

१ नलगे. २ पारधे. ३ दाखे. ४ साबळे.

**आंगणे.**

१ हिरवे. २ उघडे.

**सिसोदे.**

१ जोसी. २ शिरसाठे. ३ खराटे. ४ चवधारे.

**तावडे.**

१ सांगल. २ नामजादे. ३ जांबळे. ४ चिरफुले.

**मोरे.**

१ कलपाते. २ आबळे. ३ डुकरे.

### बागवे.

१ दिवटे. २ बांडगे.

### सुर्वे.

१ घाड. २ करपे. ३ लटके. ४ डोईफोडे. ५ कचरे.

### क्षिरसागर.

१ गोडे. २ चक्के. ३ सार्दुळ. ४ ढारे. ५ होके. ६ वाणखडे. ७ दावडे. ८ परवाळे.

### शंकपाळ.

शंकपाळ. अथवा सकपाळ. १ आंब्रे. २ साटे. ३ पोळ. ४ पाणपटे. ५ राजहंस. ६ नलवट. ७ तातपुते. ८ चतुर.

### शिरके.

१ वागवान २ गावंड (गावडे). ३ ढोले. ४ मोकल. ५ कपाळे. ६ कोंब्रे.

### तुवार.

१ धावडे. २ तुर्ये. ३ तामटे. ४ बुलके.

### शेलार.

१ प्रतिहार. २ शेटगे. ३ शेल्के. ४ गोरे. ५ कराळे. ६ विसई. ७ ह्यात्रे ८ कलनाथ.

### निकम.

१ रणदिवेनिकम. २ नरखांत्रे. ३ गुंड. ४ भोजणे. ५ अवताडे. ६ हाऊगे. ७ वणजारे.

### सालव.

सालव अथवा साळवी १ सेदवळ.

### खडतरे.

१ जावळे.

### गवसे.

गवसे अथवा गवस. १ आगलावे. २ डांगरे.

### ढमाले.

१ ढके २ रेवाळे.

## पाळवे.

पाळवे अथवा पालव .

कोण कोणत्या कुळांतील मराठे सरदारांस कसकशा पदव्या मिळाल्या होत्या त्याचा खुलासा येणें प्रमाणें.

| कुळी | पदवी. |
|---|---|
| भोसले | घोरपडे. |
| पवार | विश्वासराव, धारराव, निंबाळकर उर्फ फलटणराव. |
| शिंदे | रविराव. |
| माने | भुजबळराव, सभा नाईक. |
| मोहिते | हंबीरराव. |
| चवाण | डफळे, मोकाशी. |
| पाटोळे | मोकाशी. |
| सावंत | बहादर. |
| थोरात | दिनकरराव. |
| साळुंखे | अेरराव अथवा अनेराव, सरनाईक. |
| घाटगे | झुंझारराव, सर्जेराव. |
| साळवी | मोकाशी. |
| जाधव | यशवंतराव, फड नाईक. |
| मोरे | चंदरराव. |
| —— | रणनवरे. |
| —— | दसवंतराव. |
| —— | अहिरराव. |
| —— | देवराव. |
| —— | भालेराव. |
| —— | रणपिसे. |
| —— | रणबागुल. |

ह्या सदरीं दिलेल्या पदव्या ज्या पुरुष्यांस मिळाल्या होत्या त्यांचीं नावें इतिहासांत प्रसिद्ध आहेत आणि त्यांचेच वंशजांकडे त्या उपनांवांदाखल चालू आहेत. पण त्याच कुळाचे इतर लोकांस त्यांचा संबंध नाहीं जसें "चंदरराव" ही पदवी मोरे कुळापैकीं एका पुरुषास होती परंतु सर्व मोरे "चंदरराव" असा अर्थ नाहीं आणि अशा पदव्या त्या त्या पुरुषांच्या वंशजानें चालविणें हेंही प्रशस्थ नव्हतें तथापि नामांकीत पुरुषांच्या घराण्याची ओळख रहाण्यास्तव चालत असलेला प्रकार फारसा दूषणीय नाहीं. ह्या वरील पदव्यांत जीं शेवटीं सात नांवें आहेत त्यांचीं कुळें समजण्यांत आलीं नाहींत; परंतु तीं उपनांवाप्रमाणें कित्येकांकडे चालत आहेत ह्मणून तीं येथें दिलीं आहेत.

जीं कित्येक उपनावें गांवसंबंधाचीं आहेत तीं येथें देतों.

| | |
|---|---|
| काळेंकर—शेलार. | माणकर. |
| केसरकर—सावंत. | इंदुळकर—मराठे आणि साळुंखे. |
| दरेकर—मोरे. | इनसुलकर. |
| पासलकर. | कुंजरकर. |
| नाणेकर. | नेवरेकर. |
| दुदुसकर. | माळकर—लाड. |
| ह्मामुनकर—कदम. | पालकर. |
| पेडणेकर. | रायकर. |
| लोटणकर—चवाण. | फाळकर. |
| भालेकर. | धोंडकर. |
| वावकर. | पाटणकर. |
| खोपकर—भोसले. | कांडरकर. |
| खामकर—चवाण. | काटकर. |
| निंबाळकर—मोहिते. | खाजणकर. |
| | भाडलकर. |

यांपैकीं ज्यांचीं कुळें समजण्यांत आलीं तीं मात्र दिलीं आहेत. अशा गांव उपनांवांपेक्षां ज्यांनीं त्यांनीं आपापल्या कुळीचीं नांवें चालविल्यास विशेष बरीं. वर जीं उपकुळें दिलीं आहेत तीं कोणत्या

कारणानें जडलीं असावीं याबद्दल लेखी इतिहास नाहीं. कांहीं जण ज्या तोंडी हकीकती देतात त्या कांहीं तरीं अडाणी अर्थान्वय जुळविलेल्या दिसतात त्यावरून खात्रि होत नाहीं. आह्मांस वाटतें कीं असे अर्थ जुळविण्यापेक्षां कुळाचें नांव प्रचारांत आणल्यास उत्तम मार्ग.

यां शिवाय नाईक, प्रभु, देसाई आणि देशमुख हीं "उपपदें" असतां त्यांचा कित्येक लोक आड नावांप्रमाणें उपयोग करितात, हें बरोबर नाहीं कारण ह्या हुद्यांच्या व अधिकारदर्शक पदव्या आहेत. मागील काळीं ज्या पुरुषांस कांहीं हुद्दे व अधिकार होते त्यांनीं त्या पदव्या आपल्या कुळांस उपपदान्वय उपयोगांत आणिल्या आहेत, आणि असें त्यांचे करणें कांहीं अंशीं महत्वाचे खरें. ह्या वरील चार पदव्यांस योग्य झालेल्या पुरुषांचा किंवा तद्वंशीयांचा अथवा जे कोणी लक्ष्मीवान्, गुणवान्, आणि विद्या भूषित असतील त्यांचा किंवा इतर जे कोणी सन्मानास पात्र होतील त्या सर्व गुणी जनांचा योग्य मान राखला जावा यास्तव बहुमान्यता दर्शक "राव" हा शब्द शहाणे व सूज्ञ लोकांनीं प्रचारांत आणिला आहे. आणि त्या त्यांच्या हेतु प्रमाणें या शब्दाचा उपयोग महाराष्ट्रीय जनांतील बहुतेक जातिकडून होत असतो. असें असतां जे आह्मांतील या पांचही उपपदांचा विचित्र अर्थ कल्पून बडबड करित असतात त्यांत काय अर्थ साध्य होतो? कांहीं एक नाहीं व्यर्थ शीण होऊन गैर समंजसपणा मात्र पदरीं घ्यावा लागतो याजकरितां वाद करण्यापेक्षां प्रथम विचार करावा हें विशेष हितकारक होय; असो.

क्षत्रियां मध्यें सूर्यवंशी, सोमवंशी, यदुवंशी, आणि शेषवंशी असे चार भेद आहेत त्यांबद्दल कांहींकांचा असा समज आहे कीं, सूर्यापासून उत्पन्न झाले ते "सूर्यवंशी" इत्यादि. पण हा समज अगदीं भोळसर व अज्ञानपणाचा होय कारण सूर्य किंवा चंद्र या गोलांचे ( ताऱ्याचें) बिजारोपण या भूतलावर होऊन क्षत्रियांची उत्पत्ति होणें हा अगदीं खोटा समज आहे. परंतु त्यांचा भावार्थ असा असावा कीं पूर्वी जे क्षात्रिय ज्या देवतेचे उपासक होते ते आपल्या निशाणावर त्या कुळदेवतेची आकृती दर्शावित असत असें असतां हल्लीं त्याबद्दलचा

समज भलताच होऊन गेला आहे. त्याचप्रमाणें देवकें, गोत्रें' यां बद्दल ही अनेक खोटे समज लोक चित्तावर दृढ झालेले आहेत. त्याज विषयीं लोकांस खरा अर्थ समजावा हें योग्य होतें पण सवड नसल्यामुळें तूर्तच तो विषय चालवीत नाहीं. त्या बद्दल पुढें विचार करतां येईल.

आतां ज्या शिवछत्रपतीनें मराठी राज्याचा पाया पुन्हा घालून मराठ्यांस जगमान्य केलें त्या विषयीं आपणांस दोन शब्द लिहिले पाहिजेत.

भोंसले कुळांत जन्मून त्या कुळाची कीर्ति वाढविली त्या श्रीछत्रपति शिवाजी महाराजाचा जन्म जुन्नर येथील शिवनेरी किल्ल्यांत सन १६२७ सांत झाला त्यानें आपल्या सोळा वर्षांच्या वयापासून आपला देश परसत्तेंतून मुक्त करण्याचा विचार चालविला. त्यानें प्रथमतः आपले परम जिवलग सोबती एसजी कंक, तानाजी मालुसरे व बाजी फसलकर यांच्या साह्यानें तोरणा किल्ला सन १६४६ सांत आपल्या हस्तगत करून घेतला आणि दिवसेंदिवस अधिकाधिक लष्कर ठेवून आपली सत्ता मोठ्या जारीनें वाढविण्याचा यत्न चालवीला तें सहास कृत्य विजापुरच्या बादशहास न सहन होऊन त्यानें रागानें शहाजीस सन् १६४९ सांत कैद करून अंधेर कोठडींत ठेविलें होतें. त्यावेळीं शिवाजीनें आपल्या बापाच्या मुक्तते करितां जी युक्ति लढविली ती बादशहास भारीं अशी वाटून त्यानें शहाजीस सन् १६५३ सांत कैदेंतून सोडून त्यास आपल्या हुद्यावर जाण्यास परवानगी दिली. पुढें उत्तरोत्तर शिवाजीस बऱ्याच प्रकारें यश येऊन त्यानें आपली सत्ता कालियानी परगण्यापासून गोंव्यापर्यंत कोंकणपट्टी व भीमेपासून वार्णा नदीपर्यंत घांट माथा इतका मुलुख आपल्या हस्तगत करून घेतला ह्मणजे सन् १६६१ पावेतों शिवाजी जवळ पन्नास हजार पायदळ व सात हजार स्वार इतकें लष्कर जमून वर लिहीलेला मुलुख त्याचे स्वाधीन झाला. नंतर कांहीं मुदतींत सर्व दक्षिण प्रांतीं त्याची सत्ता स्थापन होऊन विशेष लौकिक झाला. याप्रमाणें सत्ता, द्रव्य व लष्कर पुष्कळ जमून थोडासा स्वस्थपणा आल्यावर त्यानें आपली गादी रायगड किल्यावर सन् १६७४ सांत

स्थापून आपणास " श्रीमंत छत्रपति " असें पद जोडिलें. त्यावेळीं सर्व मानकरी लोकांस कायमच्या देणग्या व योग्य वेतनें देवून आपल्या लष्करी खात्याचा व जमाबंदीचा उत्तम बंदोबस्त केला. आणि द्यूत खेळणें, मद्य सेवन, गायनाचे ठायीं मोहीत होणें, शिकारीचा बहु छंद, स्त्रियांचे ठायीं आसक्त, दुसऱ्याचें उणें भाषण करणें आणि दुसऱ्यानें उत्तम कर्म केलें असून त्यास व्यर्थ दूषण देणें इत्यादि सप्त व्यसनें क्षत्रिय वीरांस नसावीं एतद्विषयीं सर्वांस योग्य समजूत देऊन उत्तम नीति मार्ग स्थापन केला आणि आपलें वैभव याहूनही अधिक वाढावें अशी इच्छा धरून राज्य चालविलें होतें.

सारांश श्रीशिवाजीमहाराज हे मोठे विलक्षण व चमत्कारिक पुरुष होते. त्याचे शौर्यादी गुण फारच आश्चर्यकारक होते त्याने शीत, उष्ण व पर्जन्य यांचें मोठ्या धीटपणानें सहन करून आपल्या कार्यासाठीं मावळे लोकांचीं मनें पूर्ण वश करून घेतलीं होतीं. आणि त्याने आपले अर्थ सिद्धीस नेण्याकरितां ज्या ज्या कल्पना केल्या तशा पुढें कोणी करील असें ह्मणतां येत नाहीं. तो युद्धप्रसंगामध्येंही आपल्या प्रजेच्या व लष्कराच्या बंदोबस्तांत अंतर पडूं देत नसे. आणखी प्रजेच्या हितासाठीं नवे नवे कायदे करीत असे, आणि बहुत वेळ संकटसमयीं त्यानें आपला जीव फार युक्तिनें बचाविला. चोर घस्तीनें किल्ला किंवा मुलुख हस्तगत करून घेणें इत्यादि लहान मोठ्या सर्व कामांविषयीं त्याचें चातुर्य सारखें होतें. तो मोठ्या योग्यतेस आला आणि त्याजपाशीं द्रव्यही बहुत झालें तरी त्यानें आपल्या कायद्या-खेरीज खर्च केला नाहीं; आणि जें विशेष द्रव्य मिळविलें त्यापैकीं आपल्या नोकर लोकांस देवूं केलें तें लोभेंकरून आपणांस टेविलें नाहीं. तो आपल्या कुटुंबांत केवळ साबडा दिसे आणि भिडस्त-पणानें वागत असे, बाहेर तर सर्वांशीं गोड भाषण करी परंतु को-णाचा वरचढपणा होऊं देत नसे. त्याचा स्वभाव शिघ्रकोपी असे त्याची आकृति लहान होती आणि त्यामध्यें बळापेक्षां चापल्य विशेष होतें. " त्याचे उंचिपेक्षां *हात लांबीस अधिक होते." त्यानें आपल्या

* असे कित्येक भोळे लोक म्हणतात.

तलवारीचें नांव भवानी असें ठेविलें होतें. तीस अद्यापि साताऱ्यांत त्याचे वंशज देवी प्रमाणें पूजितात इत्यादि सर्व गुणांवरून असें वाटतें कीं शिवाजी महाराज मोठा अद्वितीय पुरुष होता.

या महावीराच्या अलौकिक गुणानें सर्व क्षत्रियकुळ मराठ्यांस व राष्ट्रीय प्रजा जनांस मोठें उत्तेजन आलें होतें. त्याबद्दल इतिहासकारांनीं पुष्कळ माहिती दिली आहे. श्रीशिवछत्रपति याजपाशीं जे जे नामांकित मराठे सरदार होते त्यांचीं नांवें येथें देणें उचित दिसल्यावरून तीं घेतलीं आहेत.

## नामांकित सरदार.

१ हसाजी हंबिरराव मोहिते सरनोबत. २ सावाजी भोसले सिंगणापुरकर. ३ मानशिंग मोरे. ४ जयशिंग पालकर. ५ अनंदराव निंबाळकर. ६ बाजी मोहिते. ७ पदाजी काटकर. ८ नेतोजी काटकर. ९ रामजी शिरके. १० वाघोजी शिरके. ११ हरजी राजे ह्माडिक. १२ खंडेराव दाभाडे. १३ महादजी नाईक निंबाळकर. १४ खंडोजी आटोळे. १५ गणोजी दरेकर. १६ कानोजी आंग्रे. १७ संताजी घोरपडे जुमलेदार. १८ गोविंदजी जगताप १९ संताजी जगताप. २० बाजी नळगे. २१ मालोजी नळगे. २२ संभाजी काळोजी. २३ रुपाजी भोंसले सरकारी सरदार २४ परसोजी भोसले २५ भुजबळराव. २६ अरेराव. २७ बहिरजी घोरपडे. २८ संभाजी काटकर. २९ सुर्याजी काटकर. ३० रावजी गडधे. ३१ देवजी उघडे. ३२ केरोजी पवार. ३३ गोमाजी नाईक पानसबळ. ३४ संताजीराव भोसले. ३५ महादाजी नाईक पानसबळ. ३६ मकाजी अनंदराव. ३७ पिलाजी शिरके. ३८ तानाजी शिरके. ३९ गणोजी शिरके. ४० संभाजी शिरके. ४१ जयाशिंग पालकर. ४२ अनंदराव हप्तहजारी. ४३ आचलोजी राजे ह्माडिक. ४४ तुकोजी पालकर ४५ येसजी थोरात. ४६ नेमाजी शिंदे. ४७ मुधोजी खाजनकर. ४८ धनाजी जाधवराव. ४९ तेलंगराव पागेसरदार. ५० व्यंकोजी खांडेकर जुमलेदार. ५१ सोमवंशी. ५२ कानोजी भाडलकर. ५३

बहिरजी नाईक इंगळे. ५४ खंडोजी जगताप. ५५ बुवाजी पवार. ५६ कृष्णाजी घाटगे. ५७ कृष्णाजी पवार. ५८ मालोजी निंबाळकर. ५९ हिरोजी शेळके. ६० खापणे. ६१ बहीरजी बांडगे. ६२ बळवंतराव देवकांते. ६३ परसोजी शितोळे. ६४ रामजी नळगे. ६५ येसाजी खांडेकर. ६६ आमदोजी पांढरे. ६७ अमृतराव निंबाळकर. ६८ बाळाजी नाईक निंबाळकर. ६९ भवानराव देवकांते. ७० माहार्णवर. ७१ काकडे. ७२ कडु. ७३ कोकाटे. ७४ ढमढेरे. ७५ बांडे. ७६ उचाले.

## मावळे लोकांचे सरदार.

१ एसजी कंक सरनोबत. २ तानाजीराव मालुसरे. ३ जिवा माहाला. ४ सोन माहाला. ५ राजपाटील येशवंतराव. ६ रामजी विश्वासराव. ७ कृष्णाजी नाईक. ८ कुडाळकर. ९ मलधंडे. १० हिरोजी रोटे. ११ रामजी मेरे. १२ तुकोजी लाड. १३ डोळे. १४ तानाजी दुदुसकर. १५ पिलाजी संग्रणस. १६ जिवाजी पारळे. १७ मुधोजी हुणकणे. १८ विठोजी कडु. १९ इंद्रोजी गोरड. २० महादजी फर्जंद. २१ जिवाजी मोहने. २२ हिरोजी भानगिरे. २३ मुधोजी खानवेलकर. २४ सुभानजी नाईक. २५ तानाजी सावंत. २६ कोंडाजी वळखले. २७ बाजीराव पासलकर. २८ बावाजी प्रभु देशपांडे. २९ बाजी मुरार देशपांडे. ३० ढवळे. ३१ हिरोजी फर्जंद ३२ नागोजी फर्जंद. ३३ हरबाजी फर्जंद. ३४ पारटे. ३५ ठाकुर. ३६ ढमाळे. ३७ दादाजी बापुजी देशपांडे. ३८ चिंतामणजी बापुजी देशपांडे. ३९ रामजी दळवी. ४० बागराव. ४१ दिनकरराव. ४२ मालोजी सांवत. ४३ तुळांजी फर्जंद. ४४ कृष्णाजी भोसले. ४५ येसाजी दरेकर. ४६ बाजीराव दरेकर. ४७ सोनजी दळवी. ४८ चांगोजी कडु. ४९ मुधोजी सासवडेकर. ५० राणुजी दरेकर. ५१ हरजी नाईक जासुद. ५२ खंडोजी नाईक जासुद. ५३ गणोजी कावळे. ५४ सोमाजी नाईक बंकी. ५५ सुर्याजी काळे. ५६ बापुजी मांडरे. ५७ सुर्याजी मालुसरे.

यां शिवाय पुष्कळ नामिनामि सरदार मानकरी शिवाजीपाशीं होतें. शिवाजी नंतरही मराठे लोकांनीं मोठीं शूरत्वाचीं कामें करून प्रख्यातीस आले; खेरीज विजापूर, अहमदनगर, गोंवळकोंडें, वऱ्हाड, बेदर, हैदराबाद, औरंगाबाद, आणि दिल्ली येथील मोगल बादशाही अमलावेळीं पुष्कळ मराठे लोक मोठमोठ्या योग्यतेस चढले होते.

ही जी सदरीं आह्मीं आमच्या क्षत्रिय कुळांविषयीं व त्यांच्या कर्तव्य कर्माबद्दल माहिती दिली आहे त्यापेक्षां आणखी कांहीं जास्त देण्याची इच्छा होती पण कामाच्या अनेक नडीमुळें वेळेची सवड होणें अशक्य झालें; तथापि कांहीं मुख्य मुख्य मुद्दे घेऊन हा विषय जुळविला आहे. इतक्याचाच विचार आमच्या बंधुवर्गांनी केला असतां आमची पूर्ण खात्रि होते कीं ह्या आमच्या श्रमाचें फळ कांहीं अंशीं तरी त्यांस मिळाल्याविना रहाणार नाहीं.

अशाप्रकारचे सुविचार आमच्या बंधुवर्गाच्या सेवेंत सादर करण्याचें साधन प्राप्त होण्यास आमचे परम दयाळु व निःपक्षपाति इंग्लिश सरकार हे होय. कारण आह्मांस आमचें मानवी देहाचें खरें कर्तव्य समजण्यास, सरकार विद्यादानाचा दीर्घ यत्न करीत आहे यास्तव आह्मीं आमचे बंधुवर्गांस असें सुचवितों कीं त्यांनीं विद्यागुणाची परिपूर्णता मिळवून इंग्लिश सरकारचे कृतज्ञतापूर्वक आभार मानावे आणि आपला प्रजाधर्म एकनिष्ठतेनें पाळावा. आपणांस प्राप्त झालेली कनिष्ठस्थिति व अज्ञानपणा दूर करण्यास हल्लींचा समय फारच योग्य आहे यास्तव तो व्यर्थ दवडूं नये. आणि अशा सद्मार्गीं जाण्यांस ईश्वर आपणां सर्वांस सद्बुद्धि देवो अशी इच्छा धरून हा विषय येथें पुरा केला आहे.

सभा.

१३–१४–१५–१६

ता० २८ एप्रिल सन १८८३

# फंड.

फंड—ह्मणजे कोणत्याही एखाद्या परोपकारार्थ जमा केलेलें द्रव्य ( भांडवल ) हा शद्ब इंग्रजी भाषेंतील असून मराठी शद्बा प्रमाणें प्रचारांत आला आहे, ह्मणून याची त्याच अर्थानें शिरोभागीं योजना केली आहे.

स्वपरहिताचा लाभ, जाणणारे सद्गृहस्थ यांजकडून फंडाची स्थापना किंवा वृद्धि होत असते. यास्तव ज्या स्थळीं असे फंड उभारले जातात, तेथें निराश्रितांस साह्य देण्याचीं, जाति लौकिकाचीं व देशहिताचीं कामें उत्तम रीतीनें बजाविलीं जातात.

युरोप देशांतील प्रत्येक राष्ट्रांत व त्याचप्रमाणें पृथ्वींतील बहुतेक भागांवरील देशांत असे फंड हमेशा लोकां कडून उभारले जात असतात; त्यामुळें तेथील लोक त्या द्रव्य बळावर मोठ मोठीं हिताचीं कामें साधून घेतात. आपल्या हिंदुस्थान देशांतही बंगाल व गुजराथ येथें लोक आपल्या उदार हस्तानें धर्मार्थ पैसा वसूल करीत असतात, त्या पैकीं गुजराथीवाणी लोक तर आपल्या उत्पन्नांतून प्रतिदिवशीं आणा, अर्धाआणा किंवा निदान पाव आणा तरी धर्मार्थ काढून ठेवितात. आणि समयानुसार जर कोणांस व्यापारांत मोठा फायदा झाला तर ते त्यामानानें बरीच मोठी रक्कम अशा कांमीं खर्ची घालितात, तेणें करून त्यांचा फंड फार लवकर वाढून लौकीक होत असतो. या बद्दल पांजरापूर, चेंबूर व भिवंडी येथील, उदाहरणें आहेत. पहा बरें, तेथें लक्षावधि पशु, पक्षादि जीवांचें कसें संरक्षण होत आहे! या खेरीज गुजराथी लोक फंडाच्या पैशानें, मोठ मोठीं देवालयें धर्म शाळा व जाति करतां महाजन वाड्या बांधीत असतात.

इंग्लंड, फ्रेंच इत्यादि युरपस्थ लोक आपल्या उत्पन्नांतून, रुपया मागें एक एक पै प्रमाणें देऊन फंड जमा करीत असतात, पण ते इतका लहान फंड देण्यास लाजीरवाणे समजत नाहींत; ते लोक फंडाचे इतके उत्सुक आहेत ह्मणून, त्यांस विद्यावृद्धि हुन्नर, कलाकौशल्य व नवे नवे

शोध करण्या करितां देशपर्यटणें व धर्म वृद्धि इत्यादि कामें अल्पश्रमानें साध्य करून घेतां येतात; शिवाय फंडाच्या स्थापने पासून लोकांत ऐक्य रक्षण होण्याचाही विशेष संभव आहे. ह्मणून ते लोक फंडास साह्य देण्यास कधींच मागें घेत नाहींत.

आमचे लोकांत या मासल्याचीं उदाहरणें कोठें तरीं आहेत काय? मुळींच नाहींत. बरें असलीं महत्वांचीं कामें व्हावी यतद्विषयीं कधीं कोणी आपलीं बुद्धि खर्चिली असेल काय? नसेलच यांत संशय नाहीं. कदाचित् असती तर, लोक इतक्या गैर समजांत कधींच निमग्न असतेना सर्व कामीं द्रव्याचीच गरज आहे आणि त्याचीच उणीव आह्मांत नजरेस येते तर मग राष्ट्राची सुधारणा व्हावी कशी? कदाचित् कोणी कांहीं रक्कम जमविली तर त्यांचा व्यय भलत्याच मार्गानें होऊन जातो अशीं कांहीं उदाहरणें लोक देऊन आपण स्वस्थ असतात, पण हा त्यांचा गैर समज आहे; कारण एकाकडून जरी गैर व्यवस्था झाली तरी तसेंच दुसऱ्याकडून होतें असें नाहीं. प्रत्येकाचे विचार निरनिराळे असतात त्या मुळें कोणी एखादा एखाद्या कामाचा शेवट करितो. ज्या कामांत पुष्कळ मंडळी असते त्यांत जर कोणी एखादा गैरमार्गी आढळला तर ते सामाजीक लोक त्याचा त्याग करून त्याचे ऐवजीं दुसऱ्या भल्या गृहस्थाची योजना करीतात. मग अर्थातच फंड नीटरितीनें चालण्याचा विशेष संभव आहे. हल्लीं लोक आपली दूरदृष्टि सोडून अल्पविचारांत गढले आहेत; यामुळें मोठा अनर्थ घडून येत असतो. असो, मागील काळ मागें पडला, याउपर तरीं आपले लोक विचार करून आपलें हित करून घेतील अशी आह्मांस आशा आहे. आमचे लोक पुष्कळ ठिकाणीं खेड्यापाड्यांतून वस्ति करीत आहेत त्यांस कांहीं हितावह होईल अशास्तव कांहीं सुचना द्याव्या असें दिसल्यावरून या पुढील ओळी लिहिल्या आहेत त्याजकडे ते लक्ष देतील अशी आह्मांस आशा आहे. जेथें जेथें आपल्या लोकांचा लहान मोठा भरणा आहे, तेथें तेथें लोकांनीं फंड स्थापन केल्यास विद्या वृद्धिस साह्य मिळून ज्ञान वाढेल आणि त्या फंडापासून गरीब गुरिबांस साह्य देतां येईल; कारण हल्लीं आपल्या लोकांची स्थिति कर्जाऊ देण्याघेण्यानें व सरकार देणें

वाढल्यानें फारच कनिष्ट प्रतिची होऊन राहिली आहे, त्या योगानें कित्येक लोक वतन भ्रष्टही झाले आहेत व होत आहेत.

अशा वेळीं जर कोणी समंजस लोक आपल्या बंधुजनाचें व वतनांचें रक्षण व्हावें या हेतूनें, गांवोगांवीं फंड स्थापन करतील, तर सर्व लोकाचें अनेक प्रकारें हित होईल. फंड स्थापन कर्यांनीं फंडास साह्य घेणें तें, द्रव्यरूपानें किंवा धान्यरूपानें जसें ज्यांजकडून मिळेल तसें घेऊन त्याचा सांठा व त्याची व्यवस्था इमानें इतबारें केली असतां फंड हवा तसा वाढत जाईल. आतां फंडास जें साह्य घ्यावयाचें तें मात्र ज्याच्या त्याच्या शक्तिप्रमाणें घेतलें असतां कोणास जड वाटणार नाहीं; आणि जरी कोणी अल्पाश्रय दिला तरी त्या फंडाचा उपयोग सर्वांस सारखा होईल अशी प्रत्येकास सूचना दिली पाहिजे.

अशा फंडाचे पुढारी गांवचे खोत, पाटील, देशमुख, शिवाय दुसरें कोणी शहाणे व वजनदार, परहित जाणणारे विश्वासू गृहस्थ असले पाहिजेत. त्यांचे आंगीं स्वार्थ साधकपणा मात्र नसावा, नाहीं तर योजना एका साठीं आणि लाभ दुसऱ्यास व्हावयाचा. परंतु आह्मांस वाटतें कीं, गांवच्या एकोप्यात पुढें सहसा कोणी लबाडी करूं शकणार नाहीं. असा दोन किंवा तीन वर्षें फंड वाढविला ह्मणजे त्याचा उपयोग विद्या वृद्धि-कडे व ज्या गरीब लोकांस धान्याचा तोटा येतो, त्यांस अति अल्पवा-ढीनें देतां येईल व पुढें ज्या प्रमाणें फंडाची रक्कम अधिक होईल त्या प्रमाणें सर्वत्रांस उत्तम उपयोग होत जाईल.

ज्या गांवचा फंड त्याच गांवच्या लोकांस उपयोगी पडावा. जे कोणी फंडांतून, धान्य अथवा द्रव्य नेतील त्यांजपासून तें नियमित वेळीं, हंगामीं परत घेण्याची व्यवस्था पुढाऱ्यांकडून राखली जावी. जो कोणी फंडाचा ह्याप्रमाणें उपयोग घेऊं इच्छिल, त्यानें फंडांतील धान्य अगर द्रव्य वेळच्या वेळीं परत करून त्याबरोबर अपली स्वतःची उगरणीही, देत जावी. शिवाय गांवीं देवालयें असतील त्यांचेंही उत्पन्न या फंडांत सामील करीत जावें, ह्मणजे तो फंड जास्त वाढून हल्लींचे चालू वादही बंद होतील.

या प्रमाणें फंड चालू झाला असतां लोक पुढारी मंडळीचे फार

आभार मानितील. कारण जे कित्येक ठकलोक सावकारगिरीचा धंदा करून लोकांस वतनभ्रष्ट करीत आहेत, त्यांच्या कावेबाजीतून गरिब लोक मुक्त होतील. हल्लींच्या सावकारगिरीचा थोडासा मासला येथें देण्यांत येत आहे.

पहा एखाद्या बिचाऱ्या गर्जु मनुष्यानें जर धान्य किंवा द्रव्य एखाद्या सावकारापासून आणिलें तर त्या बिचाऱ्याची फेड करतां करतां नाकीं नऊं येतात. तो तर बिचारा इमानानें जसें मिळेल तसें देत असतो, पण त्या रकमेचें व्याजही न फिटतां मुद्दल कायमच असतें, शेवटीं तो, बिचारा थकून निराशेनें मोठ्या चिंतेंत रात्रंदिवस असतो; तेणें करून त्याचे आंगीं कृपता व बुद्धिमांद्यता येते, मग अर्थातच एखाद्या हप्त्याची मुदत चुकण्याचा संभव असते, आणि असें झालें कीं, लगेच त्याचे सावकार बुवा जागे होऊन सरकार साह्यानें त्या गरिबाच्या जमिनीवर पहिल्यानें धाड घालतात; नंतर त्याच्या हक्काचें लिलांव करतात. आणि अखेर तीन पिढ्यांची कांहीं बाकी दर्शवून घरदारही जप्त करितात, त्या प्रमाणें तो गरिब मोकळा झाला कीं लगेच ते साधू त्यास युक्तिनें आपल्या घरचा चाकर करून सोडितात इतकें त्यांनीं केलें ह्मणजे त्यांचीं तृप्तता होते. अशा त्यांच्या कावेबाजीनें किती लोक नाहींसे झाले असतील त्याचा पत्ताही नाहीं.

हीं सर्व अरिष्टें एका फंड वृद्धीपासून बंद होतील आणि स्वार्थ साधक लोकांपासून बिचारे भोळसर व विद्यारहित जन, मुक्त होतील आणि कित्येकांचे वतनीहक्क तरीं यापुढें राहतील, नाहींपेक्षां मागील कित्ता पुढें चालणार. कोणी असा संशय घेईल कीं, जे आपले मराठे लोक हल्लीं कांहीं ठिकाणीं दिडीवाढीचा धंदा करीत आहेत ते असा फंड स्थापन करण्यास संमत्ति देणार नाहींत; कारण कांहींकांनीं परांचा अनुग्रह घेऊन आपला देशाभिमान व जात्याभिमान सोडून दिला आहे. पण त्याचा निर्णय इतकाच कीं त्या आमच्या विचारी बंधुंपैकीं ज्यांचे पहाण्यांत अगर ऐकण्यांत या सभेचा स्तुत्य हेतु येईल ते आपल्या मनुष्य देहाच्या खऱ्या कर्तव्यास कधींच विसरणार नाहींत

अशी आमची खात्रि होते. असो हा भाग येथें सोडून आपणांस आपल्या मुंबापुरस्थ बंधुवर्गांकडे जरा वळलें पाहिजे.

बंधुहो! या चालू फंडाकडें आपलें किंचित दुर्लक्ष झालें आहे पण ही आपली मोठी चुकी आहे. कारण फंडा पासून जसे लाभ होत जातील तसे इतर साधना पासून व्हावयाचे नाहींत, या विषयीं कांहीं दृष्टांत आरंभीं दिले आहेत.

त्याचा विचार करून कोणत्याही प्रकारचा अडथळा सार्वजनिक हितास आणूं नये, असें आमचें वारंवार सविनय सर्वांस कळविणें आहे. परोपकाराचें फळ जाणणारे सद्विवेकी पुरुष या पुढील श्लोकाचा भावार्थ जाणून आपला उदार आश्रय, देण्यास कधींच मागें घेणार नाहींत.

## श्लोक

हस्तादपिनदातव्या गृहादपिनदीयते ॥
परोपकरणार्थाय वचनेकिंदरिद्रता ॥

अर्थ—यद्यपि स्वहस्तानें दान करवत नाहीं आणि गृहांतूनही कोणाकडून देववत नाहीं तर ही एक गोष्ट असो, परंतु परोपकारार्थ आपलें वचन जर उपयोगी पडत असेल तर त्या विषयीं दरिद्रता करणें हें काय? तर हें अनुचित आहे.

कित्येक असा तर्क लढवितील कीं आह्मीं आठ आणे किंवा रुपाया दिल्यानें एवढें भारीं काम कसें उरकणार आहे! पण अशा समजानेंच केवळ आपला उदार आश्रय देण्यास कोणी कदापि मागें घेऊं नये; कारण जशी लहान लहान रक्कम देण्यास पुष्कळांस उत्कंठा असते तशी एखादी भारी रक्कम देणारास नसते ह्मणून लहान सान देणेंच फार योग्य व सतत चालण्याचें साधन होय. तस्मात् आपणास असा विचार केला पाहिजे कीं जरी आपली अल्प रक्कम आहे तरी पण आपणां सारखे दुसरे पुष्कळ गृहस्थ साह्यकारी होऊन हें काम कांहीं वेळानें तडीस जाईल, या विषयीं संशय घेण्याचें प्रयोजन मुळींच नाहीं. कारणः—

श्लोक.

जलबिंदुनिपातेन क्रमशः पूर्यते घटः ॥
सहेतुः सर्वविद्यानां धर्मस्यचधनस्यच ॥

अर्थ—उदकाच्या बिंदु बिंदुनें घट भरतो या प्रकारें क्षणोक्षणीं विद्याभ्यास केल्यानें ती पूर्ण होते, अल्प अल्प धर्म केला असतां तो ही वृद्धि पावतो तसेंच धन थोडें थोडें जमविलें असतां पुष्कळ संग्रहीं पडतें.

यास्तव सर्वांनीं दूर दृष्टी पोहोंचवून चालू कत्यास साह्य द्यावें अशी या सभेची विनंति आहे.

सभा.

१७-१८

तारीख १४ माहे मे सन १८८३.

## कलहनाशक निर्णय.

ही सभा आपल्या बंधुवर्गांनीं स्थापन केली आहे तिच्या मुख्य उद्देशांपैकीं ऐक्य वाढविणें हा एक हेतु होय. आणि त्याप्रमाणें सभेच्या उत्पादकांचें वर्तनही येथायोग्य रीतीचें चालू आहे. जे नवीन नवीन गृहस्थ सभेंत येत असतात त्यांस सभेचा ९ वा नियम कळविण्यांत येत असतो, असें असून ता० ७ माहे जुलई सन् १८८३ रोजीं सभेंत आलेल्या गृहस्थांपैकीं एक दोन असाम्यांनीं जीं भाषणें केलीं तीं अगदीं गैरशिस्तपणाचीं होतीं. ते शब्द वापरणारे इसम जरी नित्य सभेंत येणारे नव्हते तरी पण ज्या समाजास सभा हें नांव दिलें आहे तेथें असे प्रकार घडणें कितीतरी दूषणीय आहे; आणि दुसऱ्या मनुष्याची समाजांत अमर्यादा करणें हें लोकांस कसें प्रशस्त दिसत असेल तें असो. अशा वर्तणुकी पासून आपण थोर तर बनत नाहींच पण अज्ञानत्व मात्र पदरीं येतें. पहा! त्यादिवशीं रा. पांडुरंगराव यांचें

भाषण संपल्यावर एक सद्गृहस्थ आपले सुविचार मंडळीस मोठ्या कळवळ्यानें कळवीत असतां त्याचे समोर बसलेल्या गृहस्थांपैकीं कित्येकांनीं त्या वयोवृद्ध गृहस्थाविषयीं मत्सरता दर्शविली हींच काय थोरपणाचीं लक्षणें ? नाहीं नाहीं !! ती त्यांनीं त्यावेळीं मोठी चुकी केली. अहो आपणांस थोर ह्मणविणारांचें वर्तन किती गंभीरपणाचें सहनशीलतेचें व विचारीपणाचें असलें पाहिजे; कोणी कांहीं कां सांगेना त्यास उत्तर देणें तें सभ्यपणास युक्त असें दिलें पाहिजे. समयोचित भाषण, लीनता, सौम्यता हीं थोरपणाचीं लक्षणें दूर ठेवून अप्रयोजक भाषण करणें फारच अयोग्य होय. शहाणपणा काय कुळावर अवलंबून आहे ? मुळींच नाहीं. मनुष्य जसजसा व्यवहारिक, व पारमार्थिक ज्ञान संपादन करितो तसतसा तो लोक मान्यतेस पात्र होत जातो. याचीं उदाहरणें हजारों आपण आपल्या डोळ्यांनीं नित्य पहात असतां मुद्दाम डोळे झांकून रात्र कां करावी. याजविषयीं एक असा श्लोक आहे कीं,

**श्लोक.**

**कुला नामा करो नास्ति अकुलानांच भारत ॥**
**विद्यया तपसा वापि धने न धार्य ते कुलं ॥**

**अर्थ**—उत्तम कुळांत जन्मतो तोच उत्तम होतो, किंवा हल्क्या कुळांत जन्मतो तोच नीच होतो, असा कांहीं नियम नाहीं; परंतु विद्या, तप आणि सुमार्गानें मिळविलेली संपत्ति यांही करून मनुष्यास कुलीनता प्राप्त होते.

अशीं जर बुध वाक्यें आहेत, तर सर्वांनीं मत्सर रहित सुविद्या व सद्बुद्धि पाहिजे त्या मनुष्याकडून ध्यावी, मग तो कोणत्या कुळाचा धर्माचा व देशाचा कां असेना यांत कांहीं दोष नाहीं. आणि तसें जर नसतें तर सृष्टीचा व्यवहार कसा चालता ? दुसऱ्यास नीच ह्मणणें ह्मणजे त्यास आपल्या दाबाखालीं ठेवणें व आपण श्रेष्ठपणा मिरविणें हाच कायतो त्यांचा स्वार्थ होय. पण हे प्रयत्न कोठपर्यंत ? जोंपर्यंत प्रति पक्षाचा समज झाला नाहीं तोंपर्यंतच, अशा अल्प विचारांत गुंतण्या-

पेक्षां कोणी कोणाचा द्वेश न करितां सलगीनें व मित्रत्वानें वागल्यास विशेष फायदे आहेत-

जरी सभा एकाच यातीच्या हिताची असली तरी त्या सभेंत इतर गृहस्थांस येण्यास अवश्य परवानगी पाहिजे. पहा जेव्हां सार्वजनीक एखादें कृत्य करावें असें कित्येक मंडळीच्या मनांत वागूं लागतें, तेव्हां त्या कृत्याच्या संमत्तीस सर्व जातीचे लोक बोलावून सर्वांच्या विचारानें पुढारी मंडळी आपलें कार्य फत्ते करून घेते. तात्पर्य जितके लोक जास्त जमतील तितके अधीक बुद्धिवाद होऊन अनेकांचे सल्ल्यानें योजिलेलें काम निर्विघ्नपणें सिद्धीस जातें. सबब सर्व सभा स्थापकांचे उद्देश कोणास सभेस येण्यास अडकाठीचे नसतात. असें असूनही जे कोणी परक्यांस ( इतर यातीस ) आपल्या सभेंत येऊं देत नाहींत, त्यांची मसलत केवळ कपटीपणाची असते, असें खचित समजलें पाहिजे; कारण ते लोक आपले स्वार्थपणाचे विचार दुसऱ्यांस कळून आपली फजिती होऊं नये इतक्याच कारणानें इतरांस प्रतिबंध ठेवितात पण त्या समाजांस सभा हें नांव शोभत नाहीं, आणि बहुतांशीं ज्या समाजांत अन्य यातीचे लोक नसतात तेथें अन्याय होण्याचा संभव असतो. अन्य यातीचे लोक समाजांत असले ह्मणजे स्वार्थी लोकांची तुंबडी भरत नाहीं यास्तव ते इतरांचा तिरस्कार करितात, परंतु जे ज्ञाते आहेत त्यांजकडून असले अयोग्य प्रकार घडून येत नाहींत. सारांश सभेंत जाणाऱ्यां येणाऱ्यांचे आंगीं मत्सर असणें अज्ञानमुलक होय. यास्तव कोणी कोणास कांहीं बोलणें तें विचारपूर्वक बोलावें. कारण.

**श्लोक.**

**प्रिय वाक्य प्रदानेन, सर्वे तुष्यंति जंतवः ॥**
**तस्मात्त देव वक्तव्यं, वचने किं दारिद्रता ॥**

**अर्थ**—प्रिय भाषणानें सकळ प्राणी संतोषाप्रत पावतात तस्मात् सर्व जनांस प्रिय तेंच बोलावें, अप्रिय भाषणानें इतरांस असंतोषित

करूं नये, अशा प्रिय वचनांची काय दरिद्रता आहे. तात्पर्य—कठोर भाषण असंतोष उत्पन्न करणारें होय.

या सदरील वाक्याचा अर्थ आमचे सूज्ञ बंधु पूर्ण लक्षांत वागवितील. पहा त्या दिवशीं सभेंत पुष्कळ लोक आले होते व त्यांपैकीं कित्येक फार सभ्य वर्तणुकेचे होते; त्या सर्वांस तो प्रकार किति अप्रयोजक वाटला असावा बरें ? यास्तव असा प्रकार पुनः सभेंत होऊं नये एतद्विषयीं सभासदांनीं विशेष काळजी ठेविली पाहिजे, अशी त्यांस सूचना आहे.

सभा.

ता० २१ जुलई ८३ २६—२७—२८

## सभेचा पहिला वार्षिक समारंभ.

हा समारंभ ता० १८ आगष्ट १८८३ रोजीं माधव बागेंत झाला. त्या दिवशीं सभेचें अध्यक्ष स्थान रा० सा० अत्माराम बापुजी दळवी यानीं स्विकारिलें होतें, सभेचें काम सव्वा तीन वाजतां सुरू झालें, नंतर सभेचा वार्षिक रिपोर्ट अध्यक्षांच्या सूचनेनें सभेचे दुय्यम चिटणीस यांनीं वाचला त्यांत सभा स्थापन झाल्या पासून वार्षिक दिवसा पर्यंत एकंदर हकीकत, फंडाच्या जमा खर्चाचा हिशोब, ज्ञात बंधुंस विनंति व सभासदांस उत्तेजन इत्यादि विषय नमूद केले होते तो रिपोर्ट अक्षरशः येथें घेतला असतां कित्येक विषयांची द्विरुक्ति होते, सबब तसें करण्यांत आलें नाहीं.

रिपोर्ट वाचून झाल्यावर रा० रा० माधवराव राघोजी रोकडे, रा० रा० रामजी संतुजी आवटे, मे० सिमियन बेन्जामिन रा० रा० शिवरामराव कृष्णराव दळवी पोस्ट मास्तर, व घनःशाम भाऊ सावंत भोसले आश्रूडकर यांनी फंडाच्या व सभेच्या उत्तेजनार्थ सुरस भाषणें केलीं. शेवटीं अध्यक्षांनीं सुमारें एक तास भाषण करून सर्वांस

असें कळविलें कीं, हा क्षत्रिय ऊर्फ मराठा वर्ग सुमारें दोनशें वर्षांपूर्वीं किती उत्तम स्थितींत होता ह्याबद्दल इतिहासांत बरीच हकीकत अद्याप मिळत आहे. परंतु त्या सर्व क्षात्रिय कुळांचा उत्तरोत्तर मोड होत चालला आणि हें परमघोट राष्ट्र अशा ह्या चालू कपटरूपीं धर्मी जाळ्यांत गुंतून त्या सर्व क्षात्रिय कुळांस व राष्ट्रिय प्रजा जनांस केवळ गोगल गाईचें स्वरूप प्राप्त झालें आहे. याकारणामुळें हल्लींच्या क्षात्रिय वंशजांस आपला लौकीक व स्वदेशाभिमान मुळींच राहिला नाहीं, तथापि आज रोजीं त्या क्षात्रिय कुळांच्या नांवांची पाठी या सभेस पाहून माझें चित समाधान पावत आहे व या सभे सारिखा स्वधर्मोत्तेजक स्तुत्योद्योग आज सुमारें ५०० वर्षांत कोणी केला नव्हता. तथापि ही सभा क्षत्रिय कुळें ऊर्जित दशेस आणण्यांस सुमार्ग दर्शकच होणार आहे, असें या सभेंतील सुशिक्षित व उद्योगी लोकांच्या खटपटी वरून सुचिन्ह दिसत आहे. येणें प्रमाणें अध्यक्षांनीं तीन ठळक ठळक मुद्यां विषयीं चांगलें प्रतिपादन केलें.

सभेस रा० रा० मारूती तुकारामजी गव्हाणे व आणखी पुष्कळ प्रमुख गृहस्थ आले होते त्यांच्या नांवांचें टिपण करण्यास त्यावेळीं अवकाश न मिळाल्यामुळें तें येथें देण्यांत आलें नाहीं; मंडळी सुमारें ३०० होती, सर्वांची भाषणें झाल्यानंतर सभेचे चिटणीस यांनीं आलेल्या मंडळींचे आदर पूर्वक आभार मानून शेवटीं सर्वांस हार तुरे दिले आणि सभा ५॥। वाजतां विसर्जन झाली.

या सभेची हकीकत त्यावेळीं दिनबंधु वर्तमानपत्रीं प्रसिद्ध करण्यांत आली आहे.

सभा

ता० १८ माहे आगष्ट सन १८८३

## दसऱ्यानिमित्त समारंभ.

---

ता० २० अक्टोबर १८८३ रोजीं सर्वानुमतें विजया दशमी (दसरा) या दिवशीं, एक मोठी सभा, बाटलीवाल्याच्या धर्म शाळेंत भरली होती.

त्या समयीं रा० बळवंतराव रावजी मालप यांनीं आपल्या लोकांचें प्रस्तुतचें वर्तन व त्याज पासून होत आलेले वाईट परिणाम, याज बद्दल व्याख्यान दिलें. नंतर गोविंद कृष्णराव दळवी, रामचंद्र नारायणराव कदम व रामचंद्र राघोजी राव चवाण या त्रिवर्ग मुलांनीं, मुलांस सुशिक्षण मिळण्याचे अडथळे, विद्यावृद्धि, व द्वैतभाव या मुद्यांवर पृथक् पृथक् निबंध वाचले, नंतर जमलेल्या मंडळींतील कांहींकांनीं सभेचे नियम जास्त वाढविण्याविषयीं बरींच संयुक्तिक भाषणें केलीं तेणें करून कित्येकांत कांहीं अल्प मनोविकार होते ते जाऊन त्या दिवशीं १६ असामी जास्त सभासद झाले. असा समारंभ मुंबईंत मराठे ज्ञातिकडून कधींच घडून आला नव्हता, यास्तव बऱ्याच गृहस्थांचे असे उद्गार निघाले कीं, आह्मांतील मत्सर जाण्यास असे समाज उत्तरोत्तर होणें इष्ट होय कीं, तेणें करून आह्मांत पहिल्या प्रतिची सुधारणा होऊन मोठें हित होईल.

येणें प्रमाणें सर्व भाषणें व निबंध आटोपल्या नंतर सर्वांनुमतें सभेचे अध्यक्ष यांनीं शमी पूजन केलें, नंतर चालू रीति प्रमाणें एकमेकांस मोठ्या प्रेमानें भेटून मंडळीनें रजा घेतली. समाज मोठ्या थाटाचा झाला होता मंडळी सुमारें २०० जमली होती.

सभा

## निबंध.

ज्ञात वर्गास कळविण्यांत येतें कीं, या शहरीं आमचे ज्ञातिकडून लौकिकाचीं कृत्यें कोणत्याच प्रकारचीं घडून आलीं नाहींत, करितां जो हल्लीं उगरणी फंड चालू केला आहे, त्यांतही अद्याप पर्यंत व्हावी तशी रक्कम जमा झाली नाहीं; तेव्हां अशा मानानें या कृत्यास लागणाऱ्या खर्चाचा ( १५००० ) रुपयांचा अजमास आहे तो पुरा होण्यास आणखी कितिशी मुदत लागेल बरें ? याचा प्रत्येकानें लक्ष पूर्वक विचार करावा आणि आपण क्षत्रिय कुलोत्पन्न मराठे सबब या ईर्षेस आपल्या नाजूक हृदयीं स्थळ देऊन या कामीं यथा

शक्ति मदत देण्यांस मागें घेऊं नये. या कामीं मदत देण्यास जे गृहस्थ आपणास वारंवार सूचना करित आहेत त्यांचीं मनें व्यर्थ कुतर्क काढून उद्विग्न करूं नये, कोणीही सत्कृत्याच्या कामीं पुढें सरसावल्यास त्यास योग्य आश्रय देणें आपलें प्रथमचें कर्तव्य आहे; आणि या योगानें खरी बंधु प्रीति संपादन केल्याचें उत्तम फळ नजरेस येणार आहे.

अहाहा ! काय सांगावें सभा स्थापन होऊन बारा महिने झाले आणि या सभेनें आपलें खरें कर्तव्य बजाविण्याचा हेतु धरून सर्वांस नम्र वाणीनें व खऱ्या कळवळ्यानें रात्रंदिवस सभेत अथवा ज्या ज्या ठि-काणीं बंधुजनांची भेट होते त्या त्या स्थळीं निरालस्य पणानें दोन शब्द कळवीत असतांहीं त्या विनंतीकडे आपलें दुर्लक्ष असावें काय ! असो. परमेश्वर सत्तेनें आपण पुढें एकमेकांचे प्रीतीस पात्र होऊं याज विषयीं तिल: प्राय संशय नको.

हल्लीं सदरील कृत्या करितां जागा घेण्याचा विचार मंडळीकडून चालला आहे याज करितां सर्वत्रांनीं द्रव्य सहाय्य देण्याची त्वरा करावी, कारण पुढें काम चालण्यास अडथळा न येतां लवकर इमारत तयार होईल आणि असें झालें ह्मणजे आपला कीर्तिध्वज मोठ्या उल्हासानें चिरकाळ फडकत राहील.

जों जों लिहावें तों तों अल्पच वेळ खर्च झालासें वाटतें परंतु आपणांस कंटाळवाणें वाटेल या भीतिनें मी येथें पुरें करतों.

आपला.

**रघुनाथ विठोजी जाधवराव.**

दु. चिटणीस.

ता० १ दिसेम्बर १८८३

**सभा.**

२३.

# गिरणींतील व इतर कारखान्यांतील लोकांकरितां सभा.

सभेच्या नित्य क्रमाप्रमाणें बुकें वगैरे तपासून झाल्यावर जी नवीन मंडळी सभेस आली होती त्यांपैकीं कांहींकांच्या प्रश्नांचीं योग्य उत्तरें अध्यक्ष यांजकडून देण्यांत आलीं. नंतर त्या जमलेल्या मंडळीनें आपला उत्तम अभिप्राय देऊन साह्य देण्याचें कबूल केलें. तदनंतर सभेंत एक निबंध वाचला गेला तो येथें अक्षरशः दिला आहे.

## निबंध.

माझे प्रिय बांधवहो:— आपण या ठिकाणीं कोणत्या उद्देशानें एकत्र जमलों आहों हें बहुतकरून सर्वांस विदितच आहे; व ह्याविषयीं अनेक व्याख्यानें व निबंध विद्वज्जनांकडून सभेंत सादर करण्यांत पूर्वीं आले होते. तेव्हां मजसारख्यानें विशेष कळविलें पाहिजे असें नाहीं. परंतु ज्या अर्थी आज रोजीं मंडळी बरीच जमणार आहे, असें मजला कळलें होतें त्याअर्थी कांहीं तरी ल्याहावें असें वाटल्यावरून थोडेंसें लिहून आणिलें आहे.

जेव्हां जेव्हां आह्मीं प्राचीन इतिहास वाचतों, तेव्हां तेव्हां आपल्या पूर्वजांनीं पूर्वीं कसकसे पराक्रम केले आणि त्यांजमध्यें देशाभिमान व बंधुप्रीति कोणत्या रीतीची होती वगैरे प्रकार पाहून आमच्या मनास विलक्षण प्रकारचा आल्हाद होतो. परंतु आमची सांप्रतची विपरीत स्थिति पाहून मोठा खेद उत्पन्न होतो. अशी स्थिति प्राप्त होण्याचीं जीं कारणें आहेत तीं अझूनही कोणाच्या लक्षांत येत नाहींत. यामुळें मोठें नुकसान होत आहे. पहा आह्मांमध्यें निरर्थक अहंपणा व दुसऱ्यांचा ( आपसांत स्वयात बांधवांचा ) हेवा करणें, हे दुर्गुण मात्र पूर्ण भरले असल्यामुळें आमच्या लोकांतील एकीचा समूळ ऱ्हास झाला आहे. तेणेंकरून यातीचा दुर्लौकिक होत असून उत्त-

रोत्तर हानीच होत चालली आहे. मानवी प्राण्यांची सज्ञान किंवा अज्ञान स्थिति जरी असली तरी ऐक्यतेच्या बळकटीनें मोठमोठीं अरिष्टेंही दूर होतात. याजबद्दल मागें एकवेळ सभेकडून एकी या विषयावर प्रतिपादन करण्यांत आलें आहे; ह्मणून मजला जास्त ल्याहावेसें वाटत नाहीं.

हल्लीं इंग्रज सरकारच्या राज्यांत जरी सर्वांस निःपक्षपातानें विद्या मिळत आहे तरी पण आपले लोक फारच थोडे याकामीं पुढें सरले आहेत. त्यांतील कित्येक आपल्या ज्ञात वर्गाची अशी अज्ञान स्थिति पाहून ती सुधारण्याच्या खटपटीस लागले आहेत; व कांहीं आपल्या मुलांस ज्ञान संपन्न करण्याच्या मार्गास वळले आहेत, तेव्हां ह्या सुचिन्हावरून आमचे यातीचा दिवसेंदिवस पुनः उत्कर्ष होण्याचा रंग दिसत आहे.

स्वसत्ता दुरावल्यापासून आह्मां क्षात्रियधर्मी लोकांची मोठी निर्भत्सना होऊन निराश्रितपणा प्राप्त झाला आहे. आणि उदर निर्वाहाचीं संकटें येऊन पडलीं, त्यामुळें आपले लोक ज्यांस जो धंदा पसंत पडला त्याजवरच आपला चरितार्थ चालवूं लागले आहेत.

इंग्रेज सरकारच्या अमलांत जे कलाकौशल्यादि अनेक प्रकारचे कारखानें स्थापन झाले आहेत त्यांत राहून आपल्या बुद्धि चातुर्यानें व अंगश्रमानें आपले लोक मोठमोठे हुद्देही मिळवीत आहेत. गिरण्यामध्यें तर आपल्या लोकांचा फारच मोठा भरणा आहे आणि ईश्वर कृपेनें कित्येकांस मास्तरगिरीच्या जागाही मिळाल्या आहेत त्या योगें त्यांच्या हाताखालीं स्वयातितील व परयातितील लोकांचा पुष्कळ भरणा असतो यास्तव एखादें सत्कृत्य करणें झाल्यास त्यांजकडून साह्य मिळण्याचें चांगलें साधन आहे, असें असतांही अद्यापपर्यंतकां साह्य मिळालें नाहीं! असा प्रश्न केल्यास त्याचें उत्तर इतकेंच कीं, ह्या चालू कृत्याबद्दल त्या लोकांस सुचना देण्याची ही प्रथमचीच वेळ होय तथापि ज्या कित्येकांस याजबद्दल माहिती कळली होती त्यांजकडून कांहीं रक्कम सभेकडे पोहोंचती झाल्याचें सर्वांस माहीतच आहे.

या मुंबई शहरीं अनेक ज्ञातींच्या लोकांनीं आपापल्या ज्ञातींच्या उपयोगाकरितां जागा वगैरे अनेक साधनें करून ठेविलीं आहेत त्यामुळें त्यांच्या गैरसोयी वेळच्यावेळीं दूर होत असतात; परंतु ज्या ज्ञातीचें नांव ह्या राष्ट्रास व्यापून आहे व जी आपली ही मूळ जन्मभूमि कीं जिचा आह्मी मोठा अभिमान वहातों. त्या आमच्या लौकिककार्थ या शहरीं मुळींच कांहीं झालेलें नाहीं हीं किति आश्चर्याची गोष्ट आहे? तरी पण आतां जे कित्येक सूज्ञ गृहस्थ पुढें सरून आज सुमारें एक वर्षपर्यंत श्रम घेत आहेत त्यांस जर आपण उघड मनें करून ह्या धर्म कृत्यास मदत दिली तर इष्ट हेतु तडीस जाण्यास विलंब लागेल असें नाहीं.

या महाराष्ट्र देशांत अनेक देशांतून अनेक जातीचे व धर्माचे लोक येऊन वास्तव्य करीत आहेत, त्यांची स्थिति आह्मांपेक्षां पुष्कळ पटीनें चांगली आहे असें असतां आमचीच अशी दुर्दशा कां! बरें असो. आमचे लोक आपल्या वाडवडिलांच्या रीतिभाति चालविण्याचा मोठा बाणा बाळगितात, परंतु विचार करून पाहिलें असतां ज्या हितकारक अशा वाडिलार्जित चालत आलेल्या रीति त्या ते मुळींच चालवीत नाहींत असें ह्मटलें तरी चालेल; कारण पहा आपले वाडवडील हाल्लिंसारख्या बाल विवाहादि दुष्ट चाली चालवीत होते काय? ते किति एकोप्यानें वागत होते? आणि त्यांचेच वंशज आह्मी त्या आह्मामध्यें हल्लीं कितिसा एकोपा आहे? तर सज्जनहो, वडिलांच्या ज्या चांगल्या चाली असतील तेवढ्याच स्विकारा व वाईट असतील त्या सोडून द्या. जरी कित्येक चाली त्या काळास अनुसरून होत्या तरी त्या हल्लीं कालमानाप्रमाणें अयोग्य झाल्या आहेत. करितां त्याचा सारासार विचार करून चालू काळास अनुसरून स्तुत्य वर्तन ठेवाल अशी आशा करतों. आतां एका स्वदेश हितेच्छूनें आपल्या देशबांधवांस बोध केला आहे तो देऊन हा निबंध पुरा करितों.

**श्लोक.**

**स्वराज्य नष्ट जहालें स्वधर्म भंग पावला ॥**
**स्वदेश अन्य जानियाचिया कराम लागला ॥**

सहस्रशा कुलीन लोक दीन भीक मागती ॥
कळेन हें तुह्मांस काय मंद जाहली मती ॥ १ ॥
पदोपदीं तुह्मांस तुच्छ मानितात ते पहा ॥
स्वदेश तुमचा तूह्मांस पारखा कसा अहा ॥
परोपरी करूनी युक्ति ते तुह्मांस वंचिती ॥
कळेन हें तुह्मांस काय मंद जाहली मती ॥ २ ॥
तथापि ते कृपा करोनियां तुह्मांस पाजिती ॥
सुशिक्षणामृता सदा तयास रीति शोभती ॥
झटा अहर्निशी श्रमें प्रबुद्ध लोक व्हावया ॥
तसे स्वदेश भव्य एक निष्ट ते करावया ॥ ३ ॥
स्वतंत्रता तशी सुखें अनेक तुह्मां लाधती ॥
जियेचिया सुराजियामध्यें सभाग्य धन्यती ॥
जगत्पति कृपेचिया करूनि चक्र वर्तिनी ॥
करो समस्त हेतु पूर्ण तूमचे सुवर्तनी ॥ ४ ॥

आपला.

रघुनाथ विठोजी जाधवराव.

दुय्यम चिटणीस.

सभा.

४९

तारीख १९ दिसेंबर १८८३

या सभेस मंडळी सुमारें १९० होती. सदरील निबंधा संबंधी अध्यक्ष यांनीं आपला चांगला अभिप्राय देऊन बराच वेळ भाषण केलें.

# हरि कीर्तन कारांस सभेकडून मिळालेल्या आश्रया विषयीं हकीकत.

---

२९ व्या सभेंत ठरल्या प्रमाणें रा० रा० गणपतराव लक्षुमण भुजबलराव यांनीं सभेचे अध्यक्ष व इतर मंडळींचे संमत्तीनें शहरवासी बंधुवर्गांस व मित्र मंडळीस आमंत्रण चिठ्या पाठवून रा० रा० घनःश्याम भाऊ सावंत भोसले आश्रूंडकर यांजकडून ता० १३ माहे आगष्ट सन १८८३ रोजीं हरि कीर्तन करविलें त्या समाजास मंडळी सुमारें ३०० शांवर होती त्या समयीं बावाचा हा स्तुत्योद्योग व समयास योग्य असा धीटपणा व पाठशक्ति पाहून सर्व मंडळीस मोठा आनंद झाला. कीर्तन दोन तास पर्यंत होऊन आर्ति झाल्यानंतर रा० रा० शिवराम देवराव कालेकर या गृहस्थानें सभेस व जमलेल्या मंडळीस सुचनार्थ अति सुरस व मनोवेधक भाषण केलें. आणि त्यावेळीं त्यानें जो एक पवाडा ह्मटला तो सर्वांस फारच पसंत झाला होता. तो पुस्तकाच्या शेवटील पानीं दिला आहे.

नंतर सर्वांनीं कीर्तनकार बुवास आपला उदाराश्रय देण्याचें अभिवचन दिलें आणि त्यावेळीं मंडळी कडून बुवास अशी सूचना देण्यांत आली कीं, ज्या पेक्षां हा उद्योग आपण स्वीकारिला आहे त्यापेक्षां आपण आपल्या सर्व मंडळीस क्षत्रिय धर्मां संबंधी दिवसें दिवस अधिक उत्तेजन देत असावें कीं, जेणें करून त्यां मध्यें उत्तरोत्तर जास्त सुधारणा होत जाईल. या प्रमाणें आणखी हीं ब-याच मुद्यांवर मंडळी कडून सूचना झाल्या. शेवटीं समाज विसर्जन होते वेळीं बुवानीं सभाजनांचे आभार मानले. तदनंतर खुद्द सभेंतील मंडळीनें बावा कडून ठिकाठिकाणीं नऊ कीर्तनें करविलीं त्यावेळीं सभेंतील बहुतेक मंडळी हजर असे पुढें बुवाचा सर्व याति परयातींत बराच परिचय होऊन त्यांची प्रशंसा झाली.

कांहीं महिने लोटल्या नंतर रा० रा० बळवंतराव आबा साहेब

दाभाडे वाईकर यांस सभेनें आश्रय देऊन त्यांचें प्रथम कीर्तन ता. २० डिसेंबर सन् १८८३ रोजीं सदरील ठिकाणीं करविलें त्यावेळीं मंडळी सुमारें ४५०जमली होती हें कीर्तन सुरू होण्या पूर्वीं सदरील दाभाडे यांच्या साधेपणाच्या चर्ये वरून जमलेल्या मंडळी पैकीं कित्येकांस असा संशय उत्पन्न झाला कीं, आजच्या समाजाचा थाट व उत्तम व्यवस्था असतां त्या समारंभास शोभण्या सारखें बुवाकडून कितन होण्यांचा रंग दिसत नाहीं; अशीं कांहीं भाषणोत्तरें चाललीं होतीं, तों कीर्तनास आरंभ झाला. तेव्हां त्या प्रसंगास अनुसरून दाभाडे यांनीं बाळपणा पासून आपणास मिळालेलें शिक्षण व वडिलोपार्जित उपदेशकपणाचें खरें चित्र मंडळी समोर उभें केलें. तेव्हां सर्व त्र चकित होऊन गेले; कारण बुवानें मोठ्या उल्हासानें तीन तास किर्तन करून आपली स्मरण शक्ति व अनेक ग्रंथांतील मिळविलेली माहिती यांचें अत्युत्तम निरूपण केलें बुवाच्या त्या उत्तम शैलीवरून मंडळींत उद्भवलेल्या संशयांचें अगदीं निर्सन होऊन गेलें. शेवटीं आर्ती झाल्या नंतर सर्वांनीं बुवांची योग्य व्यवस्था लावण्या विषयीं वचन देऊन समाज बरखास्त केला.

सदरील दिलेल्या वचना प्रमाणें मंडळी कडून निरनिराळें जागीं १२ कीर्तनें झालीं; त्या प्रत्येक समाजास मंडळी सुमारें ४०० शें जमत असे. त्या प्रत्येही वेळीं कीर्तन आटोपल्या नंतर सभेतील मडळीकडून चालू फंडा विषयीं अर्धतास भाषण होत असे यापमाणें वाटाघाट बरेच दिवस चालली होती. एके दिवशीं चिंचपुगली येथें दाभाडे यांचें किर्तनास मंडळी सुमारें ५०० शें जमली होती त्यासमयीं कीर्तन आटोपल्यावर मंडळीच्या सूचने वरून रा० कृष्णाजी यशवंतराव चव्हाण व सभेचे सक्रेटरी यांनीं सभेबद्दल एकतास पर्यंत व्याख्यानें दिलीं.

येणें प्रमाणें क्रम चालल्या कारणानें दाभाडे यांची फारच प्रख्याती झाली. शेवटीं सदरील कीर्तनकार यांस ता० १८ फेब्रूआरी सन १८८४ रोजीं सभेकडून त्यांच्या अमोल्य गुणांबद्दल एक मोठा

समाज भरून रा. दाभाडे यांस मानपत्र देण्यांत आलें त्याजवर १६७ गृहस्थांच्या सह्या आहेत.

याप्रमाणें प्रशंसेस पावलेले दाभाडे यांची कीर्ति पुणें जिल्ह्यांतील जुन्नर व ओतूर येथील सत्यशोधक समाजाचे अध्यक्ष रा. रा. भाऊ कोंडाजी पाटील डुमरे व इतर मंडळीनें ऐकून जी एक टोलेजंग सभा ता. ९ माहे मे १८८४ रोजीं धर्मसंबंधी विषयांवर जुन्नर येथें भरली होती त्या सभेस त्या मंडळीनें दाभाडे व अवंतर ठिकाणची मंडळी यांस स्वखर्चानें बलावून नेलें होतें. त्यावेळीं त्या समाजास उचित अशाच प्रकारचे शास्त्रोक्त आधार बुवांनीं सभेपुढें सादर केल्या वरून त्यासमयीं जमलेल्या एकंदर लोकांची इच्छा तृप्त झाली. त्या सभेस स्वधर्माभिमानी मराठे लोक व परधर्मी लोक मिळून एकंदर ४००० वर होते. तो समाज सतत तीन दिवस पर्यंत चालला होता. त्या समाजातील मंडळीनें बुवांस शेलापागोटें बक्षिस दिलें. कीर्तन-कार दाभाडे हे जुन्नर येथून मुंबईस पंधरा दिवसांनीं परत आल्यावर त्यांस मुंबईतील कित्येक सद्गृहस्थांकडून उत्तम आश्रय मिळाला आणि त्यांच्या सर्वोत्कृष्ट गुणाचें त्यांस चांगलें फळ प्राप्त झालें व होत आहे.

सारांश गुण संपन्न मनुष्याची कधीं व कोणत्या वेळीं प्रशंसा होऊन कीर्ति होईल याचा दाखला वरील उदाहरणांवरून सर्वांच्या सहज लक्षांत येणार आहे. यास्तव सद्विद्या व सद्गुण यांचा सांठा सर्वांनीं अवश्य केला पाहिजे. लोकांमध्यें ऐक्य असल्यानें कसा लौकिक वाढतो याचाही मासला सदरील दोन्ही कीर्तन कारांच्या उदाहरणांवरून स्पष्ट नजरेस येणार आहे; करितां बंधुवर्गांनीं एकी व विद्या यांजकडे अवश्य लक्ष द्यावें असें सर्वांस कळविणें आहे.

सभा.

ता. २० माहे दिसेंबर सन् ८३

# सभासदांविरुद्ध इतरांचें वर्तन व त्याबद्दल सभेचा निर्णय.

आज सभेच्या हिशोबाचें काम वगैरे आटोपून बरीच वेळ राहिली आहे. या वेळेंत, ता० २९ दिसेंबरच्या सभेंत ठरल्या प्रमाणें, "बाळ पणीं लग्न " या विषयावर व्याख्यान व्हावयाचें होतें, परंतु तो विषय पुढील सभेवर ठेवून आज या सभेसंबंधी जो मतभेद ऐकू येत आहे त्याचा विचार आपणास आधीं केला पाहिजे. याजकरितां सभाजनांनीं कदाचित् वेळ झाल्यास तस्दि मानूंनये अशी विनंति आहे. हा विषय हातीं घेण्याची वेळ कधीं येऊंनये असा आह्मां सर्वांचा विचार असतां ही त्या कामीं आपणास विचार करणें भाग पडलें, ही मोठी सखेदाश्चर्याची गोष्ट समजली पाहिजे. असो,

सभेच्या मंडळीनें आपल्या कर्तव्याचे नियम घालून तें काम मोठ्या उल्हासानें चालवीत असल्या कारणानें सभेस पुष्कळ मंडळी सामील होऊन द्रव्यांशही बऱ्याच प्रकारें जमा होत आहे, व सभेंत अनेक उपयुक्त विषयांवर वादविवाद हमेशा चालत असल्यामुळें आपल्या बंधु जनांस आपलें खरें कर्तव्य कोणतें इत्यादि अनेक प्रकरणांत आपली समजूत करून घेण्याचें फार स्वल्प साधन झालें आहे. ह्मणून मंडळी ही बरीच नित्य जमत असते. आणि त्या योगें सभेस चढती कळा येण्याचा संभव आहे; हें आमच्या हिंदु धर्मांतील कांहीं लोकांस केवळ दुःखप्रद भासून त्यांनीं आमचे बंधुवर्गांचीं निर्मळ मनें विकल्पानें दूषित केलीं. त्यायोगें ते आपल्या कर्तव्यास विसरून आपले अल्पविचार बाहेर झुगारून देण्यास मागें पुढें पाहत नाहींत, आणि निरर्थक वाद करित असतात. त्यांचा हेतु कीं या लौकिकाच्या कामीं श्रम घेणारांचा उपमर्द व्हावा; परंतु आमच्या मनाची अशी खात्रि होते कीं हें त्यांचें कृत्य अगदीं गैर समजाचें (कुऱ्हाडीचा दांडा गोतासकाळ) होय कारण, ज्या पेक्षां ही सभा कोणी कोणत्याही मुद्यावर कसेंही भाषण

करून आपले उद्गार सभे पुढें आणल्यास त्याचें मोठ्या सौम्यतेनें संयुक्तिक उत्तर देण्यास किंवा ते सुविचार असें नजरेस आल्यास ग्राह्य करण्यास तयार आहे; त्या पेक्षां जे लोक सभेंत न येतां भलतेच कुतर्क काढित बसतात, ते त्यांचें करणें सभ्यतेचे नव्हे असें ह्मणण्यास हरकत नाहीं, पण त्यांचा तरी काय इलाज. त्यांस जर मूळ शिक्षण चांगलें नाहीं, तर कोण कशा भावा र्थानें आपणास आपल्या ज्ञात बंधूच्या हेतुस बाध आणण्यास पुढें करून आम्हांत चाललेले वाद मोठ्या मौजेनें पहात असतात. हें त्यांस कळण्यास साधन काय आहे? मूळींच नाहीं. परंतु इतकेंच मात्र आहे कीं मनुष्य देहांत ईश्वरानें जी विचार शक्ति ठेविली आहे तिचा उपयोग रास्त मार्गें करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य होय. आह्मांस ही लोककृति पाहून मोठें आश्चर्य वाटतें? कारण मुंबईसारख्या शहरीं राहून नदींतील वाळु प्रमाणें आपले विचार ठेवणें हें मनुष्य देहास लाजीरवाणें होय. आपणाकडून जर एखादें कृत्य होणें अशक्य आहे तर तें व्हावें अशी इच्छा तरी मनीं बागवावी ह्मणजे मोठें भूषण होणार आहे एरवीं व्यर्थ तळमळ काय कामाची. असो, आह्मीं आमचे सभासदांस असें सुचवितों कीं, त्यांनीं लोकांच्या व्यर्थ बडबडीकडे विशेष लक्ष न देतां आपलें कर्तव्य करीत असावें, याचें कारण मागील काळच्या शहाणे जनानीं असा सिद्धांत ठरविलेला आहे कीं, जे कोणी जास्त वाचाळपणा करतील ते फार लवकर उमजतील. आणि अशा प्रकारचीं उदाहरणें शेकडों आहेत. आणि आपणास पक्कें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, जर कोणी मनुष्य स्वपराहिताचें काम करूं लागला तर त्यास दोन साधनें लागतात. एक स्वतःची उत्कंठा व दुसरें पराचें दूषण ह्या दोन्ही संयुक्त कारणांनीं कार्य कर्ता मोठ्या सावधपणानें व जलद अथवा कसें तरीं तें योजलेलें कार्य शेवटास नेतो. याजवरून आपणास त्या बडबड करणाऱ्या लोकांचा मोठा आभार मानला पाहिजे. कारण कीं ते आपणास या कामीं उत्तेजनच देत आहेत असें समजलें पाहिजे. आपण आपलें हातीं घेतलेलें काम मोठ्या दक्षतेनें व शुद्ध अंतःकरणानें बजाविणें आपलें कर्तव्य होय याज विषयीं बुधजन असें

ह्मणतात कीं, उद्योगी कोण ?—जो संकटांस भीत नाहीं तो. शहाणा कोण ?—जो दूषणांस भीत नाहीं तो. शिवाय साधु तुकाराम काय ह्मणतात "निंदकाचें घर असावें शेजारीं" ह्मणजे निंदक जस जसे गौण काढीत असतात तस तसे विचारी व उद्योगी लोक आपलें काम मोठ्या ईर्षेनें करितात याज करितां आह्मी आमचे सभासदांस असें विनय-पूर्वक कळवितों कीं, आपण आपल्या कामीं तत्पर असणें हेंच लक्षण कुलीनपणाचें होय. आजचे वेळीं इतक्यावरच हें व्याख्यान संपविण्यांत येत आहे, कदाचित् आणखी कांहीं कमजास्त प्रकार समजण्यांत आल्यास त्याचा दुसऱ्या वेळीं विचार करूं परंतु तसा प्रसंग बहुतांशीं येणार नाहीं अशी आह्मीं आशा करितों.

सभा.

४९-५०

तारीख १२ जानेवारी १८९४.

# बालविवाह.

हें आजचें व्याख्यान पुष्कळांस प्रथमतः कांहीं विपरीत प्रकारचें भासणार आहे, परंतु त्याचा विचार केल्यावर तें महत्वाचें दिसल्या शिवाय रहाणार नाहीं.

सांप्रत काळीं आह्मां लोकांमध्यें कांहीं रीतिभाती बिघडल्या कारणानें अनेक अनियमित प्रकार अमलांत आले आहेत त्यां पैकींच बाळपणीं लग्न करण्याची चाल फारच दुःखकारक होऊन गेली आहे; कारण अल्पकाळीं लग्न झाल्याच्या योगानें लोक अल्पायुषी व रोगिष्ट निपजत चालले आहेत; याबद्दल कित्येक लोक हवीं तीं मतांतरें घेऊन चालुरिवाजच बळिष्ट करीत असतात. पण जर लोक थोडासा विचार करून शास्त्राज्ञा कशी आहे ती पहातील व आपलें वर्तन सुधारतील तर पूर्वींच्या लोकां प्रमाणें सदृढ, दीर्घायुषी आणि पराक्रमी होतील. परंतु लोक याचा तिळःप्राय विचार न करितां पांच किंवा सातवर्षांचा मुलगा झाला कीं त्याचें लग्न कसें होईल याच विवं-

चनेंत रात्रं दिवस राहून मोठा यत्न करून वधुवरांचे गुण दोषांकडे न पहातां अथवा तीं पुढें कोणत्या गुणांचीं निघतील यांचा विचार न करतां कोणी द्रव्य लोभानें, कोणीं आपण मुलाचें लग्न केलें ह्मणजे धन्य होऊं या आशेनें, कोणा दुसऱ्याच्या आग्रहानें, कोणीं दुसऱ्याच्या चटिनें, अशा अनेक प्रकारच्या समजुतीनें जवळ द्रव्य नसलें तरीं कर्ज काढून कोणी कडून तरी दगडीवर दगड घालून तें सिद्धीस नेतात. परंतु पुढें थोड्याच काळांत तें जोडपें मोठें होऊन आईबापा देखत आपल्या स्वभाव भिन्नत्वा मुळें कलह करून वडिलांची अवज्ञा करितें. एखादे प्रसंगीं तीं मुलें आपल्या नातेवाइकांस सोडूनही चालतीं होतात. तेणें करून केलेल्या खर्चाबद्दल व काढलेल्या कर्जाविषयीं आईबापांस मोठा पश्चात्ताप होतो व जें जोडपें लहान पणां गोजीर वाणें दिसत होतें तें पुढें शत्रू- प्रमाणें भासं लागतें.

जो काळ विद्या संपादन करण्याचा व ज्या वयांत शरीर बळकट व्हावयाचें असतें तो काळ व्यर्थ जाऊन मुलगा संसार जाळ्यांत सांपडून मुलां बाळांचा धनी होतो; त्या योगें त्याचा सर्व वेळ अन्नादकांच्या काळजींत गुतून त्यास दैवहीन, विद्याहीन, व दुर्बलता प्राप्त होतात मग अर्थातच त्या प्राण्यास जन्मभर काबाडकष्ट करूनही सुखाचा लेश मिळत नाहीं.

दुसरा प्रकार. पहा— अल्प वयांत मुलास यौवन प्राप्त आहे किंवा नाहीं याचा संशय आहे तों इतक्यांत स्त्रिविषय लुब्ध झाल्यानें त्यास दुर्गुण आणि अपुरुषत्व प्राप्त होतें. आणि त्या[illegible] जन्माचें सार्थक न होतां उलटी फजिती मात्र होते. आणि असा त्याचा बद लौकीक झाला ह्मणजे सर्व कुटुंबाचाही होतो. ह्याच प्रमाणें मुलगी ऋतुमति होऊन तिच्या आंगीं सदृढपणा येण्यापूर्वींच अपक्क स्थितींत तिजला पुरुष संसर्ग झाल्यानें एक दुसरें अपत्य झालें नाहीं तोंच क्षीणता येऊन त्या पासून बाळंत रोग किंवा अशा अनेक तऱ्हेच्या दुसऱ्या व्याधी जडतात. त्यामुळें थोड्याच काळांत तिचाही संसार आटपतो. मग आईबापांनीं लवकर लग्न करून शिफारस काय मिळविली ? स्त्रिपुरुषानीं ताळ सोडला इतकेंच मात्र ह्मणावें लागतें.

असें करण्यापेक्षां लहानपणीं आपलीं मुलें शहाणी केलीं तर तीं चांगलीं निघतील आणि लग्न हें केव्हांतरीं त्यांच्या सामर्थ्यानें घडेल. परंतु मुलांस रोजगार नाहीं, शहाणपण नाहीं व तीं पुढें कशीं निघताल यांचा अंकूरही दिसत नाहीं, तोंच त्यांचे गळ्यांत मुलगी बांधून जोखमांत घालावीं व त्यांचीं विद्या, आयुष्य सर्व बुडवावें, यांत काय लाभ होतो? लग्न बापानें केलें ह्मणजे त्यांत काय मोक्षसाधन आहे? ज्याचा तो आपले पराक्रमानें करील तर फार चांगलें. आणि मोठेपणीं लग्न झालें ह्मणजे लग्न संबंधीं, शपथा व वचनें साक्षिनिशीं ईश्वरास स्मरून घ्यावीं लागतात तीं पुरूषांचे मनांत साधें वागतील आणि त्या प्रमाणें ते वर्तन करतील; परंतु लहानपणीं हें सिद्धीस जात नाहीं, खाण्या पिण्याची सोय जाहल्यापूर्वीं स्त्रि व मुलें गळ्यांत पडतात, मग त्यांनीं पोटास मिळवावें किंवा स्त्रीच्या बरोबर रहावें? एकदां शरीरास दुर्बळता आली ह्मणजे उद्योगाची हानी होतें, तसेंच धैर्य, बळ, बुद्धि, सार्वजनिक अभिमान, आणि दूरदेशीं प्रवास करून लौकीक संपादन करण्याची उत्कंठा हीं सर्व एकामागून एक नष्ट होतात.

कोणी ह्मणेल कीं, आमच्या घरांत द्रव्यादि सर्व वस्तुंची समृद्धि आहे यास्तव आमच्या मुलास पुढें त्याच्या चरितार्थाची काळजी करावयास नको तेव्हां आह्मी त्याचें लवकर लग्न केलें ह्मणून कोणती हरकत आहे? तर त्याचें उत्तर इतकेंच कीं, मुलगा शहाणा विद्वान न केला तर त्या तुमच्या सांठवून ठेविलेल्या करामतीचा तो आपल्या वेड्या चाळ्यानें तुह्मां देखत अथवा तुमचे मागें अल्प काळांतच चुना करून टाकील आणि तसें झालें ह्मणजे त्या पोसलेल्या मांसाच्या गोळ्यानें शहाणपणाच्या अभावीं व शरीर दुर्बळत्वामुळें काय करावें? याजकरितां भलती शंका न घेतां उत्तम मार्ग तेच स्विकारावे ह्मणजे त्या तुमच्या ऐश्वर्यास भर पडून तीं मुलें आपल्या वडिलांचे पदोपदीं आभार मानितील, अस्तु.

आमचे ज्ञातबंधूंस आपल्या क्षत्रिय कुळाचा मोठा अभिमान आहे त्या अर्थीं त्यांनीं याजकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे तरच सदृढता व आरोग्यता प्राप्त होईल पहा बरें मागील काळचे आपले वडील किती

सशक्त होते त्यांचीं कारणें कधीं कोणी शोधून पाहिलीं आहेत काय? त्यांचीं लग्नें २५ विसी वांचून होत नसत हें तर ऐकून सर्वांस माहित आहेना? कधीं कधीं कित्येकाचीं ३० वर्षे पर्यंतही मजल पोंहोंचत असे, या वरून ते शक्तिचे किंवा पराक्रमाचे केवळ बाणच बनून गेले होते, आणि त्या कारणानें इतिहासांत त्यांची कीर्ति राहिली आहे, त्याची ईर्षा आपणामध्यें कांहीं तरी असली पाहिजे, केवळ परांचें अनुकरण करणें मानवी देहास व स्वराष्ट्रीय लोकांस इष्ट नाहीं आतां केवळ राष्ट्र चालवूं इच्छिणारानींच आपली शक्ति रक्षण केली पाहिजे असा सिद्धांत नाहीं. सर्व मनुष्यांस आपला संसार प्रपंच व्यवहारादि इत्तर सर्व कामें सुरळीत चालविण्या करितां आंगीं आरोग्य व शक्ति अवश्य पाहिजे. असें असतां ती मिळविण्याचे नीतिनियम जर बरोबर नाहींत तर मानवी जन्माचें काय सार्थक्य होणार आहे! कळसुत्री बाहूल्यांची स्थिती हीच कीं नाहीं!! असो याचा आमचे सुज्ञ लोक विचार करतील तर या चालू रूढींत कांहीं फेर फार होण्याचा संभव आहे व त्या योगें सर्वांचें हितही होईल इतकें सुचवून आमचें व्याख्यान आह्मीं येथें संपवितों. आपला हितवादी.

**कृष्णाजी येशवंतराव चव्हाण प्रभुगांवकर.**

हिंदळें.

**सभा.**

९१-९२-९३-९४.

तारीख २६ जानेवारी सन १८८४.

## पत्रद्वारें सभेची भेट.

---

जेजे पत्रव्यवहार सभेच्या नांवें, येथिल व बाहेरगांवचे लोकांकडून होत असतात ते वेळच्यावेळीं सभासदांस कळविण्यांत येतात त्या प्रमाणें हा आजचा पत्रव्यवहार सभेपुढें सादर करण्यांत येत आहे.

या सभेचे व्यवस्थापक रा. केशवराव रामचंद्र साळुंखे यांजकडून

ता. २० फेब्रूवारी सन १८८४ चें पत्र मौजे कामेरी तालूका वाळवें जिल्हा सातारा येथून आलें तें दूय्यम चिटणीस यांनीं सभेस वाचून दाखविलें त्यांत सदरील गृहस्थाची प्रवासासंबंधी हकीकत व ठिकाठिकाणीं त्याचे व इतर मंडळीचे झालेले वादविवाद व सभेस उद्देशून लिहिलेली कविता ऐकून मंडळीस परमानंद झाला, त्यावेळीं सर्वांनीं दिलेल्या सूचनेप्रमाणें त्या पत्रांतील कविता येथें घेतल्या आहेत.

## क्षात्रधर्म प्रतिपादक सभेस प्रार्थना.

दिंडी.

क्षात्र धर्माचें सदन जीर्ण झालें ॥
धर्म प्रीतीचे दीप हे विझाले ॥
सभारूपीं तें आज्य घालुनीयां ॥
सद्य उजळीलें ज्ञान तंतुनीयां ॥ १ ॥
फंड मिळुनीयां धर्म वृद्धि व्हावी ॥
आद्य धर्माची उच्चता असावी ॥
ह्याच इच्छे अध्यक्ष झटति भारी ॥
व्यवस्थापक चिटणीस कारभारी ॥ २ ॥
पत्ररूपें मी आज सभे आलों ॥
प्रवासासी मीं पुसुन तुह्मां गेलों ॥
नम्र होउन मित्रास विनवीलें ॥
कृपा ठेवुनि हें कार्य चालविलें ॥ ३ ॥

साक्या.

महाराष्ट्रीं नृपति झाले थोर शिवाजी ऐसे ॥
सर्व जातिचे आश्रय दाते सोडूनी गेले कैसे ॥ १ ॥
मुंबापुरही विस्तृत नगरी त्यांत मराठी वस्ती ॥
अद्यापी कुणी केली त्यांची सोई नाहीं पुस्ती ॥ २ ॥

ऐशा नगरीं क्षत्रियांची धर्मशाळाही नाहीं ॥
यास्तव आतां सभा स्थापिली धर्मासाठीं पाहीं ॥ ३ ॥
क्षात्र कुळाशीं दूषण देती कीं ज्ञानहीन ह्मणोनी ॥
यास्तव आतां विद्या पढवुनी यावें पुढें स्थानीं ॥ ४ ॥
प्रपंचरायधीं झटती जे त्यां कीर्ती न मिळे कांहीं ॥
स्वधर्माचें प्रतिपादन करितां देहीं मुक्त होई ॥ ५ ॥
चार स्तंभकीं या सदनातें अध्यक्षादिक भेची ॥
यास्तव केशव नम्र होऊनि सभेस प्रार्थितोची ॥ ६ ॥

या सदरील कवितां विषयीं व पत्रांतील मजकुराविषयीं रा. केश-वराव यांचे व त्यांचे स्नेही या उभयतांचे मंडळीनें आभार मानिले. त्या दिवशीं सभेंत मंडळी उशिरा आल्या कारणानें, सदरील पत्र वाचून जमलेल्या पैशांचा हिशोब पहाण्याच्या गडबडींत बराच वेळ झाला ह्मणून जम्मे बद्दल पावत्या देण्याचें काम तहकूब टेविलें आणि सभा बरखास्त केली मंडळी ७५ होती. सभा—५६.

ता० १ मार्च १८८४.

## निबंध.

(भुजंग प्रयात.)

नको भीड ठेवूं कुकर्मी जनांची ॥ परी सत्य तें बोल पेऊं मनाची ॥
जगत्पालका सर्वकाळीं भजावें ॥ धरूनि सुभावा भवाला तरावें ॥ १ ॥

सत्कृत्योत्तेजक मंडळी स्थापन होऊन त्या प्रमुखांचे मनःपूर्वक सुवि-चार व त्यांची मेहेनत पाहून खरोखर जन्माचें सार्थक्य काय आहे हें आतां मजसारख्यास समजूं लागलें आहे; ही परमाल्हादकारक गोष्ट आपल्या नावांस खरोखर शोभा देणारी होय आणि त्या कृत्यासाठीं आज येथें बरेच गृहस्थ आले आहेत, ह्मणून त्यांस माझे अल्प विचार विदीत करण्याचा माझा इरादा आहे.

ह्या सभेस येण्याची माझी ही दुसरी वेळ आहे ह्मणून पहिल्या सभेचें वर्णन करणें भाग आहे. ती सभा ता० २३ माहे सप्तंबर सन १८८३ रोजीं याच धर्मशाळेंत भरली होती त्यावेळीं त्या सभेस पांच वाजेपर्यंत मंडळी सुमारें ७० पर्यंत जमली होती; आणि सभेची वेळ तर एक वाजतां नेमिली होती. नियमित वेळीं मंडळी जमण्याविषयीं कित्येक आमचे ज्ञात बांधवांनीं फारच मेहनत घेऊन मंडळीची मार्ग प्रतिक्षा करीत बसले होते; इतक्यांत येथें वेळेवर आह्मीं आलों होतों परंतु आमच्या मंडळीचा जमाव ह्मटला ह्मणजे आंवळयांची रास एकत्र जमण्यास जसा विलंब लागतो तद्वत असल्यामुळें वेळ साधून आलेल्या ज्ञात बांधवांस बसून बसून त्रास आला. परंतु आरंभलेल्या कृत्याकडे लक्ष फार होतें ह्मणून चित्तास वेळोवेळीं समाधान वाटत असे.

ही पद्धत जरी आह्मांस माहीत होती यद्यपि त्याच मार्गानें आपण चालल्यास दूषित होऊं एतदर्थ आह्मीं आमच्या नियमित स्वकृत्याकडे दुर्लक्ष केलें आणि सभेंत येण्याची वेळ साधिली. याप्रमाणें सर्वांचें लक्ष असतें तर चार तास व्यर्थ जातेना, करितां सर्वत्रांनीं आपल्या वेळेकडे विशेष लक्ष द्यावें असें माझें कळविणें आहे. आतां आजच्या प्रसंगाचा विचार करूं.

मंडळीच्या हेतुप्रमाणें सार्वजनिक कृत्य सिद्धीस जाण्यास इतका वेळ कां लागत आहे याचें कारण इतकेंच कीं, आपल्या लोकांमध्यें एकी व परस्परांवर विश्वास नाहीं; आणि हे दोन्ही गुण जोंपर्यंत साध्य नाहींत तोंपर्यंत अशीच रहाटी असणार. मग अशीं सत्कृत्यें कोणत्या उपायानें घडणार बेरें ! पण हे विचार सुचतात कसे ? बरोबर आहे कारण जोंपर्यंत आमचें दरबार ( मराठे राज्यांतील सभा ) होतें तोंपर्यंत दरबारांत जाण्यायेण्याचा बहुतेक लोकांचा सांप्रदाय असल्यामुळें सभेच्या रीतीभाती माहिती होत्या व वादाविवाद करण्याची शक्ति होती तेणेंकरून विरुद्ध मत भेदांचा शांततेनें विचार करण्यास ठीक पडत असे. आणि पर मतांची स्वमतांशीं तुलना करण्याचें सामर्थ्य व परस्परांवर श्रद्धा हे गुण लोकांच्या आंगीं वास करीत होते ह्मणूनच

त्यांची एकी होऊन इच्छित हेतु सिद्धीस गेले ह्यांत कांहीं एक संशय नाहीं. परंतु आतां आह्मांस दरबार सोडून अरण्यवास प्राप्त झाला आहे. त्या अरण्यवासी रीतीभाती व परस्परांवर अविश्वास हे गौण मार्ग सभाद्वारें भस्म करून टाकण्यास कांहीं हरकत नव्हती खरी, परंतु आधीं आह्मीं लोकांचे अंकित, तशांत विद्येची अभिरुचि नसल्यामुळें सभेस जाण्याचा कंटाळा. पण अभिमान मात्र वहातों कीं आपले विचार तेच मात्र खरे व आपणच सर्वज्ञ, याप्रमाणें घमेंडी धरून केवळ चित्रवत् बनलों आहों अशा अभिमानांत निमग्न असल्यामुळें आह्मांस कोणी चांगलेंही सांगितलें तरी लगेच संतापून त्या कामास व्यत्यय आणितों. आणि शेवटीं एका घरांत अठरा चुली तद्वत् त्या कामांची दुर्दशा करून टाकितों. यास्तव ज्ञात बांधवांस माझी इतकीच विनंती आहे कीं, त्यांनीं परविवेकाची स्वविवेकाशीं तुलना करावी ह्मणजे सत्य कोणतें तें कळेल, ह्मटलें आहे. "**गुणाः पूजा स्थानं गुणिषु न च लिङ्गंनच वयः**" गुणी मनुष्याच्या जातिकडे व वयाकडे लक्ष न देतां त्यास मान देण्यास आह्मांस कांहीं एक शंका येऊं नये. याजकरितां आपलाच दुराग्रह न धरितां जरी कित्येक लोकांशीं वैमनस्य असलें तरी त्यांच्या ग्राहक गुणांशीं असूं नये जें सत्य तें शिरसा मान्य करून आरंभलेलें कृत्य शेवटास नेण्याचा दृढ निश्चय धरा व "दसका लकडी एकका बोजा" करून यश मिळवा. आणि कदाचित् ह्या कृत्याचें फळ जरी आपणांस प्रत्यक्ष मिळालें नाहीं, तरी आपण पाया मजबूद घातल्यास आपल्या पश्चात् आपल्या मुलांबाळांस त्या कृत्याचें फळ मिळून आपली कीर्ति दिगंतरी राहील.

"**अस्मिँ ल्लोके यत्क्रियते तस्य फलममुष्मिल्लोकेऽनुभूयते.**"

धर्म कृत्यास मदत करणें हें ज्याचें त्याचें कर्तव्य आहे, याबद्दल आपण दुसऱ्यावर उपकार करितों असें समजूं नये.

आजच्या प्रसंगीं मजला थोडासा विचार परयाति गृहस्थ यांचे बडबडीविषयीं सुचला आहे तो सादर करावा असें दिसल्यावरून तो मुद्दाम घेतों. आमच्या ज्ञात बांधवांनीं ही सभा "क्षात्रधर्म

प्रतिपादक व धर्म फंडोत्तेजक " या नांवानें स्थापन केल्याबद्दल अवंतर यातीचे लोक त्याबद्दल कुरकुर करीत आहेत, त्यांच्या गैरसमजाबद्दल माझी त्यांस जी विनंती आहे तिजकडे ते लक्ष देतील तर खरें तथ्य कोणतें याजकडे त्यांचे विचार वळतील.

मित्रहो. आपली जीही जननी ( महाराष्ट्रदेश ) त्या मातेची जर आह्मीं आज्ञा पाळिली तरच आह्मीं तिचीं खरीं लेंकरें आहोंत. आपण भावंडांनीं प्रीतिनें व एकीनें असावें यांतच आईस आनंद वाटतो व तिजला सुख होत असतें. ह्मणजे तिची आज्ञा मानणें, व ती परांच्या करीं गेली असतां निकरानें स्वमातेस मिठी मारणें, हा जो बालकांचा धर्म तो आह्मी सुरळीत चालवावा ह्मणून तिनें आह्मांस निरनिराळीं कामें लावून दिलीं असावींत क्षत्रियांनीं स्वदेश रक्षण करावा, वैश्यांनीं देशास धान्य पुरवावें ( व्यापार इत्यादि करून ) व कांहींकांनीं धान्य कृषि कर्मानें उत्पन्न करावें, त्याचप्रमाणें इतर व्यवसाय सुतार, लोहार, इत्यादि यातीनें चालवावे याप्रमाणें चाललें असतां सर्व देशबंधूचें हित होऊन पूर्वींप्रमाणें यशाचा वांटा आपणांस मिळेल. नाहींपेक्षां ज्या भूमीचे आपण मालक असून गुलाम होऊन राहिलों, त्या मातेच्या अंतरानें आमचें जिणें व संसार दुःसह झाला आहे; याचें आह्मांस ज्याकाळीं स्मरण होतें त्याकाळीं मन कसें उद्विग्न होतें तें सांगतां सुद्धां येत नाहीं, परंतु जरी सदरील कृत्यें आपल्या हातून होण्यास तूर्त अशक्य आहेत तरी पण जीं शक्य आहेत तीं देखील होऊं नयेत काय? झालींच पाहिजेत. कारण दयाळू इंग्रज सरकारानें जे आह्मीं गुळाचे गणपति होऊन राहिलों आहों त्या आह्मांस धर्मान्वयें तरी वर्तण्याची मोकळीक दिली आहे. ह्मणून जन्मास येऊन एक नामांकित सार्वजनिक हितावह असें कृत्य आपले हातून घडावें अशी योजना आहे. आह्मीं एका आईचीं लेंकरें असल्यामुळें आह्मां सर्वत्रांस त्या कामाचा अभिमान असला पाहिजे; यास्तव तुह्मीं आपल्या बंधूंस ( मराठ्यांस ) साह्य करणें हें तुमचें कर्तव्य आहे, आणि तें कर्तव्य बजाविलें तरच आपल्या मातेची आज्ञा व बंधुप्रीति संपादल्या सारखी होणार आहे. शिवाय आपण एका ईश्वराचीं लेंकरें आहोंत, ह्मणून आपणांपैकीं

एकानें केलें तेंच सर्वांचें असें समजून एकाग्र चित्तानें एखादें धर्मकृत्य केल्यास महत्पुण्य संपादिल्या सारखें होईल. याप्रमाणें मागीलकाळीं आपण चालत आलां आणि आतां त्याप्रमाणें चालण्यास कोणती लज्जा व अभिमान वाटून नवीन पंथ ( गिरणींतील फंड ) आचारिला व त्या पासून तुह्मास कोणतें भूषण मिळतें हें समजत नाहीं. या विषयीं मात्र पूर्ण विचार करा. आणि द्वैतभाव सोडून याकामीं साह्य व्हा अशी माझी सूचना आहे.

ज्ञातबंधुहो, ह्या आपल्या स्थितीची आपल्या पूर्वजांच्या स्थितीशीं तुलना केली असतां आपलें चालू वर्तन किती निंद्य व आंगावर रोमांच उभे रहाण्याजोगें आहे! परंतु त्या गोष्टीस आतां पुष्कळ दिवस झाल्यामुळें ही स्थिती आमच्या आंगांत भिनून आह्मांला प्रिय वाटूं लागली आहे. पहा बरें, इतके आह्मी मराठे या मुंबई शहरीं असतां जणु काय नाहींच, असें नजरेस येतें कारण ज्या आमच्या पूर्वजांच्या छत्रपति या नांवावर अवंतर लोक पोट भरीत होते, त्या आह्मीं धर्मार्थ जागेंत सभा भरवाव्या कीं काय याचा आह्मांस कांहीं एक अभिमान न वाटतां आपण मोठे हाच मात्र अभिमान असावा काय? परंतु ज्या काळीं आपल्या नवीन सभा गृहामध्यें आपण बसूं त्यावेळीं आपला अभिमान आपणांस विशेष शोभा आणील. पण लोकांच्या धर्मार्थ जागेंत असा नांवां संबंधी वितंड वाद घालण्यांत कांहीं एक सिद्धीस न जातां उलट उपहासास मात्र कारण होणार आहे व अशा प्रकारचें अज्ञानत्व लोक प्रसिद्धीस येणार आहे. "निर्बुद्धः कश्चित्" पक्षी सुद्धां रहावयास सुस्थळ करितात; यावरून सर्व प्राण्यापेक्षां सूज्ञ असे जे आह्मीं मानव प्राणी त्या आह्मांस कोणती संज्ञा असावी हें समजत नाहीं.

तुह्मीच विचार करा बरें! एखादें सार्वजनिक कृत्य करण्याबद्दल ज्ञातबांधवांच्या एकी करणार्थ इतके प्रयास पडून व दिवसगत लागून अजून उगरणी सुद्धां पुरती जमा झाली नाहीं तर मग देशांत एकी नाहीं हें बोलावयासच नको. अशा आमच्या हिंदु लोकांच्या आंगीं किती स्वदेशाभिमान व कशी ज्ञातप्रीति मानसीं जागृत आहे, हें इतर बहुतेक सभांवरून अनुमान करितां येतें. असें आहे तर आह्मांमध्यें ऐक्य कसें बरें होणार?

हें ऐक्य दृढ निश्चयें धरून फावल्यावेळीं सभेस आल्या खेरीज होणारें नाहीं. ह्या सभेस सुःस्थळ पाहिजे तत्संबंधी वर्गणी जमविण्याचें काम चाललें आहे इतक्यांतच आपणांत निरनिराळे मतभेद पडून लोकांची फुटाफुट होऊं पहात आहे, हें एक आमचें दुर्दैवच समजलें पाहिजे. तथापि गेल्या सभेंत आमचे कित्येक सूज्ञ ज्ञातबांधव स्नेह तृषित व सत्कृत्याला प्राणापेक्षां अधिक मानणारे आहेत असें दिसून आलें; तेणें करून मला तर परमानंद झाला ह्मणून त्यांनीं आपले ईच्छेनुरूप, प्रीतिदायक व तापहारक असा जो हा सण विजयादशमी (दसरा) या दिवशीं सभा भरून परस्परांच्या दृष्टि भेटी व्हाव्या एतदर्थ आजचा निश्चय ठरविला यांत सदरहु कामाचा निकाल होईल असें चिटणीसांनीं कळविलें असून हल्लीं कित्येकांचीं मनें समुद्राच्या लाटांप्रमाणें खवळलीं आहेत, त्यांचें शांतवन होऊन योग्य समजूत पडेल अशी तजविज आमचे अध्यक्ष व चिटणीस काढतील अशी आह्मांस आशा आहे, कीं ज्या योगें अखिल बांधवांचें हित होईल. यत्द्विषयीं निर्णय होणें तो हाच आजचा सुदिन होय. असो, हा मजकूर मीं येथें थोडक्यांतच संपवून दुसऱ्या विषयाकडे वळतों.

आमच्या लोकांमध्यें पैसा नाहीं हें ह्मणणें माझ्यानें खरें ह्मणवत नाहीं, इतकें मात्र मी कबूल करितों कीं जें उत्पन्न आह्मां लोकांस आहे त्याची व्यवस्था ठेवणें आमचे लोकांस साधत नाहीं. आणि जर व्यवस्था नीट असेल तर दहा रुपयांचा पगारदार या सत्कृत्यास जें साह्य देईल तें अव्यवस्थेंतील दोनशें रुपयांचे उत्पन्नाचा गृहस्थ देऊं शकणार नाहीं ह्मणून पैसा नाहीं ह्मणत बसण्या पेक्षां व्यवस्था नीट नाहीं असें ह्मणणें कांहीं अंशीं शोभण्या जोगें आहे. आतां आपल्या देहाची शाश्वति नाहीं, ही एक दुःख कारक गोष्ट आहे खरी परंतु तो परमात्मा इतका दयाळू आहे कीं त्यानें जो सत्कार्याचा कित्ता घालून दिला आहे त्याच्या योगानें आह्मीं इह लोकींच नव्हे परंतु परलोकीं सुद्धां अमर होऊन राहूं असें असतां आपण अल्पायुपाची चिंता कशास वहावी. पण जर आपण सत्कृत्याचा त्याग करून आपल्या मनाचा कित्ता गिरवूं लागलों तर मात्र ईश्वरी क्षोभास पात्र

होऊं. हल्लीं मनाचा कित्ता जिकडे नेईल तिकडे जाण्यांस मागें पुढें पहात नाहीं अशीं मनाचीं अंकीत मनुष्यें अनेक प्रकारच्या दुर्व्यसनात पडून आपण आपल्या किर्तीस, वैभवास, नीतीस, सत्कार्यास, सज्जन प्रीतीस आणि द्रव्यास, मुकतात जर त्यांचें मन त्यांस साक्ष देतें कीं आह्मीं आरंभिलेलें कृत्य वाईट आहे, तथापि तें त्यांस सोडावेंसें वाटत नाहीं याचें कारण असें कीं ते अल्पमति असल्यामुळें त्यांस आत्मसंयमन करण्याची शक्ति बिलकूल नाहीं, जर असेल तर ते त्या दुर्व्यसना पासून एकदम अलग होऊं शकतील यांत संशय नाहीं. तेव्हां असा रोग काढून टाकण्यास वैद्याचें औषध ( ह्मणजे साधुंचीं बोधपर वचनें ) हाच उत्तम मार्ग होय, नुसत्या नशीबावरच इ[illegible] ठेवून कांहीं व्हावयाचें नाहीं.

## श्लोक

आस्तेभग आसीनस्योर्ध्वस्तिष्ठति तिष्ठतः ॥
शेते निपद्य मानस्य चरातिचरतो भगः ॥
यशता पुण्य पण्येन क्रीतेयं कायनौस्त्वया ॥
पारंदुःखोद धेर्गन्तुं तर यावन्न भिद्यते ॥
मृतं शरीर मुत्सृज्य काष्ट लोष्ठ समंक्षितौ ॥
विमुखा बांधवायान्तिधर्मस्तमनुगच्छति ॥
तस्माद्धर्मं सहायार्थं नित्यं संचिनुयाच्छनैः
धर्मेणहि सहायेन तमस्तरति दुस्तरम् ॥
पुण्य कृतःस्वेषां सुचरितानां फलं स्वर्ग लोकेऽश्नुवते ॥

आह्मीं या धर्माचे आहोंत ह्मणून आह्मांस त्याचा अभिमान व तदनुसार वर्तन करणें भाग आहे.

विपद्ग्रासभुतोपिनाहं धर्मं त्यजेयम् ॥

हें वाक्य प्रत्येकानें मनांत वागवून चाललें पाहिजे; हा अभिमान आह्मांत आहे किंवा नाहीं याची परिक्षा या आरंभलेल्या कृत्यावरून

सहज दृष्टोत्पत्तीस येईल. याजकरितां एकविचारें साक्ष देण्यास कोणीही कुरकुर करूं नये. ज्या जातीचें व वर्णाचें नांव आह्मीं सांगतों, त्या नांवांचा लौकीक पसरला जावा यत्द्विषयीं प्रयत्न चालू झाल्या मुळें आह्मीं त्या जगदात्म्याचे आभार मानतों, कारण जो आह्मांस बुद्धि भ्रंश पडला होता तो दूर होऊन अशा सत्कृत्याबद्दल अंतःकर्णांत सुबुद्धि प्रदिप्त झाली आहे हें उत्तम सुचिन्ह होय.

माझ्या प्रिय बांधवानों, जे कांहीं उद्गार माझ्या मनांत आले ते आपणापुढें आदरपूर्वक सादर केले आहेत. आनंद व दुःख लहरींमध्यें जरीं कित्येक शद्ब अर्थ सोडून निघून जातात तरी हें जें मीं स्वल्पमत्यनुसार लिहिलें आहे, त्यांत ग्राह्य असेल तितकें ग्रहण करून अग्राह्य मला सामोपचारें व विमल अंतःकरणानें सांगितल्यास मीं आपला सदासर्वकाळ आभारी होऊन राहीन. हें माझें आपणांपाशीं विनयपूर्वक मागणें आहे.

आपला.
**रामचंद्र कृष्णराव दळवी.**
जानवलकर.

०३ मे सन १८८४

# पंचाईत.

आज आह्मांस एका अतिमहत्वाचे विषयावर दोन शब्द बोलून त्या बद्दलचा विचार आमचे सूज्ञ बंधू वर्गांकडे सोपविण्याचा आहे; मग ते त्याजकडे लक्ष देवोत अगर न देवोत, पण प्रशस्त व फायदेशीर होईल असें नजरेस आल्यास आह्मांस आपलें कर्तव्य केलें पाहिजे. कारण कोणत्याही कामाचा जर परिणाम चांगला होण्याचा संभव आहे तर त्या कार्मीं मागें घेणें ह्मणजे त्या कामांस सह्य देऊन सर्वांचे अनहित करण्यास धजणें असें होतें. सबब तसें न व्हावें अशी इच्छा धरून हा विषय हातीं घेतला आहे.

कोणतें ही काम मग तें धर्म संबंधी असो अगर व्यावहारिक

चाली रीती संबंधी असो ज्याचा न्याय पंच मार्फत केला जातो व त्या कामांकरितां जो लोक समुदाय जमतो त्या समाजास पंचाईत असें ह्मणण्याची आह्मांत एक रूढी आहे. इतर यातींतील कित्येक लोक हर कोणत्याही बाबतींत लोक समुदाय जमवितात आणि त्या समाजाच्या तर्फेनें मोठ मोठ्या बिकट कार्मी हात घालून तीं स्वल्प व न्यायाचीं करून घेतात. त्या समाजास ते सभा असें नांव देत असतात, आणि इतर देशीय लोक ही आपल्या समाजांस हेंच नांव वापरतात असें असतां आमच्याच वाट्यास "पंचाईत" हें आवडतें नांव कोठून आलें असावें बरें! हो! कदाचित् हा शब्द कांहीं दर्शक चिन्हावरून प्रचारांत आला असेल. असो पंचाईतीच्या संबंधानें आपणांस काय विचार कर्तव्य तें तर पाहूं.

मागें एकी या विषयावर ज्या वेळीं या सभेंत व्याख्यान झालें होतें तेव्हां आमच्या एका प्रिय बंधूनें असा एक प्रश्न केला होता कीं, "ज्या अर्थीं आह्मांत पंचाईतीचीं कामें अतिदुर्व्यवस्थेचीं नजरेस येतात त्या अर्थीं आपणांमध्यें जातीगोताचीं कामें कोणत्या प्रकारानें चालावीं"! त्यावेळीं त्या सुविचारी गृहस्थास असें उत्तर देण्यांत आलें होतें कीं हा विषय केव्हां तरीं पुढें वेळेच्या सवडीनुरूप हातीं घेऊं ह्या नंतर बराच काळ मध्येंतरीं गेला व कधीं हीं तो विषय हातीं घेण्यास योग्य कारण दिसलें नव्हतें. परंतु हल्लीं ता० १ माहे जून १८८५ रोजीं जाति संबंधी एका विलक्षण प्रकारच्या खटल्याच्या निर्णयाकरितां ठिकाण पांजरापूर येथें आपल्या यात बंधूंचा मोठा समाज भरला होता. तो समाज भरणार आहे अशी बातमी मुंबईत सर्वत्र ठिकाणीं पोंहोंचतांच ज्यास त्यास त्या दिवशीं ह्मणजे सदरील तारखेस त्या समाजांत हजर असण्याची मोठी उत्कंठा उत्पन्न झाली होती. कित्येक तो समाज साधावा ह्मणून आपल्या धन्याकडून त्या दिवसाची रजा घेऊन घरीं राहिले होते, कांहीं जन तर चाकरी धंद्याची परवा न करितां समाजास गेले होते. त्यांतून कित्येकानीं त्या समाजाच्या जाहिराती हातीं येतांच ज्या आरोप्याविषयीं जातगोता कडून पुन्हां चौकशी होणार आहे तो आरोपि पूर्वीं जातीकडून कोणत्या कारणानें दोषी ठरला

होता इत्यादि दहा वीस वर्षां पूर्वींचे कागदोपत्रीं पुरावे रात्रीचा दिवस करून धुंडून काढले. या प्रमाणें ज्यांनीं त्यांनीं आपली लख्ख तयारी करून सदरील तारखेस दोन प्रहरां नंतर मंडळी पांजरापूर येथें सुमारें ३०० जमली होती. तेव्हां तेथील एका साधारण प्रतीच्या चपराशानें हे अधिकाधिक जमत असलेले लोक पाहून मोठ्या उद्धटपणानें त्या मंडळीस तेथून जाण्यास सांगितलें परंतु त्या त्याच्या शब्दांकडे कांहींकांचें दुर्लक्ष झाल्यामुळें त्या हलकट शिपायानें जे शब्द त्या मंडळीस वापरले ते तेथें हजर असलेल्या कांहीं संभावित गृहस्थांस न सोसून त्यांनीं तें स्थळ बदलावें ह्मणून सर्वांस मोठ्या नम्र-पणानें सांगितलें त्या बरोबर सर्व लोक तेथून निघून त्या स्थळा नजीक एका महाजन वाडींत गेले त्या नव्या स्थळाची योजना करी तोंपर्यंत आणखी ३०० मनुष्यें जास्त जमलीं. हा बराच मोठा समाज झालासें पाहून योजून गेलेल्या कामाची मंडळीनें सुरवात केली, त्यांत प्रथमा-रंभीं या पंचाईतीचा न्याय कोणी करावा याची मंडळींत बाचाबाच झाली; पुढें कांहीं बोलणें होऊन त्या पैकीं कांहींकानीं त्या आरोप्यास उभा करून त्याची जबानी घेण्याची तयारी केली इतक्यांत कित्येक गृहस्थाची आपसांत विरुद्ध प्रश्नोत्तरें झाल्या बरोबर तो समाज तत्क्षणीं दुपक्षि झाला. त्यांत एका गृहस्थानें असें ह्मणून दाखविलें कीं या आ-जच्या समाजा सारखीं मोठ मोठीं बिकट खटलीं निवारून त्या सर्वांत आह्मींच जय मिळविला आहे असें असतां हें आजचें काम आह्मां शिवाय दुसऱ्याच्यानें व्हावयाचें नाहीं असे शब्द कित्येकांचे कांनीं पडतांच जो तो आपला शब्द व पक्ष खरा करण्यास महत्प्रयत्न करूं लागला. मागें एक वेळ जी एकी या विषयांत पंचा-ईतीची तऱ्हा दर्शविली होती त्या पेक्षां ही अधिक दुर्व्यवस्था झाली. कोणी तोंडचे पुरावे, कोणी लेखी पुरावे पुढें करूं लागले त्यामुळें सर्वच गोंधळ झाला मग कसचा न्याय आणि निवडा ! मोठी मारामार हो-ण्याचा प्रसंग येऊन घडकला. कारण कोणी कोणाचें ऐकेना व मागें घेईना, अशी वेळ जाणून जे कित्येक या सभेपैकीं सभासद तेथें काय चाललें तें पाहण्यास गेले होते त्यांनीं आपले दोन शब्द व्यवस्थित-

पणानें खर्च केले पण त्यांजकडे लक्ष देतो कोण ? अखेर त्यांस निराशेनें स्तब्ध राहावें लागलें. शेवटीं त्या समाजाची मंडळी आपसांत कलह करून सूर्यास्त होतांच आपापल्या घरीं चालती झाली, ह्या प्रमाणें आरोप्याच्या न्यायाची पद्धत बनून राहिली. केवढी शोचनीय गोष्ट बरें ! त्या समाजास मंडळी सुमारें ८०० होती.

याच मासल्याचा समाज ता० १३ माहे जुलई १८८४रोजीं बाटलीवाल्याच्या धर्मशाळेंत भरला होता. त्या वेळीं एका संभावित गृहस्थानें एक सहा सात वर्षांचा जुना खटला मुद्दाम उपस्थित करून त्याचा खरा न्याय देण्याचे थापेनें कित्येक मंडळी जमा केली होती त्या वेळीं त्या पुढारी सभ्य गृहस्थाचे लेखी बलावण्यावरून या सभेंतील कांहीं प्रमुख मंडळी तेथें गेली होती, त्यासमयीं समाजाच्या अग्रभागीं असलेल्या गृहस्थाच्या मुद्रेवरून आज कांहीं शिस्तवार गोष्ट नजरेस येईल अशी मंडळीस प्रथम आशा उत्पन्न झाली होती, पण तेथेंहीं सदरील किस्यापेक्षां कांहीं निराळा प्रकार दृष्टिस पडला नाहीं, "हं करेसो कायदा" हीच रीत चालत होती त्यामुळें तेथें हजर असलेल्या लोकांस स्वस्थ एकमेकांच्या तोंडाकडे पहात बसावें लागलें होतें; जेव्हां पुढें असलेल्या दोन तीन असाम्यानीं आपसांत कांहीं कानगोष्टी करून त्या खटल्याचा पंचनामा ठरविण्याचा बेत आणला तेव्हां समाजांत हजर असलेल्या कांहीं मंडळीनें त्या खटल्यास अनुसरून एक दोन योग्य प्रश्न केले पण पुढारीमंडळीनें ते ऐकिले न ऐकीलेंसे करून वेळ काढिला आणि कांहीं वेळानें आपण ठरविलेल्या पंचनाम्यावर सर्व मंडळीच्या सह्या घेण्यास त्या अग्रभागीं असलेल्या गृहस्थानें एक कोरा कागद मात्र पुढें केला, तेव्हां मंडळीस तें प्रशस्त न वाटल्यावरून असा सई घेण्याचा अर्थ काय वगैरे बऱ्याच मुद्यांवर परस्परें भाषणें झालीं त्यावरून समाजाचे पुढारी यानें आपली चुकी कबूल करून तो पंचनामा त्या वेळीं रद्द केला असें दर्शविलें व तो खटला पुनः अग्रक्या वेळीं तपासला जावा असा ग्राह्यदर्शक ठराव करून समाज बरखास्त केला तेथें मंडळी सुमारें २०० होती.

पुढें असें समजण्यांत आलें कीं त्या आपणास प्रमुख ह्मणविणाऱ्या

गृहस्थानें तो तहकूब केलेला खटला व त्या शिवाय आणखी मागील चारचार पांचपांच वर्षांची जुनीं खटलीं मुद्दाम उकरून काढून एके रात्रीचे समयीं दहा वाजल्या पासून पहाटचे चार वाजेपर्यंत त्या सर्वांची थापाथापि करून गरीब बिचाऱ्या लोकांचा बराच पैसा आपल्या थैलींत उतरून मार्ग धरिला.

असेंच सुमारें दहा वर्षां पूर्वी एकदां पंचाईतीच्या कामा करितां पांजरपूर येथें मोठा समाज भरला होता त्या वेळीं सुमारें १००० मंडळी हजर होती तोही प्रकार सदरील दोन्हीं उदाहरणापेक्षां कांहीं निराळ्या स्वरूपाचा नसतां अखेर आपसांत मोठी मारामारी होऊन कित्येक आठआठ पंधरापंधरा दिवस आपल्यास मिळालेल्या बक्षिसासह घरीं राहिले होते; काय सांगावें त्या बिचाऱ्यांस त्या पांजरापुरानें पक्का हात दाखवून त्यांच्या शरिरांचा पांजराच करून सोडिला होता. ह्या सदरील उदाहरणां वरून आपल्या लोकांकडून कसकसे प्रकार हमेशा घडत असतात यांचा विचार आमचे बंधुवर्ग करून कांहीं सुरळीतपणा चालू करतील अशी आह्मांस आशा आहे ह्मणून आजची तसदी घेऊन पुढील सुविचार आह्मीं आपणांसमोर ठेवीत आहों.

बंधुहो, तुह्मीं या कृत्याचा कां बरें विचार करीत नाहीं कीं आपसांत उपस्थित झालेली कळ मिटावी ह्मणून पंच जमा करून न्याय करितां पण त्या न्यायाचा परिणाम अति वाईट होतो आणि शेवटीं जी कळ दोघांचौघां इसमांत असते ती शेंपांचशें लोकांत पसरते याचें कारण काय बरें असावें? याजकडे जर कोणी दृष्टी पोंहोंचविली असती तर त्यास सहज कळून आलें असतें कीं, यांत एक अहंपणा व दुसरा असंमजसपणा हींच दोन मूळ कारणें होत; आणि ते दुर्गुण त्याजकडून दूर जाहले असते यांत कांहीं शंका नाहीं. पण असें करण्याची कोणास गरज आहे? जो तो मीं ह्मणणारा बरें कदाचित् कोणी एखादे प्रसंगीं मागें घेतलेंच तर त्यास प्रतिपक्षी लोक दूषण देतात ह्मणून कोणीही मागें घेत नाहींत. ज्यास त्यास आपण भांडून मरावें हाच मंत्र बरा दिसतो. ह्या अशा कलहामुळें जो कोणी बिचारा न्यायाच्या आशेनें जातिगोताकडे धांव घेतो तो निराश होऊन शेवटीं असें ह्मणतो कीं येथें न्याय मिळ-

ण्याची मोठी " पंचात " आहे आणि शेवटीं आपल्या घरचा मार्ग धरतो असो.

अहो सज्जनहो! दुरवर विचार करून पहा बरें आपल्या इतर महाराष्ट्री[illegible] हिंदूधर्मीय लोक अशीं पंचनाम्यांचीं कामें करितात काय? मु[illegible]त. कांबरें, त्यांत कोणी शहाणा व विचारी मनुष्य नाहीं काय? ना[illegible], ते आह्मां पेक्षां पु[illegible] शहाणे व न्यायी आहेत, तर मग ते पं[illegible] कांबरें पत्करीत नाहींत? याचें कारण शोधण्यांस काय लांब [illegible] लागतें, त्यांची इच्छा आपल्या यातींत स्वस्थता व शहाणपणा [illegible] असते ह्मणून ते नेहमीं त्या साधनाच्या " पंचायतींत " ( काळजींत ) असतात. आणि आह्मीं आपसांत कलह व द्वेष यांची वृद्धि कशी होईल याच "पंचातींत" निमग्न असतों केवढा बरें अंधेर हा! अहो ज्या कामांपासून नित्य हानि होण्यांचा संभव असतो तीं कामें आह्मांस कां बरें प्रिय असावीं.

वास्तविक पाहिलें असतां आमचे कित्येक लोक जीं न्यायाचीं कामें चालविण्याचा आव घालतात त्यास आधार काय आहे? यात वर्गानें अमुक मार्गानें चालावें याजबद्दल जातिकडून कधीं नियम बांधले गेले आहेत काय? मुळींच नाहींत, तर मग एखाद्यानें जाति विरहीत काम केलें ह्मणून त्यास बहिष्कृत करावें अथवा त्याजकडून मनास येईल तो दंड घ्यावा अथवा इतर शिक्षा कराव्यात हें कसें शोभतें, कारण कोणत्याही कामास नियम असले पाहिजेत तरच त्या कामाचें वजन रहातें. जर आपण कधां जातिहितार्थ नियम केले नाहींत व यात बंधूंचें हित व्हावें अशी इच्छाही मनीं नाहीं, मग अर्थांतच कोणी कोणास एखादी शिक्षा करण्यास पात्र करणे अशक्य आहे. तस्मात जो जाति दंडाचा पैसा घेतात त्याचें ते काय करितात त्याजबद्दल कोठें कोणा पाशीं हिशोब आहे काय? व तो पैसा कोठें धर्मार्थ खर्ची पडलेला असतो काय? किंवा त्या द्रव्यानें जाति हितार्थ एखादें स्थळ उभारलेलें कोठें आहे काय? अथवा सुशिक्षण मिळण्यास त्या पैशाचा योग्य व्यय होतो काय? अथवा स्वयातींतील अति दीन दशेंतील कुटूंबाचें संरक्षण केलें गेलेंआहे काय? ह्यांतून कोणतेंही कृत्य घडून आलेलें ऐकण्यांत

व पहाण्यांत नाहीं. तर मग ह्या रकमा जातात कोठें? बरें कदाचित् पंचाईतीच फार भरत नसतील असें ह्मणावें तर तसें ह्मणतां येत नाहीं कारण प्रत्येक आदितवारीं किंवा दुसऱ्या एखाद्या मोकळीकेच्या दिवशीं निदान पांच दहा तरीं पंचनामे येथें होत असतात असें आढळण्यांत येतें. तेव्हां ह्या अशा पंचाइती करून त्या पैशाची आशा करणारे जातीचे हितचिंतक कसे ठरतील? हा तर जुलुमांचा व लुटारूपणाचा धंदा आहे असें स्पष्ट नजरेस येतें.

अहो जे सत्ताधारी राजे आहेत ते देखील अपराध्यांस शिक्षा केलेला पैसा आपल्या स्वतःच्या किंवा फौजेच्या खर्चास वापरीत नाहींत, कारण तें दूषित द्रव्य होय, असें असून त्या द्रव्याची आशा आमचे लोकांस कां बरें असावी? हें मोठें अनुचित काम नव्हे असें कोण बरें ह्मणणार नाहीं. अनंतर, व्यवसाय चालविण्याचे व भारीपणा प्राप्त करून घेण्याचे धंदे काय सर्व बंद पडले आहेत? तस्मात् ज्या कोणास न्यायानें अगर अन्यायानें बहिष्कृत केला असतो त्याचा बंदोबस्त एकदोन गांवांतील कांहीं लोकांनीं वापर न केल्यानें होतो काय ? आणि होत असल्यास बहिष्कृत याचा अर्थच चुकला आहे असें समजलें पाहिजे. बहिष्कृत ह्मणजे मराठें ज्ञातींतून अगर इतर कोणत्याही हिंदूसमाजांतून अपराध्यास बाहेर काढणें. ह्मणून बहिष्कृत करणें झाल्यास, तशाच प्रकारचें महत्पातक त्या मनुष्याकडून घडलें असल्यास त्यास दूर ठेवितां येईल नाहींपेक्षां क्षुल्लक कारणास बहिष्कृत शब्द वापरणें मोठें अन्यायाचें होतें.

या सदरील हकीकतीवरून असें नजरेस येतें कीं, पंचाईतीचीं कामें करणें ह्मणजे एकमेकांचा अपमान करून परस्पर वाद चालविणें किंवा पांजरापूर सारख्या एखाद्या धर्माच्या ठिकाणीं जाऊन आपल्या बंधुवर्गांची एखाद्या यत्किंचित् चपराशाकडून फजिती करविणें किंवा आपल्या यात बंधुकडून एखादे समयीं चुकून अपराध घडल्यास, त्याजकडून तो पुनः होऊ नये याजबद्दल त्यास पश्चात्ताप होण्यासारखे दोन उपदेशापर शब्द सांगण्याच्या ऐवजीं त्यास पुष्कळ लोकांत [illegible] करणें किंवा पेटत्या अग्नित तेल ओतणें किंवा अखेर कांहीं न साधेल तर मारामारीस उठणें; हींच काय तीं फळें घ्यावयाचीं [illegible]

काय प्राप्त व्हावयाचें आहे.? अरेरे !!! अशींच काय थोरपणाचीं व क्षत्रियांची कामें असतात आणि ह्याच कामानें मागील काळचे मराठे लोक उदयास आले होते काय? बंधुहो! या आमच्या लेखाकडे किंचित लक्ष द्या ह्मणजे आपणांस आपलें खरें कर्तव्य कोणतें हें सहजांशी कळून येईल. न्यायाचीं कामें काय स्वल्प आहेत? तीं कामें चालविण्यास मनुष्याचे आंगीं सदाचरण व विद्वत्ता पाहिजे. सरकार न्यायाचीं कामें चालविण्यास मोठ मोठे हुद्देदार (मामलेदार, मुनसफ, शिरस्तेदार, इ०) ज्यांस उत्तम शिक्षण मिळालेलें असून कानु कायद्यांत पास झालेले असतात अशाच लोकांची या कामीं योजना करते ह्मणून ते कोणत्या अपराध्यास काय शिक्षा असावी हें ठरविण्यास योग्य होतात तथापि एखादे प्रसंगीं एखादे खटल्याचे मिनिट ( निकाल ) देण्यास पुनः त्या विद्वानांस कायद्याचें कलम पहावें लागतें त्याजवरून पहा बरें जे लोक मोठी मेहनत घेऊन कायदे मुखोद्गत करतात त्यांसही पुनः पुनः तीं बुकें पहावीं लागतात, असें जर घडतें तर ज्या लोकांत किंवा जातींत विद्येची कमतरता व नाति नियमांची उणिवता आहे त्यांजकडून एखाद्या कामीं न्याय खरा कसा मिळेल; बहुशः अन्याय होण्याचाच संभव असतो हें निराळें व्यक्त करण्यास नको.

सदरीं दर्शविल्या प्रमाणें जरी आमच्या समाजाची स्थिति होत असते तरीं "पंचाईत" आमचे बंधु वर्गास किती बरें प्रीय झाली आहे आणि त्याकामीं कसे ते झटून जातात हें वरील संख्ये वरून सहज कळेल परंतु एखाद्या व्यवस्थित समाजास जाणें त्यांस मोठें अवघडं असें भासतें, हें एकार्थी नवलच समजलें पाहिजे. त्यांतून असा एक समज झालेला आहे कीं, जो कोणी पंचाईतीचीं कामें शिरावर घेऊन चालवितो त्यास विशेषत्व प्रात्प होतें. परंतू हा समज अगदीं व्यर्थ आहे, कारण जेथें पुष्कळ मंडळी असतां एखादा न्याय होतो त्याचें जोखम हजर असलेल्या सर्वत्र असाम्यांवर असतें, मग अर्थातच खऱ्या खोट्या न्यायाची प्रशंसा त्या सर्वांवर अवलंबून असणार ह्मणून एकास किंवा दोघांसच विशेषत्व मिळण्यांचा संभव नाहीं, याजकरितां समाजांत कोणीही दुराग्रता करूं नये.

तस्मात् जातीचीं कामें निराभिमान पणानें, स्वार्थ रहीत, निष्कपटी पणानें होणें विशेष हितावह आहे. या आमच्या लेखावरून कोणी अशी समजूत घेऊं नये, कीं हा निबंध पंचाईतीचीं कामें बंद करणारा होय तर असा हेतु मुळींच नाहीं. पण इतकें मात्र व्हावें कीं स्वयाती गृहस्थ पांच किंवा सात हजार मिळून जाति व्यवस्थे बद्दल नियमांची बुकें प्रसिद्ध करावीं आणि त्यांच्या समत्ति करितां प्रत्येक कुळातील पांच किंवा त्यांहून अधीक समंजस लोकांच्या सह्या त्याच नियम बुकावर छापून ते नियम सर्वांस कळवावे ह्मणजे कोणा कडून ही कांहीं गैर शिस्थ प्रकार घडून येणार नाहीं; नाहीं पेक्षां मागिल प्रकारच चालून जास्त अनहित होत जाईल हें निर्विवाद होय.

आतां याची पुढील व्यवस्था आह्मीं बंधूजनांकडे सोपवून हा लेख येथें पुरा करते वेळीं; आमचे सुविचारी व सूज्ञ लौकीक प्रिय, बंधूंस अशी सूचना देतों कीं त्यांनीं पंचाईतीच्या चालू क्रमा पासून अलग राहून आपली कीर्ति व कुलार्जित थोरपणा, सदुद्योगानें वर आणावा. आणि आपण तसें करण्यास मागें घेणार नाहीं अशी आह्मांस पूर्ण आशा आहे.

सभा.

७६–७७–७८–७९.

ता० १९ जुलई सन १८८४.

# सभेचा दुसरा वार्षिक समारंभ.

यातिउन्नाति इच्छक व उद्योगी गृहस्थांच्या समत्तीनें हाही वार्षिक समारंभ ता० २७ माहे जुलै सन १८८४ रोजीं माधवबागेंत झाला. त्यावेळीं रा० रा० माधवराव राघोजी रोकडे यांस सभेचे अध्यक्ष नेमून या सभेचे कायमचे अध्यक्ष रा० रा० तुकाराम हरजी पाटील साळुंखे यांची त्यावेळीं उपाध्यक्ष स्थानीं योजना होऊन सभेचें काम अडीच वाजतां सुरू झालें. सभेची एक वर्षाची हकीकत रिपोर्टरूपानें दुय्यम चिटणीस रा० रघुनाथ विठोजी जाधवराव यांनीं अध्यक्षाच्या सूचनेवरून वाचली. तीयेणेंप्रमाणें.

"हें उत्तम स्थळ आजरोजीं ज्या सूज्ञ गृहस्थांनीं येऊन शुशोभित केलें आहे त्यांचे आह्मीं फार आभारी आहों. आणि ज्या ज्ञातिजनांनीं कांहीं विश्रांतीचे दिवस योजून त्यांस सण अशी संज्ञा दिली आहे; त्यां पैकीं हा आजचा नागपंचमीचा एक सुदीन होय. अशा दिवसांची योजना कोणत्या मुद्यांवर झाली आहे, त्यांतील तत्व जाणून मंडळी जणू काय; त्या ज्ञातिजनांचा आभार मानण्यास आज सिद्धच झाली आहे असें वाटतें, यास्तव या विद्वत् जनांचे आभार मानावे तितके थोडेच होणार आहेत, असो.

या सभेचा वार्षिक समारंभ करण्याची जरी ही दुसरी वेळ आहे तरी इतक्यांत समाजासंबंधीं सर्व व्यवस्था सुरळीत पणाची आहे असें विद्वज्जनाच्या नजरेस येण्याचा संभव नाहीं. याजकरितां सूज्ञ गृहस्थांनीं आह्मांत जी उणीव नजरेस येईल, तिचा उपहास न करितां ते गौण मार्ग कोणत्या उपायानें दूर होतील असे मार्ग सुचविण्याची कृपा करावी अशी त्यांस विनंति आहे.

या सभेचे मूळ उद्देश ज्यांस माहित नाहींत असे पुष्कळ गृहस्थ आज येथें आले आहेत, तेव्हां हा आमचा उद्योग कोणत्या हेतुकडे आहे व वर्षाची एकंदर हकीकत, इत्यादि माहिती सर्वांस देणें हाच मनोदय आजच्या समारंभाचा आहे, सबब हा रिपोर्ट संक्षिप्त रीतीनें सभे पुढें सादर करण्यांत येत आहे.

आह्मां मराठे (क्षत्रिय) लोकांची फार मागील काळपासून पराधीनता आमचे दुर्लौकीकास व कनिष्ट स्थितीस कारणीभूत झाली आहे; ह्याविषयीं कदाचित् आह्मांतील कित्येकांनीं एखादे वेळीं तरीं विचार केला असावा, पण त्या विचारांचे बिजारोपण न झाल्याचें उदाहरण आमची सांप्रतची स्थिति होय.

सुदैवेंकरून प्रस्तुतच्या राज्यकर्त्यांच्या व्यवस्थेचे शैलीनें जिकडे तिकडे शांतता पसरली आहे त्यामुळें राष्ट्रिय सर्व लोकांत विद्याज्ञान वाढून बहुतेक लोक आपापल्या सुधारणेकडे वळत आहेत. त्याप्रमाणें आह्मां मराठे लोकांत थोडीशी हालचाल झाल्यास विशेष हित होईल, असें चित्तीं धरून आमच्या कांहीं बंधू वर्गांनीं या कामीं श्रम घेण्याच

निश्चय केला आहे. आणि त्या हेतु सिध्यर्थ नित्यशः मंडळीस कांहीं सांगतां यावें ह्मणून प्रत्येक शनवारीं सभा भरण्याचा कायम ठराव ता० २५ नोव्हेंबर ८२ पासून झाला आहे. आणि फंड चालू असल्यानें ज्ञाति हिताचीं व परोपकाराचीं अनेक कामें घडून येतील असें जाणून तें ही काम सुरू केलें आहे.

या सभेस आज दीन पर्यंत ७९ असामी सभासद झाले आहेत त्यां पैकीं कोण कोण कस कसें सभेचें कामदार आहेत त्याचा खुल्लासा नियम बुकाचे पुरवणींत केला आहे. ता० १९ जुलई सन १८८४ पर्यंत एकंदर ९६ सभा झाल्या, त्या प्रत्येक सभेंत जस जसी मंडळी येत गेली व त्यां पैकीं ज्यांनीं ज्यांनीं या सभे संबंधीं जे जे प्रश्न केले त्या सर्व प्रश्नांचीं त्यांस योग्य उत्तरें देऊन, सभेचा उद्देश त्यांचें मनीं ठसवून देण्यासाठीं सभासदांनीं फारच मेहनत घेतली आहे व घेत आहेत. सभेच्या कामदारां पैकीं ३६ गृहस्थांकडे ५० पावति बुकें उगरणी करितां दिलीं आहेत; त्या बुकांअन्वये त्यांजकडून कस कशी रक्कम जमा झाली इत्यादि हकीकत पुढें दिली आहे.

## जमा खर्चाचा तपशील.

ता० १५ आक्टोबर सन १८८२ पासून ता० २७ जुलई १८८४ पर्यंत सभेच्या कामदारां कडून त्यांच्या स्वतः बद्दल रूपये ६८७ व गांवांतील उगरणी रू ९०४।= एकंदर जमा १५९१ ।=

| | |
|---|---|
| सभा लिस्टा वर दिलेले आंकडे येणें आहेत. | १४० रू० |
| सभासदांकडे उगरणी बाकी येणें आहे. | १६२॥ रू० |
| ता० १ आगष्ट सन १८८३ पासून ता० ३० जून पर्यंत खर्च. | २६८= रू० |

## गुदस्त सालीं.

| | |
|---|---|
| येकंदर जमा. | १०९३।= रू० |
| ता० १५ आक्टोबर सन १८८२ पासून ता० ३१ जुलई ८३ पर्यंत खर्च. | ३९॥।-॥ रू० |

हा जमा खर्चाचा हिशेब विल्हे वारीनें नोंदणीं बुकें नंबर

२-३-४ यांत दर्शविला आहे. हिशोब तपासण्याचें काम कांहीं मंडळी कडे सोपविलें आहे, तथापि प्रत्येक सभेंत, सभेच्या कामदारांस अगर इतरांस ह्मणजे ज्यांनीं आपला उदार आश्रय दिला आहे त्यांस पहाण्याची मोकळीक ठेविली आहे. जमा झालेल्या रकमेंतून खर्च होणें तो किती बेताचा आहे हें सदरील दिलेल्या ताळ्यावरून कळण्या जोगें आहे. सभेंत ज्या ज्या नवीन सूचना मंडळी कडून होतात त्या रास्त अशा सर्वांच्या नजरेस आल्यावर, त्या ताबडतोब अमलांत आणल्या जातात.

ही सदरील रक्कम जमा करण्याच्या कामीं सभेच्या उत्पादकांस फारच मेहनत पडली आहे. असे श्रम पुढें जरीं घ्यावें लागले तरी ते घेण्यास तयार आहेत, असें त्यांचे कृतिवरून सहज अनुमान करितां येतें कारण आज दोन वर्षें कोणी पगारी मनुष्य न ठेवितां किंवा आपला मानापमान न पहातां व वेळीं अवेळीं घडलेल्या श्रमाकडे लक्ष न देतां सर्व कामें स्वतःच चालवित आहेत.

उत्पन्नाच्या संबंधानें आपणास कळविण्यांत आलें. पुढें थोडीशी दुसरी हकीकत द्यावी असा विचार आहे.

गेल्या वार्षिक सभेंत जे आमचे बंधुवर्ग हजर होते त्यांतील कित्येकांस ही हकीकत ऐकून फारच खिन्नता प्राप्त झालीं होती. कारण आह्मां लोकांचा या स्थळीं फारच मोठा भरणा असून त्या मानानें फारच लहान रक्कम उभी राहिली ती ज्यास्त वाढावी या हेतूनें त्यांनीं मोठा प्रयत्न दुसऱ्या दिवसा पासून सुरू केला आणि दोन महिन्याच्या अवधींत कांहीं मेम्बर मंडळी तयार करून ता० ११ आक्टोबर १८८३ रोजीं एक मोठी स्पेशल सभा नेमिली होती. त्यावेळीं जमलेल्या मंडळींतून कित्येकांनीं आपापले भिन्न भिन्न विचार बाहेर काढून संशयांचें निरसन करून घेतलें. त्या दिवशीं सर्वांनीं मोठ्या थाटानें व प्रेमानें एक मेकांस भेटून परस्परांचा निरोप घेतला. तो विजया दशमीचा दिवस अशा ऐक्यतेनें फारच शोभायमान झाला होता. हा योग घडून आणण्यास रा० रा० बाळकृष्ण अर्जुन सांवत भोंसले. गंभाजी भानजीराव राणे, कृष्णाजी येशवंतराव चवाण, दाजीराव कृष्णराव दळवी व सुभा-

नजी खेमजी नाईक तावडे ह्या गृहस्थानीं बरीच मेहनत घेतली होती.

सदरील झालेल्या विचारा प्रमाणें ता० २० आक्टोबरच्या सभेंत ३६ असामी जास्त मेंम्बर झाले आणि ता० ३ नोव्हेंबर ८३ रोजीं सर्वानुमतें कांहीं जास्त नियम ठरवून मंडळी उगरणीच्या खटपटीस लागली.

या सभेंत समंजस ज्ञाति परज्ञातीचे गृहस्थ मराठे दरबारांतील ( संस्थानांतील ) व इतर ठिकाणचे पुष्कळ लोक येऊन गेले. त्यांनीं ही या सभेचा उद्देश जाणून पुढील व्यवस्थे संबंधीं व नित्य सभा असल्याचें महत्व कळवून आपणाकडून होणारे साह्यतेचा विचार प्रदर्शित केला आहे.

या सभेचें अध्यक्ष स्थान, आमचे पूर्ण ज्ञातिअभिमानी व बंधुहित चिंतक रा० रा० तुकाराम हरजी पाटील साळुंखे कुसवरकर, यांजकडे असल्या कारणानें या सभेची व्यवस्था सुरळीत रीतीनें चालली आहे आणि ते या कामीं विशेष मेहेनत घेत आहेत त्याच प्रमाणें हें काम शेवटास जाई पर्यंत आपल्या ज्ञानाचा पूर्ण ठसा बंधुजनाचे चित्तीं उमटविण्यास तसदी घेत जातील अशी आह्मां सर्वांस आशा आहे."

येथ पर्यंत वार्षिक रिपोर्टाची हकीकत देऊन पुरी करण्यांत आली आहे, तींत आणखी पुष्कळ मजकूर ज्ञात वर्गास सूचने दाखल होता पण त्याची द्विरुक्ति होणार सबब येथें घेतला नाहीं.

सभेचा रिपोर्ट वाचून झाल्या नंतर, रा० रा० रामचंद्र कृष्णराव दळवी यांनीं आपला निबंध वाचला, त्यांतील विषय सर्वांस पसंत पडले. नंतर रा० सा० आत्माराम बापुजी दळवी व रा० रा० वासुदेव लिंगोजी बिर्जे बेळगांवकर व गंगाधर बाळकृष्ण गद्रे यांनीं मराठे लोकांस सभा गृहाची व विद्येची अवश्यकता या विषयांवर भाषणें केलीं शिवाय रा० रा० काशिनाथ नारोजी पिंगळे, डाक्टर भगवंतराव रामचंद्र मोहिते, रा० रा० दाजीराव कृष्णराव दळवी, शिवराम देवराव कालेकर, शिवराम नारायण करगुंटकर, व विठ्ठलराव भिवशेट यांनीं ही सभेच्या उद्देशास अनुसरून चांगलीं भाषणें केली. शेवटीं अध्यक्ष व उपाध्यक्ष यांनीं सर्व व्याख्यान कारांच्यां भाषणांतील सारांश घेऊन व

सभेच्या उद्देशाचें महत्व यांवर थोडक्यांत उत्तम प्रतिपादन केलें; त्यांत असा भाग आणिला होता कीं, कोंकणस्थ व देशस्थ मराठे यांत जो साधारण भेद दिसत आहे त्याचें निर्सन या सभे पासून झालें असें समजून सूज्ञ गृहस्थांनीं आपापले द्वैत भाव दूर करून एकत्र विचारानें वागावें यात मोठें भूषण आहे. कोंकण व देश मिळून महाराष्ट्र देश, असें असतां, फक्त सह्याद्रिपर्वताच्या योगानें जे दोन भाग या देशाचे मानतात, त्यावरूनच आपण आपणास पृथक मानणें अगदीं गैर समंजस पणा होय. त्यांतून बहुत करून सर्व कोंकणस्थ मराठ्यांचें मूळ वतनी गांव देशावर आहेत आणि ते अद्याप आपल्या मूळ गावांचा अभिमान बाळगित असून बहूतेकांचा शरीर संबंध ही देशस्थां बरोबर चालूच आहे कांहीं कांचा तुटक झाला आहे व कांहीं कुळें कोंकणांतील फार दिवसांचीं आहेत, असे अनेक निकट संबंध या दोन्हींपक्षांचे असून आपण मराठे लोक येथील मूळ रहिवासी आहोंत तर आपण सर्व एकच आहोंत याचा आमचे शहाणे लोकांनीं दूरवर विचार करून सर्व बंधूवर्ग आपण एकतंत्रानें चालूं अशी योजना करावी ह्मणजे आपणा मराठ्यांचा भागोदय झाला असें होणार आहे आणि या बद्दलचा विशेष खुलासा होण्यास व लोक समंजाचा अल्प विचार दूर होण्यास केव्हां तरी आमचे लोकां कडून एखादी मोठी सभा होऊन निर्णय झाला पाहिजे तरच या आमच्या बोलास विशेष शोभा येईल. या प्रमाणें अध्यक्षाचें भाषण आणखी कित्येक मुद्यांवर होतांच, डाक्टर भगवंतराव रामचंद्र मोहिते यांनीं या सदरील विचारास आपलें अनुमोदन दिलें त्या बरोबर टाळ्यांचा एकच गजर झाला.

या सभेस जे गृहस्थ आले होते त्यांतील कित्येक प्रमुख गृहस्थांचीं नांवें पुढें दिलीं आहेत. पंडित बाळाजी विठ्ठल गांवस्कर, रा० रा० घमाजी बाळाजी रुकारे, जावजी दादाजी चौधरी, बिठोजी सदाशिव हांडे देशमूख, बाबाजी भगवंतराव चवाण, कुशाबा चापाजी काळे, आपा साहेब खानवेलकर, रामजी संतुजी आवटे, विठोजी कृष्णाजी बंडेकर, कृष्णाजी पांडुरंग भालेकर, मारुतिराव तुकाराम गव्हाणे, रखमाजी बिठोजी गव्हाणे, लक्ष्मण जावजीराव वाघ, अमृतराव मोरोबा

शिंदे, मे० सिमियन बेन्जामिन वगैरे पुष्कळ लोक आले होते शिवाय तीन चार वर्तमान पत्रांचे म्यानेजर व एडिटर ही हजर होते, पण ते अध्यक्षाचें भाषण संपतांच गेले सबब त्यांचीं नांवे मिळालीं नाहींत, सभेस याति परयातीची मिळून आठशें मंडळी होती.

आरंभा पासून अखेर पर्यंत कोण काय भाषण करितो, याजकडे सर्वांचें लक्ष लागून राहिलें होतें; सर्व मंडळी स्वस्थपणें ऐकत होती तेणें करून समाज उत्तम प्रकारें निभावला गेला. सभेचे मेम्बर हजर राहून त्यांनीं व्यवस्था चांगली राखिली होती. शेवटीं सभेचे सेक्रेटरी यांनीं कांहीं वेळ भाषण करून सर्व जमलेल्या मंडळीचे व स्थळाच्या मालकाचे आभार मानले. नंतर सर्वांस हार तुरें देऊन साडे पांच वाजतां सभा विसर्जन झाली.

या सभे विषयीं मजकूर सुबोध पत्रिका व दीन बंधु या दोन पत्रांत त्याच आठवड्यांत प्रसिद्ध झाला आहे.

सभेचे सेक्रेटरी
भानजी बापुजीराव.
आंगणें मसुरे.

ता० २७ जुलई सन १८८४.

## निबंध.

### आर्या.

**मतिहीन दीन बहु मी, होउनियां लीन तव पदीं देवा ॥**
**अर्पूनि या निबंधा, वांच्छितसें निशिदिनीं तुझी सेवा ॥**

बांधव हो हें कृत्य आरंभून बरेच दिवस लोटले, याचें कारण काय बरें असावें? मला वाटतें आपल्या ज्ञात समूहास हें तडीस नेण्यास अशक्य आहे असें नाहीं, तशांत हें कृत्य किती महत्वाचें आहे या विषयीं आपणास पक्कें माहित असून, बरेंच विवेचनही झालेलें आहे म्हणून त्याचा विचार येथें कर्तव्य नाहीं.

## श्लोक.

( शिखरिणीवृत्त )

अविद्यानाचें हो मन वळविणें अल्प न कदां ॥
अशा कृत्या माजी अमुप पडले यत्न बहुधां ॥
परी मुख्यांनीं हो तन मन धनाला खरचिलें ॥
अजी प्रेमें लोकां विनवुनी सभेलाहि रचिलें ॥

कोणतेंही कांम लहान असो अगर मोठें असो, जेथें व्यवस्था व ऐक्य नाहीं तेथें तें करण्यास किती विघ्नें येतात, ह्या विषयीं आमच्या सूज्ञ ज्ञात बांधवांची तर बालंबाल खात्री झालीच आहे नीटव्यवस्था व एकी जर ज्ञाति मध्यें असती तर हें केव्हांच होऊन गेलें असतें; परंतु तिचीच जर उणीव आहे, तर त्यांस कोणाचा इलाज! तथापि सभे शिवाय दुसरा इलाजच नाहीं असें मनांत येऊन त्यांनीं आठवड्यास सभा भरण्याचें ठरविलें;पण सभेची अभिरुचि ह्मटली ह्मणचे विद्वांनास असते आणि अशांची संख्या जरी आह्मां मध्यें थोडी आहे तरी परस्परांच्या प्रीतीची अभिरूची होती ह्मणूनच या सभेनें आजचा सुदीन पाहिला असें ह्मणण्यास चिंता नाहीं. मला सभे संबंधीं जरीं थोडेसें लिहावयाचें आहे तरीं विद्या हें जें सर्व गोष्टींचें मूळ बीज तिजविषयीं प्रथम थोडासा विचार दर्शवितो

मनुष्यास ईश्वरानें चर्म चक्षु दिलेले आहेत, त्यांच्यायोगानें जवळचा पदार्थ मात्र दिसतो परंतु ज्ञानचक्षु अदृश्य पदार्थ दृश्य करितात व चर्मचक्षुंस नीट वाटेनें नेतात, आणि तेच जर नाहींत तर हीं चर्म नेत्रें असून नसून सारखींच. या सर्वांचें कारण विद्या हें होय. तशांत तिचें व आमचें पहिल्यापासून बरेंच वांकडें आहे, आणि तिच्याच शापा मुळें ही आमचा दुर्दशा होत चालली आहे; त्यास अभ्यास हेंच उपशमन होय. तो अभ्यास जों पर्यंत आह्मांस आवडणार नाहीं, तों पर्यंत ती आह्मांस कधींच आशीर्वाद देणार नाहीं. जों पर्यंत आमची सद्दी होती, तों पर्यंत आह्मांस तिची किंमत न समजतां, लिहीण्याचें बारिक काम कारकुनानेंच करावें, असें वाटून एकास दोन

कारकून ठेवित होतों, परंतु त्यांपासून किती फायदा झाला हें मनोमन साक्ष; आणि आतां तर त्या दोहोंतून एकही शक्ति नसल्यामुळें, "तेल गेलें तूप गेलें व धुपाटणेंही जाऊं पहात आहे" अशी अवस्था झाली आहे.

जर आपण आपल्या वाडवडिलांच्या पराक्रमास व नांवांस अनुसरून न वागतां फक्त फुशारक्या मिरविल्या तर त्यांत कांहीं एक निष्पन्न न होतां निंदेस मात्र पात्र होऊं हें मनांत घोळत असलें पाहिजे, आणि नियम हे कालान्वयें फिरतात, व हल्लीं तरवारीचें कालमान पर राज्यांत आह्मांमध्यें अगदींच कुंठित झालें आहे तरीं लेखणी हेंच एक प्रखर शस्त्र आहे तेव्हां हें शस्त्र जोंपर्यंत आह्मीं हातीं धरणार नाहीं, तोंपर्यंत आमची उर्जित दशा न येतां, ह्या भवसागरांत अशाच गटांगळ्या आह्मांस खाव्या लागणार; ह्मणून आपल्या मुलांबाळांच्या अभ्यासाकडे अवश्यमेव यथाशक्ति लक्ष पुरविलें पाहिजे; आपले वडील ज्या शस्त्रानें प्रसिद्धीस आले त्यापेक्षां या शास्त्राचें महत्व मोठें आहे; कारण या "श" ला एका कान्याची जरूरी आहे; तसेंच त्याचें महत्व ही विशेष आहे. पहा बरें शास्त्राच्या योगानें, लक्षावधि प्राण्याचें जीव वांचले व वांचत आहेत व दुर्जनांस तें वाटेवर आणीत आहे. परंतु शस्त्राच्या योगानें लक्षावधि प्राण्यांचें हनन होऊन कित्येकांस रानोमाळ पळावें लागलें व लागत आहे तर मद्बांधवहो तुह्मीं आपल्या बालकांस हें शास्त्र शिकावयास लावा अशी मीं आपणास विनंति करीत आहें. ह्यापासून अकल्याण कधींच व्हावयाचें नाहीं, अशा शास्त्रसंपन्न मनुष्यांस राजापेक्षांही अधिक मान आहे असें समजायाविषयीं एक कवि ह्मणतो.

**विद्वत्वंच नृपत्वंच नैवतुल्यं कदाचन ॥**
**स्वदेशे पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते ॥**

आतां हा विषय येथें सोडून सभेकडे वळूं. ज्याप्रमाणें मूल जन्मास येतांच त्यास सर्व वस्तु नवीन भासूं लागतात; त्याप्रमाणें आमचा ज्ञातबांधव समूह ह्या मुंबई शहरीं जरी मोठा आहे, तरी परस्परांची ओळख

पडण्याचें व प्रीति जडण्याचें कांहींच साधन नसल्यामुळें आपण परकीय समजून हें कृत्य करण्यास इतके दिवस लाविले; व सभा ही एक विलक्षण योजना आहे असें भासलें आणि हाच समज जर कायम राहिला तर आमची स्थिती पुढें कशी होईल हें सहज लक्षांत येईल. यावरूनच आमच्या ज्ञातिमध्यें कशी व्यवस्था आहे, हें लोकांच्या दृष्टोत्पत्तीस येत चाललें आहे. इतकेंच नाहीं, तर आमचें अस्तित्व ह्या शहरीं असून नस्तित्वच भासत आहे. कारितां आतां तरींही चुकी सुधारण्याविषयीं प्रत्येकानें लक्ष पुरवावें ह्मणजे सर्व ज्ञातिनें पुरविल्या सारखें होईल. आणि याप्रमाणे होतें ह्मणुनच आपल्या पूर्वजांची कीर्ती दिगंतरीं विलसत आहे. त्यांच्या पुत्रांनीं स्वतां बसण्यास सभागृहसुद्धां करूं नये काय? व अजूनही लोकांच्या धर्म शाळेंत बसावें लागतें याजकडे ज्ञातिचें लक्ष कसें जात नाहीं नकळे. कोणी ह्मणतील कीं आह्मांस ज्ञातीशीं काय करावयाचें आहे; तर त्यांनीं पक्कें लक्षांत ठेवावें कीं, ज्या प्रमाणे एका कुटुंबांतील माणसांचा परस्पराशीं निकट संबंध असल्या शिवाय चालावयाचेंच नाहीं, त्या प्रमाणें ज्ञात हें एक कुटुंबच आहे त्या कुटुंबांतील माणसांनीं प्रीतीनें वागून जर परस्परांस मदत केली नाहीं, तर तें कुटुंब कधींही उदयास यावयाचें नाहीं; व त्या पासून एकासही फायदा न होतां, जें नांव त्यास शोभा देत असतें, त्या नांवास ही बट्टा लाविल्या सारखा होईल, आणि तो एकदां दोष लागला ह्मणजे त्या मनुष्यांच्या सर्व कृत्यास लागलाच असें समजलें पाहिजे. ह्मणून बांधवहो आतां तरी सावध व्हा ही झांकलेली मुठ सव्वा लाखाची; त्या प्रमाणें हें कृत्य करूं इच्छिणारांनीं मोठ्या नेटानें कित्येकांचें हृदय भेदक शब्द सहन करून अजून पर्यंत झांकून ठेविली आहे, तीस आतां तरी बळकटी आणा; आणि हें जें कार्य करण्याचें पुष्कळ दिवसांपासून घाटत आहे तें सिद्धीस न्या. मग तुह्मीं आपलीं सर्व कामें सिद्धीस नेल्या सारखीं होतील, यांत कांहीं एक संशय नाहीं. ह्या कृत्या पासून पारमार्थिक सुद्धां लाभ आहेत, ते येथें दर्शविले असतां, विस्तार होऊन श्रोत्यांस कंटाळा येईल ह्मणून बंद कारितों. तरी जेव्हां ही ज्ञातीची सभा आप

ल्या धर्म शाळेंत भरत जाईल, तेव्हां वर सांगितलेले सर्व लाभ आप ल्या हातांतले होतील या विषयीं एक कवि ह्मणतो:—

**कुलीनैःसह संपर्कं पण्डितैःसह मित्र ताम् ॥**

**ज्ञातिभिश्च समं मेलं कुर्वाणो न विनश्यति ॥**

प्राचीन काळीं आपल्या पूर्वजांस विद्येचा व सभेचा जरी फारसा नाद नव्हता, तरी जों पर्यंत दरबार होतें, तों पर्यंत एकत्र जमण्याचा व एकमेकांचे विचार कळविण्याचा सांप्रदाय होता ह्मणूनच त्यांचे इच्छित हेतु सिद्धीस गेले. आतां ती सभा आपणास अलभ्य आहे ह्मणून दुःखच करून निश्चित रहातां कामा नयें, तर विचार केला असतां पूर्वींच्या सभे पेक्षां हल्लींच्या सभेंत जाणारास अधिक फायदे आहेत असें ह्मटलें असतां चालेल. कारण सुखाची किंमत काय आहे हें दुःखाचा अनुभव असल्या शिवाय समजत नाहीं, आणि तो अनुभव पूर्ण येत चालला असतां अजून डोळे झांक कांवरें होते? सभे पासून खरो खरच फायदे आहेत. ह्या विषयीं एक कवि ह्मणतो:—

**केल्यानें देशाटन, पंडित मैत्री सभेंत संचार ॥**

**शास्त्र ग्रंथ विलोकन, मनुजा चातुर्य येतसे फार ॥१॥**

(त्यावर) **नलगे मुक्ती धन संपदा ॥ संतसंग देईं सदां ॥**

**तुका ह्मणे गर्भवासीं ॥ सुखें घालावें आह्मांसी ॥ १ ॥**

येथें वरच्या चरणांत, सदां ह्या शब्दाचें महत्व जास्ती आहे. सदां ह्मणजे, ह्या सभेची व पुढच्या वार्षिक सभेची भेट घेणें इतकेंच नाहीं. तर सदां सर्व काळ सभेस जाणें हें आहे. परंतु आमचे पाठीं पोट लागलें आहे. त्यामुळें सदोदीत सभेस जावयास बनणार नाहीं; तरीं आठवड्यांतील सभेस यावयाचा सुद्धां आळस कां? बरें सभेस आले तर जागयाची कुरकुर चाललेली असते; ह्या साठीं अवंतर याति प्रमाणें आह्मांस विश्रांति स्थान असावें, व ज्या आमच्या

बंधु नात्याचा वियोग झाला आहे, त्यांचा पुन्हा समेट होऊन प्रीति जडावी ह्मणून हा जो स्तुत्योद्योग आरंभिला त्याचा जो वाढ दिवस तोच आमच्या आस्तित्वाचा, हें वर दर्शविलें आहे. आजचा जो हा समारंभ योजिला तो मागील आरंभास खरोखर शोभा देणारा होय. परंतु प्रत्येकानें आपली नीट व्यवस्था ठेविल्या वर ह्या कामास अधिक मदत करितां येण्यासारखी आहे. ह्मणून.

## श्लोक.

(शार्दुल विक्रीडित.)

**आदा पाहुनि खर्च उत्तम करा न्यायें तशी संपदा ॥**
**संपादा मग इष्ट होईल सदा जातील त्या आपदा ॥**
**नांदा गोडपणें जनीं परि मनीं व्हाव्या न त्या दर्पदा ॥**
**बाधा आणुं नयेच्चि बंधु जन ह्या कार्यास तारा सदा ॥१॥**

ज्या प्रमाणें सोंगें फार व रात्र थोडी त्या प्रमाणें सभा गृह व धर्मशाळा बांधतां बांधतां बहूतेक दिवस गेले व जवळ पुंजी थोडी पडली, ह्मणून अजून तरीं कमर बांधा, आणि ह्या कार्यास मिठी मारा, अशी मी विनंति करीत आहें; कारण पुष्कळ दिवसां पासून अवंतर यातीचें लक्ष ह्या आपल्या कृत्याच्या परिणामाकडे वेधलें आहे. आणि अशांत जर कम जास्त झालें तर लेखणी पाजवून ते तयार आहेत याची ईर्षा बाळगा ही माझी विनंती आहे.

## आर्या.

**पळ विश्रांति न घेतां, वळवीं कृत्याकडे त्वरें दळवी ॥**
**कळवी सर्व जनाला, मळवी हा काळ कीर्तिला पळवी ॥**

आपला

रामचंद्र कृष्णाजी राव दळवी.

जानवल.

ता. २७ जूलै सन १८८४.

# निबंध.

स्वज्ञात बांधवांस विनयपूर्वक कळविण्यांत येतें कीं आलीकडे कित्येक वर्षांपासून आपल्या लोकांची फार वाईट स्थिती होत चालली आहे. तिज विषयीं जर आपण कांहीं तजवीज करणार नाहीं, तर या पुढें याही पेक्षां फार भयंकर स्थिति होईल यांत संशय नाहीं. कारण हल्लींच आह्मांपैकीं कित्येक लोक अनेक प्रकारच्या दुर्व्यसनांत सदा निमग्न होत असून त्यांची उत्तरोत्तर विशेष दृढताही होत चालली आहे आणि तेणेंकरून आज मित्तीस शेंकडों घरें धुळीस मिळालीं आहेत तरीं लोक सावध होत नाहींत ही किती दुःखकारक गोष्ट आहे? आणि अशा वाईट कामा करितां लोक अतोनात द्रव्य खर्चीं घालित असतात परंतु आपलीं मुलें शाळेंत घालून शहाणी करण्याचें मुळींच स्मरण रहात नाहीं. नशीब त्या बिचाऱ्या दुर्दैवी मुलांचें यापरतें दुसरें काय ह्मणावें. पहा बरें, जो पैसा ह्या असल्या छंदांत खर्चीं पडतो तोच जर मुलांच्या विद्येंत खर्चीं पडेल तर तीं मुलें ज्ञान संपन्न होऊन सुखी होतील व आपल्या पालकांचे सद्गुण आठवून वेळोवेळीं ईश्वराजवळ त्यांजकरितां दुवा मागतील; ह्मणून मी आपणास विनयपूर्वक प्रार्थना करितों कीं, ज्या कोणास कित्येक दुष्ट चालीचा स्पर्श झाला असेल त्यांनीं इतःपर सावध होऊन सुविचाराचे मार्ग हातीं धरावे आणि जे सद्सद् विचारी गृहस्थ आहेत त्यांसहित सर्वांस हेंच कळविणें आहे कीं त्यांनीं आपल्या अज्ञ मुलांस विद्यामृत पाजावें. हल्लीं पहा कोणास एखादें मूल झालें कीं, त्याचें लग्न केव्हां होईल या विवंचनेंत तो असतो व एकदां त्याचें लग्न झालें कीं तो आपणास कृतकृत्य समजतो त्या लग्नाचा परिणाम पुढें कसा कां होईना तिकडे त्याचें फारसें लक्ष नसतें. जरी कदाचित् लग्ना पुरता पैसा त्याजपाशीं नसला तरी दुसऱ्याकडून कर्ज काढून त्याचें लग्न करितो; आणि आपणास नेहमीच्या दुःखांत पाडून घेतो. पण मुलाच्या आयुष्याचे सर्व दिवस सुखांत जातील अशा साधना करितां पैसा नसतां कर्ज काढल्यास तो दोषास पात्र न होतां

स्तुतीस पात्र होईल; ह्मणून कधींही लग्नाकरितां पैसा काढूं नये, परंतु विद्या देण्यास काढिल्यास हरकत नाहीं. कदाचित् तो पैसा बाकी राहिल्यास त्याचा मुलगा मोठ्या संतोषानें त्याची फेड करील यांत संशय नाहीं. कारण कोणाच्याही कल्याणा करितां पैसा खर्च केला आणि तेणेंकरून त्याचें कल्याण झालें असून तो पैसा देणार नाहीं, हें कदापि घडणार नाहीं. लोकांचा असा चमत्कारिक समज पडून गेला आहे कीं, मुलाचें लग्न करून एकदां नातवाचें मुखावलोकन केलें कीं सार्थक झालें. कांहींकांची अशी इच्छा असते कीं, आमच्या मुलाचे दोन हातांचे चार हात केव्हां होतील, हा केवढा बरें भोळेपणा! त्यांनीं आपल्या मुलांस हरएक प्रकारें विद्याभूषित करणें हें त्यांचें कर्तव्य असून ते भलभलतीच इच्छा बाळगितात आणि लग्नास अतोनात पैसा नीरर्थक खर्च करितात.

जर कोणास विचारलें कीं, बाबानो तुह्मीं एवढा पैसा कां खर्च करितां, तर ते असें ह्मणतात कीं, आमचे वाडवडील असे करीत आले ह्मणून आह्मांसही करणें भाग आहे. परंतु ते असा विचार करीत नाहींत कीं, पूर्वींचे लोक हल्लीं प्रमाणें कर्जबाजारी नसून ते इतके चांगल्या स्थितीचे होते कीं त्यांस एक दोन तर काय पण पांच दहा लग्नें कांहीं कर्ज घेतल्या विना करण्याचें सामर्थ्य होतें. आणि त्या वेळीं धान्य वगैरे फार स्वस्त असे परंतु हल्लींची स्थिति फार निराळी आहे. धान्यादि वस्त्र प्रावर्ण हीं फार महाग आहेत व हल्लीं अशी क्वचित घराणीं सांपडतील कीं, कर्ज काढल्या शिवाय एखादें लग्नकार्य करूं शकतील. अशा प्रकारें लोक द्रव्यहीन असून ते मागील लोकांप्रमाणेंच आपण चालण्यास पहातात हें किती गैर आहे, याचा सर्वांनीं विचार करावा. शहाण्या मनुष्याचें काम असें नसतें, तो कालमानाकडे लक्ष पुर्वून जें कांहीं करणें तें करितो; त्या मुळें त्यास पुढें पश्चात्ताप करावा लागत नाहीं. पहा बरें पुर्वीं एका गावांहून दुसऱ्या गावांस लोक पायानींच चालून जात असत कारण त्या वेळीं आगगाडी नव्हती, पण आतां आगगाडीच्या योगानें मनुष्य सुरक्षितपणें दूरदूरचे प्रवास करितो; तेव्हां जर कोणी असें ह्मणेल कीं आमचे वाडवडील अशा अग्नि रथांतून पूर्वीं कधींच गेले

नव्हते, ह्मणून मीही जाणार नाहीं तर तो अडाणी ठरेल कीं नाहीं? या शिवाय शहाणे लोक त्यास दुसरी कोणती उपमा देतील बरें? कारण विचार करून पाहिलें ह्मणजे पूर्वी आगगाडी नव्हती मग अर्थांतच वडीलांस पायीं प्रवास केल्या विना दुसरें साधन नव्हतें. त्याच प्रमाणें पूर्वीं लोक सधन होते ह्मणून ते तसा खर्च करीत होते ह्मणून काय आपण करावा? तर नाहीं. हल्लींच्या काळास जें योग्य दिसेल तें करण्यास झटलें पाहिजे ह्मणजे अल्प वयांत मुलांचीं लग्नें न करितां त्यांस प्रथम विद्याच शिकवावी नंतर आपल्या सामर्थ्यानुरूप त्यांचें लग्न करावें. जों पर्यंत मुलगा विद्या शिकून स्वतःचा चरितार्थ चालविण्यास हरएक प्रकारें समर्थ होणार नाहीं तों पर्यंत त्या मुलाचें कल्याण इच्छिणाऱ्या बापानें कदापि लग्न करू देऊं नये, असा सर्वांनीं नियम करावा. हा नियम हल्लीं फार अगत्याचा आहे. जर या नियमास कित्येक धर्म भोळे लोक अडथळा आणतील तर त्यांस न जुमानतां, शहाणा व दुरदर्शी मनुष्य त्याचें शांतवन केल्या विना कधींच रहाणार नाहीं. आणि या योगें लोकांचे उत्तरोत्तर कल्याणही होईल.

विद्या देण्याच्या कामीं सर्वांनीं मनोभावें प्रयत्न करावा, प्रयत्न केल्यानें मोठ मोठीं कामें सिद्धीस जातात आणि त्याबद्दल असें ह्मटलें आहेकीं "प्रयत्नें वाळुचे कण रगडितां तेलही गळे" यास्तव प्रत्येकानें अशा महत्वाच्या कामास तन, मन आणि धन येणें करून मदत करावी. आतां कदाचित् कोणीं अशी कुरकुर करील कीं, आपल्या सर्व बंधुवर्गांचीं मनें वळविण्या जोगी एवढी मोठी खटपट कोण करीत बसतो? आह्मांस आमच्या पोटाचीं कामें पुष्कळ आहेत तर अशा अल्प विचारानें हतवीर्य होणें कांहीं कामाचें नाहीं अशानें दास्यत्व मुक्तता कधींच होणार नाहीं; एकदम एका वेळींच जरी मोठी खटपट सर्वां कडून झाली नाहीं, तरी प्रत्येकानें थोड थोडा प्रयत्न करावा. गृहस्थ हो! अशा स्तुत्य कामीं उशीर करूं नका जी घडी जाते ती पुनःयेत नाहीं, असें ह्मणूं नका कीं, उद्यां करूं, परवां करूं ह्या बद्दल एक ह्मण आहे कीं, "एक उद्यां ह्मणें तर सहज दिवस दुणें," ह्या कामास तुह्मीं आपसांतील वैमनस्य, तिर-

स्कार हे सर्व एकीकडे फेंकून मित्रत्वानें व बंधुत्वाच्या नात्यानें वागण्याचा एक सारखा प्रयत्न करा.

आतां ह्या कामा साठीं सर्वांनीं आपल्या शक्ति प्रमाणें बराच मोठा फंड जमा केला तर निराश्रित व गरीब मुलांसही ज्ञान संपादन करण्याची चांगली मदत करितां येईल या उपर जे कोणी असें ह्मणतील कीं, आमचे जवळ द्रव्य नाहीं, तेव्हां अशा भारी कृत्यास आह्मीं मदत कशी करावी, तर त्यांस आह्मीं असें विचारितों कीं, आपल्यांतील कांहींकांचा पैसा, नाच, तमाशे, बैठका इत्यादि दुर्व्यसनांत व आप्त सोयरेधायरे यांच्या लग्नांत व ते घरीं आले असतां त्यांचे आदर सत्कार करण्यांत कितीसा खर्च होतो, या सर्वांचा हिशोब केला ह्मणजे केवढी मोठी रक्कम निरर्थक खर्च होते हें सहज तुह्मांस कळून येईल, आणि अशा मोठ्या रकमा खर्च करण्यांत एवढें मोठें औदार्य दर्शवितां तर मग तुमच्या प्रिय बालकांचें कल्याण ज्या विद्याज्ञानानें होण्या सारखें आहे त्या कामीं पैसा देण्यास कां बरें तुह्मांस जड जातें हें समजत नाहीं. पहा ज्या लोकांत विद्या आहे त्यांची आज जगांत किती प्रतिष्टा आहे? हें तुह्मांस कळत नाहींकाय? पहा पार्शीलोक ह्याकामांत कसे पुढें सरसावले आहेत, ते किती सुखाचा अनुभव घेत आहेत; त्यांतील बहुतेक कोणी ब्यारीस्टर, कोणी वकील, कोणी माजीस्ट्रेट अशा अनेक प्रकारच्या सरकारी जागा चालवीत आहेत, कित्येक मोठमोठाले व्यापारी आहेत, हा कशाचा प्रताप? तर विद्येचा. कारण असे गुण अंगीं येण्यास विद्येचीच अवश्यकता पाहिजे. विद्येशिवाय कांहीं होणार नाहीं, असें समजून तेलोक स्वतःच्या खर्चानें मोठमोठालीं विद्यालयें बांधून आपल्या जातींतील मुलांस विद्या शिकवीत आहेत ह्मणून गरीब व श्रीमान् हे दोघेही विद्येचा सारखा लाभ घेत आहेत, तेणेंकरून त्यांपैकीं प्रतिवर्षीं शेंकडों विद्यार्थी परिक्षेंत पास होऊन त्यांची विशेष भरभराटी होत आहे.

कित्येक लोक अशी शंका घेतील कीं आलीकडे जितके लोक शिकलेले आहेत त्यांतून बहुतेक चाकरीविना भटकत आहेत परंतु

चाकरीचा कोठें पत्ता लागत नाहीं; तर त्यांस असें उत्तर देतां येतें कीं, कारकुनी करण्याकरितांच मात्र विद्या शिकावी असें नाहीं. विद्या असल्यानें येकंदरींत दुसरे नानाप्रकारचे फायदे होतात त्यांचें विशेष स्पष्टीकरण पाहिजे असल्यास सभेचें मागील विद्या विषयावरील व्याख्यान पहावें. विद्येच्या योगानें धूर्तलोक अज्ञानांस कसकसे ठकवीत आहेत हें कळून येईल. ज्यांस विद्या आहे अशीं मनुष्यें त्या धूर्तांच्या फाशांत न पडतां निभावून जाऊं शकतात. विद्येचें केव्हांनाकेव्हां तरीं फळ मिळतें हें पक्कें समजा. एका उर्दू कवितेंत असें ह्मटलें आहे कीं:—

**कलमबोला मै शाहानशा बडाऊं ॥**
**जो लिख शकता उस्सें सुलतान बनावूं ॥**
**अगर कमबखत हुवे तोभी एकवक्त ॥**
**उस्से दौलतकी लज्जत चखावूं ॥**

ह्मणून मनुष्यास विद्या असणें फार अगत्याचें आहे यासाठीं आपणामध्यें असा काहीं नियम करा कीं जेणेंकरून सर्वांस विद्या शिकणें भाग पडेल ह्मणजे मुलगा विद्या शिकल्याशिवाय त्याच्या बापानें त्याचें लग्न कदापी करूं नये आणि मूलीच्या बापानें अशिक्षीत मुलांस आपली मुलगी कदापि देऊं नये. अशा प्रकारचा ठराव केल्यानें मुलगे विद्या शिकून सहज हुशार होतील. आणि विद्येचा फायदा तुह्मांस कळून येईल, यास्तव गृहस्थहो! तुह्मांस जें कांहीं सुचविलें आहे त्यांचा तुह्मीं सर्व मिळून विचार करा ह्याकांमीं जेवढा उशीर कराल तेवढा तुह्मीं आपला नाश करून घेत आहां असें होईल. अशी अमोल्य वेळ न दवडितां तिचा योग्य उपयोग करून घ्या. आमचे दयाळू सरकारही विद्या देण्याचे कामी फार मेहनत घेत आहे हा त्यांचा आपणावर महत्‌उपकार समजला पाहिजे. पूर्वीं एकाच यातिकडे विद्या होती बाकीचे बहुतेक लोक विद्यारहित होते आणि दुसऱ्या यातींनें विद्या शिकूंनये असा कडक नियमही होता. आणि तो नियम करणारांचा असा मनोदय होता कीं, इतर लोक विद्या शिकून शहाणे होतील तर आपणांस कोणी

पुज्य मानणार नाहीं. अशा हेतूनें लोक जितके अज्ञानांत रहातील तितका त्यांनीं प्रयत्न करण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं, पण हा त्यांचा साधकपणा सांप्रतच्या राज्यक्रांतीनें मागें पाडून लोक शहाणे करण्याचा यत्न चालला आहे. अशांत तरी ज्ञान संपादन करून आपल्या मनुष्यदेहास खरें भूषण चढवा.

आतां तुह्यांस शेवटीं दोन्ही कर जोडून मी अशी प्रार्थना करितो कीं, जे कोणी आपणा पैकीं सुधारणुकेच्या कामीं पुढें सरून ज्ञातिकल्याणार्थ झटत आहेत, त्यांस साह्य द्यावें, त्यांचे उद्देश बरोबर समजून घेऊन सर्वांनीं तें गाडें योग्य मार्गानें न्यावें; असें ह्मणूनका कीं, सभा गृह तयार झाल्यावर वर्गणी देऊं, असें ह्मणून दोषास पात्र होऊं नका. लोक ह्मणतात ह्मणून तुह्मींही ह्मणतां परंतु अशा बोलांत काय अर्थ आहे त्याचा सूक्ष्म विचार प्रत्येकानें करावा ह्मणजे ह्या उद्योगा पासून तुह्मांस नफा किंवा नुकसान आहे तें सहज समजून येईल.

आतां तुह्मांस कळविल्याप्रमाणें चालून यश मिळवा, आणि ईश्वर तुह्मांस तसें करण्यास सुबुद्धि देवो अशी मी परमेश्वराची प्रार्थना करून आपला निरोप घेतों.

आपला.
रघुनाथ विठोजी जाधवराव.

ता० २३ आगष्ट सन ८४

## दसऱ्याचे सणा निमित्त दुसरा समारंभ.

---

ता० २९ सप्टेंबर सन १८८४ रोजीं बाटलीवाल्याच्या धर्मशाळेंत एक मोठा समाज भरला होता. सभेचें काम तीन वाजतां सुरू झालें. आरंभीं गोविंद कृष्णराव दळवी यानें "एकी" व गणपत राघोजीराव चवाण यानें "मराठे ज्ञातीच्या उत्कर्षा विषयीं कर्तव्यता" अशा विषयांवर निरनिराळे निबंध वाचले त्यांत त्यांनीं दर्शविलेले विचार त्यांच्या बुद्धिसामर्थ्यानुरूप होते ते मंडळीस बऱ्याच अंशीं पसंत पडले. नंतर रा० रा० दाजीराव कृष्णराव दळवी यांनीं मंडळी जमण्याचे प्रयोजन व असे

समाज भरत असल्याने होणारे लाभ याजबद्दल चांगलें भाषण केलें. पुढें रा०रा०कृष्णाजी अर्जून केळुसकर व रा०रा०पांडुरंग भिकाजी राव विश्वासराव यांनीं ही समयोचित् भाषणाचा ओघ उत्तम प्रकारचा आणिला होता. त्या उपरांत रावसाहेब आत्माराम बापुजी दळवी यांनीं धर्मसंबंधीं कांहीं मुद्दे घेऊन त्यांचें हल्लींचेकाळीं महत्व कितपत आहे व मराठे (क्षत्रिय) या भूमीचे मूळ आर्य (श्रेष्ट) असतां त्यांचें श्रेष्टत्व बळेंच नष्ट करून त्यांस दस्यु, शूद्र, अज्ञानीं व हलकट असें कोणी ठरविलें इत्यादिक मुद्यांवर अतिसुरस व्याख्यान दिलें. शेवटीं रावसाहेब यांनीं आपले असे उद्गार काढिले कीं, मराठे लोक आपल्या महत्वास लाथ मारून स्वार्थीलोकांच्या थापेखालीं राहूं इच्छितात, हें या देशाचें मोठें दुर्भाग्य आहे. परंतु हल्लीं कित्येक त्यांपैकीं या लांछनापासून दूर होण्यास आपल्या ज्ञातबंधूंचीं मनें वळवित असतांही त्यांच्या यत्नांस अद्याप पर्यंत यश न येणें किंवा या सभेच्या हेतूप्रमाणें सभा गृह न उभारलें जाणें हा मोठाच चमत्कार होय, इत्यादि अनेक विषय रावसाहेब यांनीं आपल्या भाषणांत आणून व्याख्यान पुरें केलें.

शेवटीं सभेचे सेक्रेटरी यांनीं, ज्या लोकांनीं सभेच्या फंडाबद्दल कांहीं प्रश्न केले होते, त्यांचीं समर्पक उत्तरें देऊन रावसाहेब दळवी यांचे व जमलेल्या इतर मंडळीचे आभार मानून असें कळविलें कीं, जसे आज दोन वर्षे आपल्या बंधुवर्गांनीं या सणानिमित्त समाज भरले, त्याचप्रमाणें पुढेंही नित्यशः भरत असावेत; इत्यादि भाषण आटोपल्यावर साडेसहावाजतां सभा विसर्जन झाली. सभेस मंडळी सुमारें २२५ होती सर्व लोक मोठ्या आनंदानें घरीं गेले.

**सभा.**

८४.

# तेलंगु लायब्ररी.

## किंवा

## सभाग्रह.

आह्मीं या सदरील स्थळा विषयीं दोन शब्द लिहितों व ते लिहिणें आमचें कर्तव्यच होय.

ही सभा उपस्थित झाल्या वेळे पासून ता० ११ आक्टोबर सन १८८४ पर्यंत सभेचें स्थान, सरजमशेटजी जिजीभाई बाटलीवाले यांनीं परोपकारार्थ बांधलेली धर्मशाळा ठिकाण ताडदेव चुनाभट्टी हें होतें, त्या स्थळीं बरेच दिवस सभा चांगल्या प्रकारें चालली परंतु तेथें थोडा एक दोन वेळ विरुद्ध प्रकार मंडळीच्या नजरेस आल्यावरून मंडळीनें कोठें सोईवार जागा भाडें देऊन अगर लोकहितार्थ मिळावी ह्मणून पुष्कळ प्रयत्न केला पण दोन तीन महिने कोठेंच जमलें नाहीं, त्यामुळें सभासदांचीं मनें किंचित दिलगीर झालीं होतीं, तथापि आणखी तपास चालू ठेविल्यामुळें यत्न सफळ होऊन हल्लींचें उत्तम स्थळ प्राप्त झालें; यास्थळाची खटपट रा० रा० कृष्णाजी येशवंतराव चवाण यांनीं केल्या नंतर सभेस कळविलें, त्या प्रमाणें पुढील व्यवस्था ह्मणजे तेलंगु कामिटीचे मुख्य मेम्बर यांस सभेचे नांवें अर्ज पाठवून व समक्ष भेट घेऊन, त्या सूज्ञ पुढारी गृहस्थांस या सभेच्या जाग्याची गैरसोईमुळें होणारी अव्यवस्था रा० रा० गणपतराव लक्ष्मणराव माने, रा० रा० सूर्याजी धनाजी नाईक नीळवर्ण व सभेचे सेक्रेटरी यांनीं कळविली तीचा त्या प्रमुख गृहस्थांनीं पूर्णपणें विचार करून ता०. १८ आक्टोबर ८४ पासून हें सुस्थळ सभे करितां वापरण्यास परवानगी दिली. त्यावेळेपासून या सभेचें काम निर्विघ्नपणें चालत आहे, याजबद्दल आह्मीं सर्वत्र, तेलंगु मंडळीचे व त्यांनीं योग्य व योग्य विचारानें नेमलेले ट्रस्टीज, रा० रा०

नागु सयाजी, रा० रा० नरशींगराव सायबु व रा० रा० काराडे लिंगु याच प्रमाणें रा० रा० सयाजी आरसन्ना तेलंगु कमिटीचे सेक्रेटरी, या सर्वांचे आह्मीं फार फार आभारी आहों,

या सदरील गृहस्थांनीं आजपर्यंत ज्या प्रमाणें आपला उदाराश्रय देऊन अनेक परोपकार्यांस उत्तेजन आणिलें त्याचप्रमाणें पुढेंही तशीच सद्बुद्धि या थोर गृहस्थांचे चित्तीं सदा जागृत राहो अशी आह्मीं मनःपूर्वक जगत्पतीची प्रार्थना करीत आहों.

बंधुजनहो! हें स्थळ ज्या गृहस्थांनीं आपल्यास वापरण्यास दिलें आहे त्यांची थोरवी वर्णन करावी तितकी थोडीच आहे. परंतु या आपल्या दोन शब्दानें त्यांची मनें तृप्त होणार नाहींत, कारण त्यांचा हेतु असा आहे कीं आह्मांकडून असें एखादें परोपकारी स्थळ उभारलें गेलें ह्मणजे त्यांनीं दिलेल्या आश्रयाचें योग्य सार्थक झालें असें त्यांस वाटून त्यांची मनेच्छा तृप्त होईल, याचा विचार सर्वांस करणें मोठें महत्वाचें आहे.

सभा.

ठि० कामाटपूर गल्ली १३.

## निबंध.

हा निबंध मी आपल्या अल्पमतीनें लिहून आणिला आहे यांतील चुकीचा विषाद न मानितां.—

सारंततो ग्राह्यम पास्यफल्गु । हंसैर्यथा क्षीर मिवाम्बुमध्यात ॥

ह्मणजे राजहंस जसा दूध मिश्रित जलांतून दूध तेंच निवडून घेतो, त्या प्रमाणें यांतील गुण गृहण करावे.

सद्गृहस्थहो! जें आह्मां क्षत्रिय लोकांचें श्रेष्ठत्व नष्ट झालें होतें, तें या सभेच्या योगानें उदयास येण्याचें चिन्ह दिसत आहे; हें पाहून तत्धर्मी लोकांस केवढा बरें आनंद होत आहे. ह्या पाश्चिमात्य राज्यकारस्थांनीं लोकांची या देशामध्यें स्थापना झाल्या पासून त्यांनीं आपल्या

दयार्द्र अंतःकरणानें प्रजेस सुखी करण्या विषयीं अनेक उपाय योजून जी विद्या दुर्मिळ झाली होती ती सर्व प्रजेस सारखी देऊन लोक शहाणे करण्या विषयीं खटपट चालविली आहे; असें जरी आहे तरी ज्या वेळापासून शाळा खात्याची स्थापना झाली त्यावेळापासून बराच काळपर्यंत आमच्याच लोकांनीं फक्त विद्या शिकण्याचें नाकारिलें होतें, कारण आमचे धर्मगुरु ह्मणविणारे यांहीं असा एक मंत्र आमचे लोकांचे कानीं भरविला होता कीं आह्मी क्षत्रिय लोकांनीं फक्त शूरत्वाचें काम करावें, त्यांस विद्याज्ञानाची बिलकूल गरज नाहीं आणि त्या मंत्राचा आमचे लोकांनीं निजध्यास करून ते विद्येच्या कामीं पुष्कळ मागें राहिले. ह्याला प्रमाण पाहिजे असल्यास हल्लिंच पहा, आमची जात खेरिजकरून परभू, शिंपी, सोनार, भंडारी इत्यादि जातिमध्यें जितके विद्वान मिळतील त्यांचा शतांसही आह्मांमध्यें मिळणें कठीण आहे, ह्मणून जसे इतर जातीचे लोक विद्याभूषणानें मोठमोठ्या हुद्यांचीं कांमें मिळवित आहेत तसे आह्मांतील लोक कोठें दृष्टीस येत नाहींत; पहा, ह्या येवढ्या मुंबईशहरामध्यें जर आमची सुमारें २५००० पर्यंत संख्या आहे तर त्यांत योग्य भाग्यशाली एकही निपजूं नये काय? हो, कदाचित कोणी असें ह्मणतील कीं हें सर्व नशिबावर अवलंबून आहे, तर हा त्यांचा तर्क खोटा आहे कारण आपल्या ह्या उघड अज्ञान कृतीनें आपले लोक विद्येच्या कामीं मागें राहिले मग अर्थातच त्यांस सरकारी अथवा दुसरीं योग्य हुद्यांचीं कांमें मिळालीं नाहींत व लोकही सुखी झाले नाहींत असें स्पष्ट नजरेस येत असून तेथें दैव आडवें घालणें ही मोठी अचंब्याची गोष्ट आहे. अहो दैवाची गोष्ट अशी आहे कीं, आपण जसा यत्न करावा तसें तें आपणांस साह्य देतें, नाहींपेक्षां जशी आपली कृति तशी त्याची मदत याजबद्दल एक इंग्लिश ह्मण अशी आहेकीं—

God helps those who helps themselves ह्मणजे जे कोणी स्वतः श्रम घेतात त्यांस ईश्वर साह्य होतो. यांजकरितां मतूप्रियजाति-गृहस्थानीं दैवावर अवलंबून न राहतां जीं काळास अनुसरून होणारीं योग्य कृत्यें तीं करण्यास मनःपूर्वक झटावें ह्मणजे ईश्वर मदत देईल.

आपणापैकीं कित्येक लोक अगदीं अविचाराचे उद्गार काढितात कीं, आपल्या मराठे लोकांनीं अशा पूर्वी कधीं सभा केल्या तरी काय? परंतु मी त्यांस असें विचारितों कीं, कोणतीही योग्य गोष्ट करणें झाल्यास ती पूर्वीच झालेली असावी असा कांहीं नियम आहे कीं काय? पूर्वीं लोक ज्या स्थितींत होते ती स्थिती हल्लींच्या काळास योग्य नसतां-ही आपण ती धरून रहावें काय? आणि तसें जर आहे तर आपल्या वाडवडिलांच्या रीतीभाती व चांगले नियम त्यांचा आह्मी धिक्कार करून अयोग्य नियम कां स्विकारले आहेत. पूर्वींचे लोक सुमारें २५ पासून ३० वर्षांच्या वयाच्या आंत आपलीं लग्नें करीत असत, पण तो नियम आतां कोठें आहे? हल्लीं ९ वर्षांच्या मुलांचीं लग्नें करण्यास लोक प्रवृत्त होत अहेत तेणेंकरून त्यांचें अतोनात नुकसान होऊन ते सर्व अल्पायुषी होत आहेत. हें योग्य आहे काय ! आणि अशा कृतीनें आह्मीं आपल्या वाडवडिलांच्या रितीभातींचा अभिमान बाळगित आहों असें सिद्ध होतें काय.? मजला वाटतें कीं, आमचे लोक कोणत्याही रितीनें वडिलांच्या रितीभातींचा अभिमान न धरितां उगाच पोकळ डौल मिरवित आहेत हें रास्त दिसत नाहीं. तसेंच आह्मां लोकांमध्यें सभा पूर्वीं कधीं झाल्या होत्या काय असें जे प्रश्न निघतात त्यांबद्दल त्यांनीं पूर्ण विचार तरी केला आहे काय? अहो आजपर्यंत या भरतखं-डामध्यें जे विद्वान् मोठमोठे राजे होऊन गेले त्या सर्वांच्या पदरीं स्वज्ञात लोकांपैकीं, मोठमोठे हुद्देदार व मानकरी केवळ महत्वांचीं कामें कर-णारे आणि रणांगणामध्यें आपल्या जिवाची अशा सोडून भिडणारे आपलेच लोक होते, हें सर्वांनुभव सिद्ध असून आपल्या लोकांच्या पूर्वीं कधीं सभा झाल्या नाहींत हें ह्मणणें किती अप्रशस्थ आहे बरें? कारण अशीं अवाढव्य कामें सभा न भरितां घरांतच बसून झालीं होतीं काय! आतां इतकें खरें कीं हल्लीं जे विरुद्ध बोलणारे आहेत, त्यांच्या स्वतःच्या आयुष्यांमध्यें मात्र असले प्रकार त्यांनीं पाहिले नसतील किंवा स्वतः यत्न केला नसेल अथवा मागील हकिकती त्यांनीं ऐकिल्या नसतील परंतू जे विद्येच्या कामी लागले आहेत त्यांस मागील इतिहासावरून पूर्वी काय काय प्रकार होऊन गेले हें

त्याच्या नजरे पुढे दिसत आहे, मग ह्या अंध बडबडीची काय जमाबंदी?

सुदैवें करून आपल्या लोकांचेंही विद्येच्या कामीं आलिकडे बरेंच लक्ष लागत आहे हें पाहून चित्तास मोठें समाधान होतें आणि तो त्यांचा यत्न जगदीशकृपेंकरून सफळ होवो व आपल्या लोकांची मनें अशा सत्कृत्याकडे वळोत अशी माझी जगनियंत्याकडे करद्वय जोडून प्रार्थना आहे.

आपला.

सभा—८९ रामचंद्र राघोजीराव चवाण.

ता० १८ आक्टोबर सन १८८४

## सभेची शाखा.

सभेची कीर्ति ऐकून ता० ९ माहे दिसेंबर १८८४ रोजीं लोकहितेच्छु रा० रा० विठोजी खंडूजीराव पिसाळ धसईकर हे व कित्येक दुसरे उद्योगी गृहस्थ या सभेस आले होते, त्यांनीं सभेच्या नित्य क्रमानंतर एक मोठा निबंध वाचून सभेस विनंति केली कीं आह्मीं ज्या प्रांतीं राहतों तिकडील लोक कशा अवस्थेत आहेत याजविषयीं निबंध द्वारें आतांच बंधुवर्गास कळविलें आहे; करितां त्या लोकांच्या सुधारणेविषयीं कांहीं उपाय या सभेकडून योजिले जातील अशी आह्मां सर्वांस आशा आहे, कीं जेणेंकरून सर्वांचें हित होऊन तिकडील मराठे इत्यादि इतर यातीचे लोक या सभेचे मोठे आभारी होतील, याशिवाय आणखी पुष्कळ सुविचार सदरील गृहस्थांकडून कळविण्यांत आले. त्या दिवशीं सभेंत ११७ असामी होते त्या सर्वांनुमतें असें ठरविण्यांत आलें कीं त्या प्रांतीं एक मोठी सभा भरवून तिकडील दुसरे कित्येक विचारी गृहस्थ असतील त्या सर्वांच्या संमत्तीनें एखादी सुव्यवस्था सुरू करावी. हे विचार त्या बाहेर गांवांहून आलेल्या मंडळीस पसंत पडल्यावरून, सभेकडून बारा असाम्यांची व

त्यांजबरोबर हरिकीर्तनकर रा० रा० घन: शाम भाऊ सावंत भोसले यांची योजना झाली.

पुढें या सदरील निश्चया प्रमाणें ता० १२ दिसेंबर ८४ रोजीं मौ. धसई तालुका मुरबाड जिल्हा ठाणें या गांवीं नियमितवेळीं एक मोठी सभा भरली होती त्या सभेंत मुंबईकर मंडळीनें मोठ्या चतुराईनें दोन दिवस पर्यंत अनेक मुद्यांवर वादविवाद करून लोकांचा चांगला समज करून दिला. त्यावरून त्या सर्व मंडळीनें आपण पुढें कोणत्या नियमाप्रमाणें वागावें इत्यादि मुद्दे घेऊन अकरा नियमांचीं कलमें कायम ठरविलीं तींच तिकडील सर्व जातींचे लोकांस सोईवार वाटून त्यांनीं पसंत केलीं, आणि त्याप्रमाणें वागण्याचा निश्चय झाला नंतर त्या मंडळीच्या सूचनेंवरून त्या स्थळीं एक नित्याची ( आठवड्याची ) सभा स्थापन करून त्या सभेच्या कामीं, हमेशा झटणारे लोक हितेच्छु वजनदार, व सामाजिक ऐकत्वाचें महत्व जाणणारे अशा समंजस गृहस्थांकडे, अध्यक्ष, उपाध्यक्ष, व्यवस्थापक व चिटणीस हीं कामें नेमून देऊन ती सभा या सभेची शाखा आहे असें ठरविलें आणि सभेस " सत्य शोधक व क्षात्र धर्मोत्तेजक " असें नांव देण्यांत आलें आहे. त्यासमयीं त्या स्थळीं सभेचे हेतु समजून घेण्यास अदमासें १२०० सें पर्यंत मंडळी आली होती; नंतर तिसऱ्या दिवशीं, सर्व व्यवस्था लावून मुंबईकर मंडळी परत आली.

सदरील सभे संबंधी एकंदर कच्चे हकीकतीचा रिपोर्ट " शेतकऱ्यांचा कैवारी " या वर्तमानपत्रीं ता. ९ जानेवारी १८८५ च्या अंकांत व त्याचप्रमाणें दीनबंधु ह्या दोन्ही वर्तमानपत्रीं प्रसिद्ध झाला आहे. धसई मजकुर येथील सभेंत ठरलेले नियम ता० २१ जानेवारी १८८५ रोजीं त्या प्रांतातील पाटील, खोत व सरखोत अशा प्रमुख १७ असामीच्या सह्यानिशीं छापून सर्व गांवकरी लोकांस देण्यांत आले आहेत आणि ठरावाप्रमाणें ते नियम सर्वांकडून अमलांत आणले जात आहेत.

ही सभा स्थापन करण्याच्या कामीं रा० रा० विठोजीराव पिसाळ व बापू भाऊ पाटील शेलार या उभयतांनीं अतोनात मेहनत घेऊन

सर्व प्रकारची उत्तम व्यवस्था ठेविली होती, सदरील पिसाळ मजकूर यानीं मुंबईकर मंडळीचा व शिवाय तेथें अनेक गांवांतून आलेल्या लोकांचा भोजन संबंधी वगैरे जो कांहीं बंदोबस्त केला होता तो अवर्णनीय होय. या सदरील दोन्हीं गृहस्थांनीं आपल्या शारिरीक मेहनतीची व द्रव्य खर्चाची तर कमालच करून सोडिली होती, याज-करितां सर्व लोकांनीं त्यांचे विशेष आभार मानिले.

ह्याचप्रमाणें लोक हिताच्या कामीं आमचे जग् विख्यातीस आलेले रा० रा० भाऊ कोंडाजी पाटील डुमरे ओतुरकर व गोविंदराव बापुजी पाटील भिल्हारे रहाणार मौजे भिल्हार जिल्हा सातारा हेही आपल्या देशबंधुंच्या व ज्ञातबंधुंच्या हितास मनोभावें रात्रंदिवस झटत आहेत, याचेंच नांव खरा थोरपणा व जात व देशाभिमान. ईश्वर ह्या परो. पकारी गृहस्थांस दीर्घायुषी करो व ही त्यांची परोपकार बुद्धि कायम राखो.

सभा.

## मेहरबान सिमियन बेंजामिन याचें व्याख्यान.

तारीख ३ जानेवारी १८८५ रोजीं सभेची सुरवात झाल्यावर सभासदां कडून आलेलीं बुकें तपासल्या नंतर अध्यक्षाच्या सूचने वरून सभेच्या सदरील हित चिंतकानें आपल्या व्याख्यानास सुरवात केली.

त्या दिवशीं व्याख्यानकाराचे भाषणांतील मुद्दे, क्षत्रियांचें महत्व, व दुर्व्यसना पासून हानी हे होते. त्यांतील पहिल्या मुद्यावर व्याख्यान कारानें पृथ्वींतील प्रत्येक देशांत, व राष्ट्रांत यापक्षाची किती अवश्य-कता आहे व त्या अभावीं कसकसे तोटे होतात, हें चांगल्या रितीनें व्यक्त करून दाखविलें आणि हिंदु राष्ट्रांतील क्षत्रियांचें महत्व कोणत्या कार णानें कमी झालें, याजबद्दलही थोडिशी माहिती दिली. नंतर दुर्व्य-सना पासून होणारे वाईट परिणाम या दोन्हीं प्रकरणांवर या उद्योगी गृहस्थानें सुमारें मव्वा तास फारच उत्तम भाषण केलें नंतर रा० रा०

रामय्या व्यंकय्या आयावारू यांनीं आपल्या लोकांत असलेली विद्येची उणीव दूर होण्याचे उपाय कोणते याजवर अर्ध तास पर्यंत भाषण केलें.

सदरील दोन्ही गृहस्थांनीं आम्हां करितां श्रम घेऊन आज रोजीं आपला बराच वेळ खर्ची घातल्या बद्दल रा० रा० कृष्णाजी यशवंत-राव चवाण यांनीं त्यांचे आभार मानिले. उपरांत रा० रा० माधवराव राघोजी रोकडे यांचे चि० धर्माजी यानें आपल्या भाषणांत असा आशय आणिला होता कीं, तूर्त काळीं आमचे बंधू जनांनीं जी सुधारणुकीची वाटाघाट चालविली आहे, ती हल्लींच्या आपल्या कनिष्ट स्थितीस अनुलक्षूनच आहे. तथापि माझी सर्व सभा जनांस अशी विनंति आहे कीं, पहिल्यानें त्यांनीं आपल्या अल्पवयीं संततीस विद्यामृत देण्याचा उद्योग हातीं धरावा कीं, जेणें करून आह्मीं सर्व आपल्या थोर व विचारी वडिलांचे मोठे आभारी होऊं; आणि पोषण कर्त्यांचे हेतु तडीस नेण्यास दीर्घ प्रयत्न करूं. हे माझे बोल आपणा समोर जरी अप्रयोजक आहेत, तथापि मला आज दोन शब्द बोलावे असें वाटल्या वरून आपला थोडा वेळ मी व्यर्थ गमाविल्याची माफी असावी.

ह्या प्रमाणें भाषणें झाल्या नंतर शेवटीं सेक्रेटरी व रा० रा० दाजीराव दळवी यांनीं आज रोजीं पुष्कळ मंडळी जमल्या बद्दल आनंदोद्गार दर्शविले आणि मंडळीनें सदोदित सभेंत येण्याची कृपा करावी अशी विनंति केली. नंतर सभा विसर्जन झाली मंडळी १५० होती.

भसा—१००

## व्याख्यानें.

---

ता० ३१ जानेवारी सन १८८५ रोजीं रा० रा० गणपतराव रामजी ह्याडिक रहाणार नाशिक हे या सभेस आले होते, त्यांनीं सभेचा स्तुत्योद्योग जाणून, आपल्या कर्तव्यानुरूप सभेस उत्तेजनार्थ व आपले यातिची उन्नति होण्यास कोण कोणतीं साधनें अवश्य पाहिजेत, याज बद्दल बराच वेळ उत्तम भाषण केलें. या गृहस्थाचा सभा धीटपणा व

त्यांनीं मिळविलेली माहिती पाहून व ऐकून सर्व सभासदांस मोठें आश्चर्य कारक असें भासलें. कारण तोंडीं बडबड करणाऱ्यापेक्षां तूर्त काळीं स्वत: अंशत: तरी मदत करणाऱ्यांची विशेष जरूरी आहे खरी, पण आपल्या ज्ञाति हिताचा अंकूर एखाद्याच्या मनीं उद्भवणें हेंच एक सुचिन्ह समजलें पाहिजे. आणि त्याच प्रमाणें सदरहु गृहस्थाचे उद्देश कांहीं साह्य देण्याचे दिसले होते. नंतर रा० रा० कृष्णाजी अर्जुन केळुसकर यांनीं विद्या विषयावर सर्वोत्कृष्ट भाषण केलें त्याज बद्दल मंडळीचा उल्हाशीतपणा व्याख्यान पुरें होतांच जो टाळ्यांचा एकच गजर झाला त्यावरून दिसून आला.

उपरांत मे. सिमियन बेन्जामिन यांनीं, लोक नीतीनें चालण्याचें सोडून अनीतीचें अवलंबन करितात यामुळें कसकसे तोटे होतात, व दारू पिण्या पासून होत असलेले घोर परिणाम, या विषयीं दृष्टांतपर सर्वांची खात्रि होण्या जोगें सुरस भाषण केलें. आणि असें ही सिद्ध करून दाखविलें कीं, दारू हा पदार्थ लोकांची मति भ्रष्ट करण्या करितां मुद्दाम तयार केलेला आहे, याज करितां तिचा शहाणे लोक मुळींच अंगिकार करीत नाहींत. याज विषयीं बराच वेळ भाषण करून त्यांनीं रजा घेतली.

त्या दिवशीं बरीच रात्र पडली ह्मणून रा० रा० बाळकृष्ण अर्जुन सावंत भोसले यांनीं थोडें चुटकेदार भाषण करून व्याख्यानकारांचे आभार मानिले. त्या दिवशीं सभेस मंडळी सुमारें ७५ होती.

सभा. १०४.

## उद्योग व वेळेचें महत्व.

———

आमचे लोकांचा स्वभाव विलक्षण प्रकारचा झाला आहे, त्यांस उद्योगाचा दिवसादिवस बराच तिटकारा येत चालला आहे कोणी महत्वाचे कामाविषयीं सांगितले तर ते असें ह्मणतात कीं तें काम आमचे पिढीस व्हावयाचें नाहीं. मग कशास प्रयत्न करावा ?

ही समजूत बहुशः लहाना पासून वृद्धापर्यंत एक सारखीच आहे वृद्धांचें ह्मणणें असें असतें कीं, आमचीं दहा गेलीं आणि पांच राहिलीं, आतां कशास खटाटोप आमच्यामागें हवा ! या संसाराचें आमच्या मागें कसें कां होईना, असें ह्मणून ते अगदीं उद्योगापासून अलग राहूं इच्छितात, आणि दुसऱ्यांसही आपला कित्ता घेण्यास उत्तेजन देत असतात. अल्पवयी किंवा तरुण असतात ते आळसाच्या स्वाधीन होऊन आपण सदुद्योगी होऊं इच्छित नाहींत परंतु त्यांस आपला वेळ ख्यालीखुशालींत आणि चैनबाजींत व्यर्थ घालविण्याचीच सदा इच्छा असते. कधीं कोणी कांहीं शिकेल, वाचील कोठें समाजांत जाईल, अथवा एखादे लायब्ररींत तास अर्धतास घालवील किंवा एखादी हुन्नरयुक्ति शिकेल ह्यांविषयीं त्यांच्या स्वप्नींही येत नाहीं. कांहींकांस जर कोणी एखादें काम, जें पुढें दहा किंवा पंधरा वर्षानें फलद्रुप व्हावयाचें असतें त्याचा शोध अथवा कांहीं उद्योग करण्यास सांगितलें तर ते त्या सांगणारास मनापासून हंसतात, आणि असेंही ह्मणून दाखवितात कीं, आह्मीं इतकीं वर्षें वांचूं याचा भरवसा काय? घटकेत काय होईल तें कोणास ठाऊक ! आपण आपला तूर्तचा विचार पहावा यासारखा उत्तम मार्ग नाहीं. अशीं निराशेचीं भाषणें करितात, वहावाः काय उद्योगी पणाहा !! जर आपण पुढील काळा करितां कोणतीही तजवीज करून ठेविली नाहीं, तर आमची संतति दुःखाविष्ट होईल हें त्यांच्या लक्षांत कसें येत नाहीं ? बरें झालें कीं, इंग्लिश लोकांस या देशांत ईश्वरानें पाठविलें, त्यांजकडे पाहिलें असतां ते किती उद्योगी आहेत व पुढील काळाचा कसा विचार करितात हें आपणांस कळेल. शिवाय कित्येक परदेशस्थ लोक या देशांत येऊन आपल्या उद्योग बळानें कीर्ति सुखी झाले आहेत आणि त्यांपैकीं कित्येक तर अमीर होऊन राहिले आहेत; त्यांचेकडे आमचे लोक वेड्या सारखे पाहून तोंडांत बोटें घालितात, पण ते लोक ह्या वैभवास कशानें आले याचा शोध कोणी तरी करीत आहेत काय ?

जर कोणी, एखाद्यास ह्मणाला कीं, कांहो आपली स्थिति अशी

कशानें झाली? जरा आपण काम धंदा जपून केलात तर या विपत्तितून मुक्त व्हाल कीं नाहीं? अथवा आपण वतनदार लोक आपली सत्ता व भूमी परदेशस्थ लोक बळकावून बसले, तथापि आपण सर्वस्वीं नाद लोभीच बनलों आहों हें कसें? ते परस्थ लोक कसे विद्वान् व खटपटी आहेत ते पहा. असे शब्द कांनीं पडतांच तो असें उत्तर देतो कीं, "अहो कसचा कामधंदा घेऊन बसलेत आणि कसची विद्या, हे तर सर्व प्रारब्धाचेच खेळ किंवा देवाची मर्जी, तशांत सद्दीचा जोर असला ह्मणजे आपोआप सर्व अनुकूळ होतें, जेथें दैव प्रतिकूळ तेथें सद्गुण काय करतात," अशीं वेडीं वांकडीं उत्तरें देऊन ती वेळ साधून नेतात, तेव्हां पहा बरें हे किती अल्प विचार ते. अहो आमचे लोकांस दैवानें वेष्टून टाकिलें आहे! ते दैवावर भरवंसा ठेवून कसे स्वस्थ बसले आहेत! क्षणभर देखील विद्या ह्मणजे काय पदार्थ आहे, व उद्योग कां करावा यांचा विचार करीत नाहींत; जर कोणी एखादें पुस्तक किंवा वर्तमानपत्र त्यांच्या हातीं दिलें तर असें ह्मणतात कीं यांत काय आहे? वाचण्याचे श्रम मात्र. वर्तमानपत्रांत तर सर्व बातमी खोटीच असते, ते रिकामे लोक उगाच कोरे कागद आणि शाई यांचा खराबा करीत बसतात, आज पर्यंत ही सर्व खटपट कोठें होती? इत्यादि भाषणानें उद्योग व्यर्थ मानितात, अशा वेड्या चाळ्यानें दुर्दैवास काय लांब जावें लागतें? यावरून पुढें आमची स्थिति कशी होईल इचा कांहीं विचार करतां येत नाहीं. आह्मांत जो आळस आणि जी उदासीनता व जे कलह वाढले आहेत त्यामुळें बाहेर देशांतून कोण कोण लोक आले किंवा स्वदेशीय व स्वजातीय लोक कोठें कोठें कसकसे वागत आहेत व राजसूत्रें कोणत्या लोकांच्या स्वाधीन आहेत व ज्या वतनांच्या आधारें आह्मीं आपणांस जमेदार ह्मणवितों तीं पुढें तरी आपल्याच स्वाधीन रहाण्याचा संभव आहे किंवा नाहीं आणि आह्मांस परतंत्रता प्राप्त होण्यास कारण काय इत्यादि शोध लावण्यास आह्मांत अंशतः देखील उल्हाशीतपणा राहिला नाहीं. केवढी आश्चर्याची गोष्टही! पहा परस्थ लोक आपलें ज्ञान वाढवून कलाकौशल्यांत कसे पूर्ण झाले आहेत. तेच जर आह्मांसारखे

देवावर हात ठेवून असते तर भूमध्य व आर्व्हे समुद्र उलंघून या देशांत आले असते काय? किंवा पृथ्वीच्या इतर भागावर त्यांस जाववते काय? आणि मग त्यांस हल्लींचे वैभव मिळालें असतें काय? पहा फ्रेंच, चायनी अमेरिकन व इंग्लिश यांची हस्तकौशल्यें व उद्योगीपणा, त्यांत हीं राष्ट्रें कशीं पहिल्या प्रतिचीं बनून राहीलीं आहेत हा सर्व प्रताप कशाचा ह्मणाल तर विद्या व उद्योग या शिवाय तिसरें कांहीं एक नाहीं.

आमचे लोक ज्या ज्या गांवी रहातात तेथें आपल्या उदरानिर्वाहास्तव जो कांहीं काम धंदा करितात तो तरी मनापासून असतो काय? छ, मुळींच नाहीं. ते मोठ्या जुलमानें कसें तरी दोन तास धंदा करून वेंट पोहोंचवितात ह्मणजे झाले रिकामे गप्पा ठोकण्यांस, व दुसऱ्याची टवाळी करण्यांस. बरें कधीं कोणी प्रवासांतून दोन पैसे घेऊन गांवीं गेला असला, किंवा गांवांतच एखादा खावून पिवून जरा सुखी दिसला तर कित्येक लोक त्या सुखी मनुष्याच्या मेहेनतीकडे लक्ष न देतां ह्मणतात कीं अब्बू!! काय हो त्यांनीं दौलत आणिली आहे, ही त्यांस लूट कोठें मिळाली असावी, किंवा त्यांनीं सर्व चालीची कलमें * तर घरांत भरलीं नसतील नां! अशा अनेक तऱ्हेच्या कल्पना लढवित बसतात पण आह्मांस वाटते कीं. असे उद्गार काढण्यापेक्षां ते किंचित जर याचा विचार करतील तर त्यांस सहज कळून येईल कीं, आपल्या सारखें अल्प समजूतीचे आपले मागील काळचे पुरुष असते, तर जो थोरपणा त्यांनीं मिळविला आहे व जीं वतनें त्यांनीं संपादिलीं त्यांचा उपभोग घेण्यांस हल्लीं आपणांस मिळाला असता काय? मुळींच नाहीं. पहा उद्योगा शिवाय जगांत कोणतीच वस्तु साध्य होण्या जोगी नाहीं.

---

* पिशाच साधनांचें कांहीं कावेबाज मंत्र आहेत ते साधन केलें असतां दौलत प्राप्त होते असा कित्येक अज्ञानीं लोकांचा अद्याप समज आहे.

## श्लोक.

उद्योगिन.करालंबंकरोतिकमलालया ॥
अनुद्योगिकरालंबं, करोतिकमलाग्रजा ॥ १ ॥

अर्थ—लक्ष्मी उद्योगी पुरुषाच्या हस्तास आश्रय देते, अवदशा निरोद्योगी पुरुषाचा हात धरिते.

तात्पर्य—निरुद्योगी दरिद्री असतात.

## श्लोक.

आलस्योहिमनुष्याणां, शरीरस्थोमहान्रिपुः ॥
नास्त्युद्यमसमोबंधुःकृत्वायंनावसीदति ॥

अर्थ—आळस रूप महान् शत्रु मनुष्यांच्या शरीरांत रहाणारा आहे, आणि मनुष्यांस उद्योगा सारखा अन्यबंधु नाहीं कारण उद्योग केला असतां पुरुष खेद पावत नाहीं.

याजकरितां मनुष्यांनीं आपला मौल्यवान् वेळ व्यर्थ गप्पा मारण्यांत, गंजिफा खेळण्यांत, लावण्या गाण्यांत, तमाशे, ललितें व नाटकें पहाण्यांत व स्वतः तीं करण्यांत आणि वेश्यांचे मोहक गाणें ऐकण्यांत, न घालवितां सृष्टींत काय चाललें आहे व आपण काय करीत आहों व कोठल्या स्थितींत आहों, आपले ज्ञात वर्ग व देश बंधु कसे दिवस काढीत आहेत, इतर राष्ट्रें कशानें उर्जित देशेस आलीं, आणि आपलें खरें कर्तव्य कोणतें यांचा विचार केल्यास सुखी होण्याचे मार्ग त्वरित कळतील, आणि त्या योगानें दुसऱ्यांची कपटी साधनें व स्वार्थ साधकपणा दृष्टीस पडेल.

आमचे लोकांस आणखी एक मोठी वाईट खोड लागली आहे कीं, ते एखादे काम करूं लागल्यास जर तें एक वेळ फसलें तर त्याचा पुनः उद्योग न करितां फक्त कपाळास हात लावून अगर नशीबास बोल लावून स्वस्थ बसतात ही मोठी अनुचित गोष्ट आहे. यामुळें आम्हांस इतरांकडून "आरंभ शूर" हें पद मिळालें आहे त्याचा तरी

कोणी अर्थ करितो काय. अहो जरी करिता एखादे प्रसंगी आपणांस यश आलें नाहीं तरी त्या कामाची पाठ न सोडितां तें कोणत्या न्यूनतेनें अथवा कोणत्या अडथळ्यानें फसलें असावें याचा पूर्ण विचार करून तें साध्य होई पर्यंत पुनः पुनाः प्रयत्न केला असतां तें आरंभलेलें काम आपल्या हातून शेवट पावल्या वांचून कधींच रहाणार नाहीं किंवा जें काम आपल्या मनीं करावयाचें आहे त्याचा पाया शुद्ध रीतीनें घातला असतां तें समयानुसार जरी आपणा कडून शेवट न पावलें तरी आपले वंशज, ज्ञात वर्ग अथवा देश बंधु यांतून कोणी तरी तें शेवटास नेल्या विना सोडणार नाहींत परंतु आपणच जर त्याचा मुळींच उद्योग पुढें केला नाहीं आणि अर्धेच सोडून देऊन सर्व हेतु नष्ट केले किंवा त्यांचा पाया चांगल्या चौकसपणानें घातला नाहीं तर तें कशानें पूर्णतेस येणार? ज्या कामाचा आपण उत्तम पाया घालून ठेविला असेल त्याचा शेवट वर दर्शविलेल्या पैकीं कोणीही केला तरी त्या कार्यास फळ तेंच यश विशेषतः बिजारोपण करणाऱ्या पुरुषाकडेसच येणारें आहे, असें असतां एक वेळ कार्य न साधल्या बद्दल उदासीनता कां बरें असावी.

**श्लोक.**

**उद्यमेनहिसिध्यंति कार्याणिनमनोरथैः ॥**
**नहिसुप्तस्यसिंहस्य प्रविशंतिमुखेमृगाः ॥**

**अर्थ**–सर्व कार्यें उद्योगानेंच सिद्ध होतात, केवळ मनोरथानें सिद्ध होत नाहींत, यास दृष्टांत असा कीं निद्रिस्त सिंहाच्या मुखांत मृग स्वतः येऊन प्रवेश करीत नाहीं.

**श्लोक**

**नदैवमितिसंचिंत्य त्यजेदुद्योगमात्मनः ॥**
**अनुद्यमेनकस्तैलंतिलेभ्यःप्राप्तुमिच्छति ॥**

**अर्थ**–दैवानें माझें कार्य होईल असें चिंतन करून पुरुषानें आपल्या कर्तव्यकर्माचा त्याग करू नये; कारण उद्योग केल्या वांचून तिळांतील तेल प्राप्त होण्या साठीं कोण इच्छा करील.

अहो काय सांगावें आमचे लोक दैवाचे भुलीनें अगदीं निरुद्योगी झाले आहेत कर्माचा धंदा करण्याचा त्यांमध्यें बिलकूल तजेला राहिला नाहीं, ज्यांचे त्यांचे मुखीं दैवाचीच मुख्यत्वें ओरड असते, पण ते त्याज विषयीं कधीं विचार करितात काय? पोट रिकामें पडलें तरी त्यांत दैवच भरून वेळ काढूं पहातात पण अशानें त्या रित्या पोटाची भर कशी होईल बरें? दैव ह्मणजे काय? मुळीं तो पदार्थ नाहीं नांव मात्र आहे. दैवाची रूढी मुख्यत्वें स्वार्थी व आळशी लोकांनीं प्रचारांत आणिली आहे. परंतु वास्तविक पाहिलें तर ईश्वरेच्छा अशी आहे कीं, सर्वांनीं उद्योग करावा. कोणीही दैवावर भार ठेवूं नये, दैव उद्योगाविना पांगळें आहे, असो. याचा विचारवंतांनीं आपल्या बुद्धीचा खरा व्यय करून असल्या पोकळ विवंचनेंत न पडतां उद्योगानें आपलें आयुष्य घालवावें व सर्व सुखाचे वाटेकरी व्हावें. मनुष्याची बुद्धिही मोठी चमत्कारिक वस्तु आहे तिचा उपयोग ज्याचा त्यानें उत्तम मार्गाकडे केला पाहिजे ह्मणजे त्यांतच ईश्वर साह्य आहे असें सहज कळून येईल.

आजचा विषय दोन मुद्यांवर आहे करितां आतां आपणांस दुसरे प्रकरणाचा विचार केला पाहिजे ह्मणून हा वि षय इतकाच पुरे करण्यांत येत आहे.

आपले हिंदुलोक वेळेची किंमत जाणण्यास अगदीं अशक्य जाहले आहेत. वास्तविक ह्मटलें तर मनुष्यास ईश्वर दत्त आयुष्य हेंच धन आहे आणि जे याधनाचा विचारानें व्यय करितात तेच स्वस्थपणानें सुख भोगितात. आपल्या पहाण्यांत असें येतें कीं, लोक कोणतेंही काम नेमलेल्या वेळीं कधींच करीत नाहींत मग तें स्वतःचें असो अगर दुसऱ्याचें असो सारखेंच. यामुळें त्यांचीं तीं सर्व कामें सदोदीत अपूर्तीं रहातात कारण कोणतेंहीकृत्य ज्यावेळच्या त्यावेळीं झालें असतां तें निर्विघ्नपणें साधतें, पण एकदा वेळ चुकली कीं त्याकामाची लांबण लागून कदाचित् तें असाध्यही होतें. ह्मणून जें ज्यावेळीं करावयाचें नेमिलें असेल किंवा व्हावयाचें असेल तें त्याचवेळीं साधून घेतलें असतां विशेष प्रसंशनीय होतें. वेळेचीगैरवेळ झाली ह्मणजे त्यापासून

एक अविश्वासुपणा दिसतो आणि दुसरें वेळ चुकल्यामुळें कार्य व्हावयाचें तसें घडून येत नाहीं' असे दोन प्रकारचे तोटे होतात. आमच्या हिंदुलोकांपैकीं कित्येक लोक वेळ साधण्यांस कांहींसे जपतात पण आमचे ज्ञातबंधु अतिशय हयगय करितात, याजबद्दल आपल्या पहाण्यांत हजारों उदाहरणें येत आहेत; जर कोणी कोणास एखाद्या समाजांत येण्यास किंवा आपल्या खासगी कामाकरितां दहा वाजतां बलाविलें तर त्या बलावणारानें येणाराची वाट पाहून पाहून थकावें तेव्हां कोठें अकरा किंवा बारा वाजतां हे जाणार आणि तशांत जर तें समाजाचें काम असलें तर प्रथम गेलेले लोक बसून आळसावल्याकारणानें त्यांची दुसऱ्या कामास जाण्याकरितां त्वरा असते, मग कोठें दोन शब्द बोलून झाले नाहींत तोंच समाज आटोपावा लागतो, तेणेंकरून सर्वांचे स्तुत्य हेतु ज्यांचे त्यांजपाशींच राहून वेळ व्यर्थ गेल्याची मात्र खंती वाटते. याचप्रमाणे इतर कामेंहीं अधिच राहातात, पहा बरें इंग्लिश लोक वेळेकरितां किती जपत आहेत. कोठें जाणेंयेणें किंवा एखादें काम करणें झाल्यास ते ती वेळ साधण्यास किती दक्ष असतात. हल्लि जे इतर हिंदु लोक त्यांचे पदरीं नौकर आहेत त्यांस आपल्या नोकरीच्या कामांकरितां वेळेवर जाण्यास किती जपावें लागत आहे, किंचित् कोणांस एक दोन मिन्युटें उशीर झाला तर लगेच दिवस खाडा पडतो अशी जरब असल्यामुळें आपलेच लोक कसे ती वेळ साधण्यांस जपतात? तशीं ते जर आपलीं इतर कामें करतील तर किती बरें फायदा होईल.

पहा परके लोक वेळ व्यर्थ न जावा ह्मणून फार झटत असतात, तेणेंकरून त्यांची सर्व कामें सिद्धीस जात आहेत. अशा प्रकारचा वेळेचा नियमितपणा आमच्या लोकांच्यानें होणें अशक्य आहे काय? नाहीं. ते परके लोकच काय मानवी प्राणी आहेत आणि आह्मी काय पश्वादिकांत गणले जातों? पण असा कित्ता आह्मांस घालून देण्याची काळजी कोण करितो, तस्मात् आह्मी स्वतःच नियमितपणानें वागावें तर आमची सर्व सूत्रें परक्यांच्या स्वाधीन झालीं आहेत, मग असें कशानें व्हावें? इतकेंही करून कोणी वेळेच्या संबंधानें दोन शब्द

बोलल्याच तर त्यास इतर मंडळी दीडशहाणा ह्मणते; तथापि त्या दूष-णास पाठ करून आह्मांपैकीं किंवा इतर दुसरे कोणीही उपदेशकानें प्रयत्न केला असता तर लोकांनी तसें वागण्यास मागें घेतलें नसतें खचीत. परंतु याची गरज कोणास आहे? लोक कसेकां असेनांत हाच काय तो हेतु, असो.

आमचे बंधुजनांस अशी विनंति आहे कीं, प्रत्येक व्यक्तिमात्रानें आपला वेळ निरर्थक कामीं न घालवितां सदुद्योगांत घालवावा ह्मणजे त्यास ईश्वरी साह्य मिळून उत्तम फळ प्राप्त होईल, केवळ नशीबावरच धाड घालण्याचा प्रसंग येणार नाहीं. कारण या जगीं मनुष्यांस वैभव प्राप्त होण्यास वेळेचा उत्तम व्यय व सदुद्योग हींच मुख्य साधनें आहेत.

आजचा विषय जरा लांबला आहे व वेळही अधीक झाली, करितां याविषयाच्या संबंधानें ज्या आणखी कांहीं सूचना सभेपुढें सादर करण्याची इच्छा आहे त्याजबद्दल एखादे दुसरे प्रसंगीं मंडळीच्या मर्जी प्रमाणें पाहूं.

आपला हित चिंतक

**कृष्णाजी येशवंतराव चव्हाण.**

प्रभुगांवकर हिंदळें.

**सभा.** १११–११२–११३

ता० २८ मार्च सन ८९

## श्रेष्ठत्व.

---

श्रेष्ठत्व अथवा थोरपणा या गुणाची इच्छा होणें मनुष्यास सहाजीक आहे याचे तीन भेद आहेत. पहिला सामाजिक थोरपणा (श्रेष्ठत्व) दुसरा सामान्य थोरपणा आणि तिसरा अजवी थोरपणा.

यांतील पाहिले दोन भेद सदुद्योग व सदाचरण यांवर अवलंबून असतात, पण ते ही कधीं कधीं ह्या गुणांच्या अभावीं अधोमुखी होतात. सामाजिक थोरपणास योग्य होणारे, पहिला—यथान्यायेंकरून प्रजेचें

रक्षण करितां राजा. दुसरा—ज्यानें आपला देह झिजवून नीतीनें द्रव्य संपादन केलें असेल व परोपकाराचें खरेंतत्व जाणून अनाथदुर्बळांस समर्थी साह्य दिलें असेल तो धनीक. तिसरा—ज्यानें विद्याधन प्राप्तकरून घेतलें असून इतरांस त्याची प्राप्ति करून देण्यास व त्यांच्याशीं स्नेहभावानें आपलें वर्तन ठेवण्यास यत्न करणारा विद्वान्. चौथा—जो ह्या जगत्वासी मनुष्यप्राण्यांस सन्मार्गावर आणण्यास सदा सदोपदेश करणारा व त्याप्रमाणें आपलें वर्तन ठेवणारा तो साधु. पांचवा—जो आपण गृहस्थाश्रमांत राहून इतरांस विद्या ज्ञान देतो व योग्य धर्माचरण शिकवितो ह्मणजे आपणांमधील सद्गुण शिष्याचे-ठायीं उतरण्यास निष्कपटीपणानें व अद्वैत रीतीनें प्रयत्न करितो, तो गुरु. येणेंप्रमाणें हे पांचही श्रेष्टत्वास योग्य होतात.

दुसरा भेद—पहिला—जे राज्यदरबारीं आपलीं कामें धन्याचे मर्जी-नुरूप करून मोठमोठ्या हुद्यास पात्र होतात ते कामदार. दुसरा—ज्यांनीं विपूल द्रव्यराशी जोडून वेळीं परोपकार न जाणणारे धनीक. तिसरा—जे मोठ्या विद्वत्तेस पोहोंचून स्वहितच साधणारे विद्वान्. हे सामान्य थोरपणास पात्र होत.

तिसरा भेद—अर्जवी थोरपणा ह्मणजे जे लोक आपणांमध्यें तो गुण नसतां दुसऱ्याचे गोड शब्दांसच भुलून त्यांतच थोरपणा आहे असें मानणारे. जसें कोणी एखादा कोणत्याही दरबारीं किंवा इतर कोण-तेही ठिकाणीं गेल्यावर आपलें काम साधण्याकरितां वहुवचनांचा उपयोग करितो ह्मणजे शिपाई असेल त्यास हवालदार, हवालदारास सुभेदार, कारकुनास तात्यासाहेब, त्याहून अधीक पायरीचा असल्यास कोणास अण्णासाहेब व रावसाहेब इत्यादि. जो ज्या योग्यतेचा असेल त्यास त्याच्याहून जास्त पदाची योग्यता देऊन लोक आपलीं कार्यें करून घेतात. बरें यदाकदाचित् त्या गर्जु मनुष्यानें याप्रमाणें शब्द वापरले नाहींत तर त्याचें काम लवकर व व्हावें तसें होत नसतें, यानवरून जरी आपल्या आंगीं वरिष्टत्व नाहीं हें त्या कामदरांस माहित असतें तरीं ही त्या गर्जु मनुष्यानें आपणांस थोर ह्मणावें ही इच्छा बहुशः

सर्वांस असते ह्मणून ह्यास कनिष्ट पद्धतीचा अर्जवीथोरपणा असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

सांप्रत काळीं वरील पहिल्या पद्धतीचा थोरपणा नष्ट होऊन त्याच्या ऐवजीं सर्वांस कुळार्जित थोरपणाच विशेष आवडूं लागला आहे हें मोठें नवल होय. पण.

## श्लोक.

**गुणाः सर्वत्रपूज्यंते पितृवंशोनिरर्थकः ॥**

**वसुदेवंपरित्यज्य वासुदेवंनमेज्जनः ॥**

**अर्थ**—गुण सर्वत्र पूज्य होतात आणि पितृवंश केवळ निरर्थक आहे यास दृष्टांत असा कीं, लोक **वसुदेवाचा** त्याग करून **श्रीकृष्णास** नमस्कार करितात.

**तात्पर्य**—गुणी लोक जगांत पूज्य असतात.

यावरून लोकांचा हल्लींचा समज व वर्तन अयोग्य मार्गाचें आहे असें सहजगत्या नजरेस येतें; चालू क्रमा विषयीं जर आपण एक उदाहरण घेतलें तर लोकांचें इकडे लक्ष पोहोंचेल असें जाणून एक दृष्टांत घेतों तो असा कीं; एखादा मनुष्य वैद्यकीच्या धंद्यांत निपूण होऊन त्यानें आपल्या वयांत कोट्यावधि रोग्यांस बरें केलें आणि तो पुढें गत झाला, नंतर त्याच्या मागें त्याच्या मुलानें तो वडिलार्जित वैद्यकीचा धंदा चालविण्यास साधनीय गुण प्राप्त करून न घेतां फक्त आपल्या वडिलांच्या पदानें आपणास वैद्य ह्मणवून तो जर एखाद्या रोगग्रस्थ मनुष्या समोर जाऊन बसला आणि त्या पीडा करणाऱ्या रोगास ह्मणाला कीं, "हे द्वाड रोगा तूं या मनुष्यास सोडून त्वरित चालता हो, माझा बाप मोठा धनवंतरी वैद्य होता त्यानें तुज सारिखे कोट्यावधी रोग पळवून लाविले होते आणि मीं त्याचाच वंशज आहे तेव्हां तूं माझी आज्ञा पाळलि पाहिजे" असें जर त्या नामधारी वैद्यानें ह्मटलें, तर तो रोग दूर होऊन रोगी आराम पावेल काय? कधीं नाहीं; तर त्या वैद्यानें गुणाचीच सामोग्री तयार केली पाहिजे आणि असें केलें असतां तो

न्यूतन वैद्य थोड्याशा श्रमानें आपल्या वडीलापेक्षां द्विगुणीत प्रशंसनीय होईल. याप्रमाणें सर्व वडिलार्जित व कुळार्जित थोरपणाचें महत्त्व आहे, सबब थोरपणा व बहुमान्यता इच्छिणारांनीं गुणमंडित बनलें पाहिजे. आणि ज्या कुळांत कीर्तिमान (थोर) पुरुष होऊन गेले असतील त्या घराण्यांतील मित्रांनीं, फक्त आपल्या वडिलांनीं मिळविलेल्या पदांस न भुलतां वडिलांचें गुण संपादन करून घ्यावेत ह्मणजे वडिलांचें नांव सहजांशीं राहील.

सांप्रतकाळीं खऱ्या थोरपणास कलंक येऊन दुसऱ्या व तिसऱ्या भेदांअन्वयें लोकांचें वर्तन जास्त वाढलें आहे, त्या योगें जनलौकीक केवळ नाटकांतील पात्राप्रमाणें झाला आहे; कोणामध्यें हीं उद्योगीपणाची ईर्षा राहिलेली दिसत नाहीं, याविषयीं कांहीं कारणें उद्योग या विषयांत दिलीं आहेत, तेव्हां अशा प्रकारची स्थिति होणें हें मोठें लांछन होय.

आतां आह्मांत व कित्येक इतर हिंदु यातींत जे मागील शूर व नीतिमान पुरुष होऊन गेले त्यांचे वंशजांस थोरांचे वंशज ह्मणण्याची चाल कांहींशी बरी ह्मणतां येईल, कारण त्या कीर्तिमान पुरुषांचे वंशजांस जरकरितां आपल्या पूर्वजांनीं काय काय केलें याचा इतिहास पहाण्याचे मार्ग उरलें नसतां, आपलें वडिलार्जित जें नांव चालत आलें आहे यावरून त्यांनीं असें समजावें कीं, आपले मागील काळचे पुरुष थोर आचरणाचें असावेत कीं ज्यांच्या योगानें हें नांव या कुळास प्राप्त झालें आहे, करितां आपणांसही त्यांच्याप्रमाणें उद्योगी व सदाचरणी झालें पाहिजे परंतु त्या समजाचा अगदीं विपरितार्थ होऊन गेला यामुळें ते आपणास आह्मीं जातीचेच किंवा कुळाचेच थोर आहों, आपणांत उद्योगाची व लौकीकाची उणीव मुळींच नाहीं असें समजूं लागले, त्यामुळें द्वैत फार वाढलें.

जर कोणी शहाण्या मनुष्यानें अशा उलट समजाच्या लोकांस सांगितलें कीं, आपण थोरांचें वंशज अहां करितां आपणांस अमुक गुणांची समृद्धि केली पाहिजे तरच आपण वडिलांचें नांव राखाल, तर त्यांस मोठा क्रोध येऊन त्या सुविचारी मनुष्यास ह्मणतात कीं; तुह्मीं आमची निंदा करितां, तुह्मांस आमचा थोरपणा सहन होत नाहीं

आणि शिवाय ते आपल्या चालू क्रमास बळकटी यावी सबब त्या सज्जनाची हानी करूं इच्छितात. बरें कोणत्याही दुसऱ्या कुळांतील मनुष्य शहाणा, वाक्बदार, द्रव्यवान्, होऊन त्यास चार लोक मान देऊं लागले तर, हे कुळाजित थोर ह्मणविणारे, त्याची किर्ति ऐकून अथवा समक्ष त्यास पाहून त्याचा हेवा व मत्सर करूं लागतात त्यामुळें अवांतर दुसरीं हीं कुळें गुणरहीत झालीं, तेणेंकरून सर्वांसच सामाजीक अज्ञानपणा प्राप्त झाला, सबब जो तो दूर दृष्टि न पोहोंचवितां अर्जवि थोरपणांतच सौख्य मानूं लागला, ह्मणजे दुधाची तहान ताकानें भागविणें शिष्ट झालें. गृहस्थ हो, जर आपली चुकी आपल्या नजरेस येत नाहीं तर परांच्या स्थितीची व योग्यतेची आपल्याशीं तुलना करून पहावी ह्मणजे कोणतें व्यंग आहे तें कळेल आणि त्या योगें थोडा विचार सुचून मत्सरीपणाचा पश्चाताप होईल.

अहो, या सृष्टींत ज्यास थोरपणाची व सुखाची आवड नाहीं असा एक तरी प्राणी मिळेल काय? खरोखर नाहीं सर्वांसच आपणास श्रेष्ठत्व प्राप्त व्हावें अशी इच्छा आहे, पण जे योग्य मार्गानें अवलंबन करतात त्यांसच तें प्राप्त होतें. दैवानुसार थोरपणा प्राप्त झाला तर त्यानें सर्वांशी गर्व रहित आपलें वर्तन ठेविलें पाहिजे आणि तसें न करितां जर आपणांस प्राप्त झालेल्या वैभवाच्या तोऱ्यानें लोकांचा धी:कार केला तर जनसमुदाय विकोपास जाऊन त्याचा परिणाम विपरीत होतो, फार तर काय पण राजासारखे थोर अधिकारीही आपल्या थोरवीस मुकतात मग इतरांची कथा ती काय? जगाची रीत अशी आहे कीं आपण दुसऱ्यावर उपकार केला ह्मणजे तो आपणावर उपकार करितो आपण इतरांशीं गोड भाषण केलें ह्मणजे ते आपणासही योग्य उत्तर देतात आणि जर आपण दुसऱ्याचा अपमान केला तर तो आपला अपमान संधी आल्यावर करण्यास चुकत नाहीं. जरी कोणी त्याच वेळीं उलट घेतली नाहीं तरीं असें समजूं नये कीं आपला दाब त्याजवर बसला आहे, कारण प्रसंगानुसार तो आपणांकडून अपमान पावलेला गृहस्थ आपणांवर काय संकट आणील ह्याचा नेम नाहीं कदाचित् तो आपल्या सदुद्योगानें आपणाहून अधीक श्रेष्ठत्व पावेल

किंवा द्वाड आचरणानीं आपला अथवा आपल्या मागें आपल्या आप्तांचा तरीं अपमान करीलच, कारण मानापमानाची ईर्षा मोठीच विकोपाची होऊन राहिली आहे.

याजकारितां जे थोर आहेत ते कधींच कोणाचा अपमान करीत नाहींत पण यदाकदाचित् त्यांनीं एखाद्याची विपरीत कृति पाहिल्यास आपण विकोपास न जातां त्यास दोन सभ्यपणाचे शब्द सांगून त्याजकडून तो द्वाड गुण सोडविण्याचा प्रयत्न करितात. तात्पर्य सर्वाभूतीं योग्य आचरण ठेवणें हाच थोरपणाचा पाया मजबूद करणें होय. आपल्यास दुसऱ्यांनीं मान द्यावा अशी इच्छा झाल्यास वर सांगितलेले प्रकार विशेष लक्षांत ठेविले पाहिजेत उगीच मन सैरावैरा करून कोणीं ह्मणावें आह्मीं सप्तभूजीं थोर, कोणीं ह्मणावें आह्मीं पंच मुखीं श्रेष्ट कित्येकानीं आपण त्रिनेत्री वरिष्ट, कांहीं जन आह्मीं द्विदळी उंच असे ह्मणत असावें हें राष्ट्रीय एकीस मोठे अपाय कारक होय. कारण आपल्या मराठी कुळाचें विराट स्वरूप आहे आणि तें निरनिराळ्या घराण्यांनी मोठ्या विस्तीर्ण तेस पावून शोभायमान झालें आहे यास्तव आह्मीं सर्वच समान मानाचे व वैभवाचे आहोंत असें समजलें पाहिजे, जसें, वृक्ष बुंधारा एक असून तें मूळ अनेक शाखानीं व पल्लवानीं शोभायमान पावतें तद्वत आह्मां सर्वांचा विस्तार होय. एक अशी कल्पना करा कीं, जर त्या वृक्षाचा विस्तार आह्मीं श्रेष्ट आणि थोर ह्मणूं लागला तर त्या विस्तारातून कोणती शाखा किंवा पल्लव श्रेष्ट गणावा बरें? असा प्रश्न निघाल्यास त्याचें उत्तर काय बरें येईल? तर सद्गुण श्रेष्ट.

जे कोणी आपण एक स्वरूपाचे अंश आहों असें जाणतात आणि सर्वांच्या हिता करितां झटतात तेच गुणीजन महत्व पावतात त्यांस आह्मांस थोर ह्मणा असे उद्गार काढावे लागत नाहींत; ह्या प्रमाणें नर जगीक व्हाटी आहे तर व्यर्थ बडबड करून एकानें दुसऱ्याचा अपमान करणें काय अर्थ, असो.

सांप्रतचा प्रसंग कोणता आहे ह्याजकडे प्रत्येक व्यक्तीनें चांगले लक्ष पोंहोंचवून तदनुसार आपलें वर्तन ठेवावें, असें सर्वास विनयपूर्वक कळविणें आहे.

आज रोजीं मंडळीस विशेष तसदी पडली आहे याज कारितां हें व्याख्यान येथें संपवून दुसरे एखादे वेळीं आणखी कांहीं उपयुक्त सूचना देण्याचा विचार करूं.

तारीख ९ मे ८९.

सभा.
११७-११८-११९.

## दृढनिश्चय.

आज ब-याच दिवसांपासून माझ्या मनीं एखादा निबंध लिहून सभेपुढें ठेवावा असा विचार घोळत होता त्याप्रमाणें आज जें थोडेसें लिहून आणिलें आहे, त्याजकडे मंडळीने लक्ष द्यावें अशी विनंति आहे.

जगांतील कोणत्याही सजीव प्राण्यास कांहीं तरीं बारीक मोठा उद्योग करावा लागतो, उद्योगाविना कोणत्याही सजीव प्राण्याचें चालावयाचें नाहीं. पहाबरें यःकश्चित् मुंगिलासुद्धां आपल्या उदरपोषणार्थ शक्तिप्रमाणे श्रम करावें लागतात मग अर्थांतच तीजपेक्षां जे जास्त व्यवसायाचे प्राणी आहेत त्यांस त्या मानाने विशेष उद्योगी असणे मोठें अगत्याचें आहे. आतां उद्योग सुखाचें साधन आहे असें जाणतअसून आलस्य निद्रेंत दिवस काढून नशिबावर अवलंबून रहाणे आणि सुखाची अपेक्षां करणे हें निवळ मनुष्यदेहास लाजिरवाणे होय. मनुष्यांनीं आपला आलस्य रिपू हनन करून सतत उद्योग करावा मग त्यांचा इष्टहेतु सिद्धीस जाण्यांस ईश्वर साह्य देईल, आणि तेणेंकरून त्यास सुख होईल. ह्मटलें आहे, "उद्योग्याचे घरीं रिद्धीसिद्धी पाणी भरी" ह्मणून मनुष्यास दृढनिश्चयाची अवश्य मदत पाहिजे; कोणतेंही काम आणि त्यांत विशेषेकरून सार्वजनीक काम करावयाचें ह्मटलें ह्मणजे त्यास दृढनिश्चयाची साह्यता पाहिजेच. आजपावेतों जीं कांहीं मोठीं कामें झालीं आहेत तीं सर्व दृढनिश्चयाचींच फळें होत, परंतु सद्याची आपली स्थिती कांहीं विलक्षण झाली आहे. १— लोकांस उतावेळपणाने अगदींच ग्रासून टाकिलें आहे, लोकांची दृष्टि पुढच्या मोठ्या लाभावर नसून सध्याच्या थोडक्याशा लाभावर असते, त्यांच्या

आंगात-स्वदेशाभिमानाचा लेशही वास करीत नाहीं, "जसें, ज्यांस शिजेतव धीर नाहीं त्यांस पिकेतव कोठचा." अशा स्थितीनें जोंपर्यंत आपला तळ उठविला नाहीं तोंपर्यंत स्वदेशास उर्जितदशा येणें अगदीं दुरापस्त आहे.

२—एखादें सार्वजनीक हीत करण्याच्या इराद्यानें एखादी मंडळी अथवा सभा स्थापन होते परंतु तिची जशी स्थिती असावी तशी दिसत नाहीं व सतत फार दिवस टिकून योग्य लोकाश्रय मिळून एखादें काम झाल्याचें क्वचितच आढळण्यांत येतें याचें कारण लोकांमध्यें पहिल्यानें जी हुरूप असते ती त्यांचा दृढनिश्चय नसल्यामुळें दिवसें दिवस कमी होत जाते आणि त्यामुळें पुढारी लोकांस उपहासास मात्र पात्र व्हावें लागतें ह्मणून प्रयत्नानें "आधीं परिणाम पाहून मग हात घालावा," आणि एकदा हात घातल्यावर भागुबाई सारिखें मध्येंच पराङ्मुख न होतां किती ही संकटें भोगावीं लागलीं तरी त्यांस न जुमानतां हातीं घेतलेलें काम सिद्धीस जाई पर्यंत रात्रंदिवस दृढ निश्चयानें भगिरथ प्रयत्न करून सिद्धीस नेणें यांतच खरा पुरुषार्थ आहे.

बांधवहो—आजकाळ आपले सर्व लोक आपल्या वडिलांचे नांवावरच शेखी मिरवीत आहेत. जो पहावा तो आठ हात लांकुड आणि नऊ हात ढलपी ह्मणजे आमच्या वडिलांनीं अमुक केलें होतें, तमुक केलें होतें, ते अमक्यास पूज्य मानीत होते इत्यादि गप्पा मारण्यांतच वेळ घालवीत असतात परंतु कोणी असा विचार करीत नाहींत कीं, आपल्या वडिलांस इतके नांवालौकीकास चढण्यास किती दृढनिश्चयानें उद्योग करावा लागला असेल बरें. वडिलांनीं दृढनिश्चानें व उद्योगानें जुलमी यवन बादशहास आपलें खरें शौर्य दाखविलें आणि स्वातंत्र्य सुखाचा लाभ करून घेतला ह्मणूनच ते पुरुष रत्न मालिकेंत चमकत राहिले आहेत, ह्या सर्वांचा विचार करणें आपलें कर्तव्य होय.

गृहस्थहो आपणांत हल्लिं सारिखा पोकळ अभिमान कांहीं कामाचा नाहीं त्या पासून आपल्याच्यानें जितकें दूर रहावेल तितकें रहावें. आपला अभिमान पोकळ आहे असें जें आपणांस दूषण मिळालें आहे त्याचा आपण योग्य विचार केला असतां तेंच दूषण भुषणास्पद होईल. अहो

आपला कुळदीपक जो महा प्रतापि शिवाजी त्यानें जर भारथ रामा-यणादी ग्रंथ वाचून अथवा श्रवण करून आपल्या देशांत प्राचिन काळीं मोठ मोठे योद्धे होऊन गेले अशी त्यांचीच घमेंडी मिरविली असती आणि नशीबावरच हवाला ठेऊन गुपचूप बसले असते तर आपली आज कशी दशा झाली असती याचा विचार करणें हें ज्यांस मराठे कुळाचा अभिमान आहे त्यांजवरच सोंपवितों. ज्या वेळीं महमदी अम्मल या देशांत जिकडे तिकडे बसला होता त्या वेळीं त्यांच्या धर्मा विरुद्ध अथवा वर्तनाबद्दल चकार शब्द काढण्यास सुद्धा मीं मीं ह्मण-णारे ही धजत नव्हते अशा वेळीं ही केवळ रानांत असणारे जे मावळे लोक त्यांचीं प्रीति संपादून एका दृढ निश्चयानें हव्याहत उद्योग केला. त्या समयीं जीं जीं महा अरिष्टें उभीं राहिलीं होतीं त्यांस न डगमगता व स्वतःच्या सुखाकडे लक्ष न देतां शिवाजी महाराजानें आपल्या स्वदेश बांधवांस यवनाच्या दुःसह छळा पासून मुक्त केलें हें जगविख्यात आहे; पहा, शिवाजीची जर स्वतःच्या सुखाकडे दृष्टि असती तर औरंगजेब बादशहाचे अर्जव करून त्यानें आपणांस मोठी जहागिरी संपादन करून घेतली असती आणि या अशा महाप्रतापि पुरुषास बादशहाकडून आश्रय मिळण्यास बिलकुल विलंब लागला नसता परंतु शिवाजीची प्रतिज्ञाच होती कीं, स्वदेश शेवेंत मरून जाणें हें शत्रूस शरण जाण्यां पेक्षां अधीक भूषणीय होय आणि शेवटीं त्यानें आपणां मधील शौर्य, धैर्य इत्यादि गुण दाखवून प्रतिज्ञा खरी केली. हें कशाचें फळ तर एक दृढ निश्चयाचें.

थोरले माधवराव व सवाई माधवराव यांच्या कारकीर्दीत रामशास्त्रि प्रभुणे या नांवाचा एक विद्वान् व निष्पृही गृहस्थ, न्यायाधिशाचे कामावर होता, तो आपल्या वयाच्या विसाव्या वर्षी एका गृहस्थाचे घरीं शागिर्द होता, त्यावेळीं त्यास विद्या ह्मणजे काय हें मुळींच ठाऊ-क नव्हतें, पण त्यास आपल्या स्थितीची लाज वाटून तो कांहीं दिवसांनीं विद्या संपादन करण्याच्या उद्देशानें काशीस गेला आणि तेथें त्यानें बहुत श्रम घेऊन संस्कृत विद्येचा उत्तम अभ्यास केला, त्या योगें तो तेथील मोठ मोठ्या पंडितांत गणला जावून रामशास्त्रि

हें नांव पावला. नंतर त्यानें पुण्यास येऊन पेशव्याची चाकरी धरिली; तेव्हां पहा बरें जो एक वेळ राम्या शागिर्द होता तोच पुढें आपल्या दृढनिश्चयाच्या योगानें न्यायाधिशाचे पदवीस चढला.

लुथर ह्मणून एक युरोपामध्यें धर्मोपदेशक होता, तो ज्या वेळीं देशपर्यटणास निघाला, त्या वेळेपासून त्यानें आपल्या धर्मशास्त्राचें थोडथोडें भाषांतर करण्याचा यत्न चालविला होता, नंतर कांहीं दिवसानें त्यानें तें काम तडीस नेलें. हें त्याचें महत्कृत्य पाहून युरोपस्थ सर्व जनांस मोठें आश्चर्य वाटलें कारण त्या वेळीं हल्लीं सारखी कलाकौशल्याची समृद्धि नव्हती त्यामुळें प्रवासाचीं कामें मोठीं संकटाचींच होतीं. अशा वेळीं त्यानें आपल्या दृढनिश्चयानें हा उद्योग करून जग प्रिय झाला.

आतां कांहीं व्यावहारिक मुद्दे घेऊं. कित्येक लोकांचीं मनें अळवाच्या पानावरील पाण्यासारखीं असतात, जर त्यांनीं कोठें ऐकिलें किंवा वाचिलें कीं, अमुक मनुष्यानें अमुक उद्योग केला होता आणि त्यापासून त्यास चांगला लाभ झाला किंवा अमकें करणें बरें, तर ते त्याचा पुरता विचार न करितां आपलें हातचें काम सोडून तसें करावयास जातात व पुढें कांहीं संकट आलें अथवा व्हावा तसा लाभ झाला नाहीं ह्मणजे तो यत्न तत्काळ सोडून देतात आणि दुसरा कांहीं उद्योग करीत बसतात हा मोठाच गैरसमज होय. एकवेळ अशी गोष्ट घडून आली कीं, एक आमचा मित्र बराच विद्याभ्यास करून एका खात्यांत नोकर झाला, पण त्यास नवीं नवीं पुस्तकें वाचण्याचा व सभेंत जाऊन व्याख्यानें ऐकण्याचा फार नाद असे, त्यानें एका पुस्तकांत असें वाचलेंकीं “ नोकरी ही निवळ गुलामगिरी आहे ” तेव्हां या गुलामगिरींत आयुष्य घालविण्यापेक्षां व्यापार करावा हें त्यास पसंत पडलें, नंतर त्यानें आपली नोकरी सोडून व्यापार करूं लागला, पण त्याकामांत तो अजाणता असल्या कारणानें त्यास तोटा येऊन कर्जबाजारी झाला. एके दिवशीं अशाच कांहीं विचारांत तो निमग्न असतां त्यास एका बुकांतील वाक्याची आठवण होऊन तो आपणाशींच ह्मणाला कीं, जर “ उत्तम शेती, मध्यम व्यापार,

आणि कनिष्ट नोकरी" असें आहे तर आपण आतां शेती करावी ह्मणजे आपलें दैव उघडेल असा बेत करून त्यानें शेतीमार्ग धरिला आणि एक वर्ष तें काम केलें, पण त्याही कामांत नूतनच असल्यामुळें त्याचे इच्छेप्रमाणें एकदम फायदा होण्याचा संभव नव्हता पण हा गृहस्थ पडला बाणेदार, ह्मणजे "रात्रीं तूप खाऊन सकाळीं रूप पाहा-णारा" यास धीर कोठला! ह्मणून त्यास हाही धंदा बरा दिसेना सबब तोही त्यानें सोडून दिला. याप्रमाणें बेत करतां करतां बिच्या-ऱ्याचा सर्व आयुर्दीप खर्ची पडला.

गृहस्थ हो—ह्यासदरील उदाहरणांवरून आपल्या लक्षांत येईल कीं मनुष्यांमध्यें कोणतेंही काम सिद्धीस नेण्याचा दृढनिश्चय पाहिजे तरच ईश्वर त्यांस यश देईल; यावरून आपणांतील ज्यांनीं हल्लींचें सभेचें काम आरंभिलें आहे त्यांस किती दृढनिश्चयानें हें काम चालविलें पाहिजे, याचा विचार करून त्यांनीं व साह्य देणारानीं तदनुसार वाग-लें पाहिजे.

**अभंग.**

**अहो निश्चयाचें बळ। तुकाह्मणें तेंचि फळ॥**

आपला.

**गोविंद कृष्णरावदळवी.**

जानवेलकर.

**सभा. १२१–१२२.**

ता० ६ जून सन १८८५.

## मराठे राजे व मराठे लोक.

सभेकडून प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांत दोन शब्द घेतां यावेत या इरायानें आजच्या प्रसंगीं कांहीं सुविचार सभे पुढें सादर करण्यांत येत आहेत कीं, ज्या योगें आमचें हरद्र आमच्या थोरांच्या कर्णीं जाऊन ते या विनंतीकडे कांहीं तरी लक्ष देतील अशी आशा आहे.

असा आह्मांस आमच्या जन्म भूमिचा ( महाराष्ट्रदेश ) ज्ञात बंधुंचा, देशबंधुंचा अभिमान आहे, तसाच आमचे संस्थानिक ( मराठे राजे ) यांचा ही अभिमान आह्मांस पूर्ण आहे; ह्मणून हा आजचा वेळ आपण खर्चि घालणें योग्य होय. परंतु "थोरांशीं गांठ आणि अपमानाशीं कारण" असें मात्र न होवो. पण तें कसें कां असेंना ! भिऊन भिऊन प्राणांत होण्याची वेळ समीप येऊन धडकली, यद्यपि कांहीं यत्न केल्या विना स्वस्थ बसणें अगदीं अज्ञानपण होय; तस्मात पुढील वाक्याकडे लक्ष दिलें असतां आपलें योग्य कर्तव्य करण्यास कांहीं हरकत आहे असें वाटत नाहीं.

## श्लोक.

उद्यमःसाहसंधैर्यंबुद्धिःशक्तिःपराक्रमः ॥
षडतेयत्रवर्तंतेतत्रदेवःसहायकृत् ॥

**अर्थ**—उद्योग, साहस, धैर्य, बुद्धि, शक्ति व पराक्रम हे सहा गुण जेथें असतात तेथें देव साह्य करतो असें जाणावें.

**तात्पर्य**—चांगल्यास देव साह्य असतो.

या सुजन वाक्यातील पहिल्या व तिसऱ्या गुणांचें अवलंबन करून, हा विषय चालविला आहे.

पहा केवढी आश्चर्याची गोष्ट कीं, ज्या मराठ्यांनीं आपल्या शरीराचें मांस दुभांग होईल अथवा मृतकाळ प्राप्त होईल असा अकुंचित विचार न करितां केवळ ईर्षेनें व स्वदेशाभिमानानें मागील काळीं मोठ्या भयंकर काळाचाही सामना करून आपला उद्देश तडीस नेला आणि पुढें ही आपसांतील प्रेमबुद्धि कायम रहावी ह्मणून कांहीं सुयोजना करून ठेविली होती, परंतु काळचक्र गतीनें ह्मणा अगर स्वतःचेंच हयगयीनें ह्मणा, केवढें जमीन असमानाचें अंतर झालें; तें कोणतें ह्मणाल तर मराठे राजे व मराठे लोक यां मधील. त्या भाग्यशाली पुरुषांस आपले स्वयात बंधु हल्लीं कोणत्या स्थितींत आहेत, याजबद्दल कधीं तरी स्मरण झालें असेल काय ? कदाचित झालें असल्यास आ-

र्हाच पडलें दैंव झाली!! त्यास त्यांचा तरी काय इलाज. परंतु असें ही ह्मणून मनाची तृप्तता होत नाहीं; कारण, जर त्यांचे चित्तीं आह्मां विषयीं कांहीं विचार आले असते तर आमची अशी निराश्रीत स्थिति झाली नसती हें खचित.

हल्लींच्या चालु जातिभेदांमुळें राज्यव्यवस्थेंत मुख्य अधिकारी सजातीय असणें उचित होय, आणि तसें न झाल्यास हमेशा विपरीत प्रकार घडून येत असतात. पहा, मराठी राज्याच्या वेळीं जेव्हां परयातीच्या हातीं राज्यसूत्रें गेलीं तेव्हां त्यांनीं थोडक्याच मुदतींत आकाश व पाताळ एक करून सोडिलें होतें. त्या संधींत नवीं नवीं पुराणें किती झालीं, पवित्रपणानें इतर यातींस कसें तुच्छ केलें, नवे नवे धर्मपंथ व चालीरीति कसकशा स्थापन झाल्या त्याचा पारावारच नाहीं; याचें प्रत्यंतर हल्लींही शहाणे लोकांनीं अनुभविलें असेल. अशा त्या धरणीकंपामुळें मराठे लोकांस व इतर यातींस जें भ्याड व अकुंचित बुद्धिचें स्वरूप आलें त्यांतून मुक्तता होणें अगदीं अशक्य झालें होतें; परंतु ईश्वर कृपेनें इंग्लिश अम्मल सुरू होऊन सर्वांस विद्याज्ञानामृत खुल्या मार्गानें मिळूं लागलें ह्मणून कांहीं अंशीं तरी तरणोपाय झाला, नाहीं तर आज तागायत मराठ्यांस "त्यांच्या भोळसरवृत्तीनें" मोक्षपदींच पोहोंचविलें असतें. आमच्या मराठे राजांनीं आपल्या ज्ञातवर्गास योग्य शिक्षण देऊन त्यांची सत्ता त्यांच्या नजरेखालीं ठेविली असती तर विशेष प्रशंसनीय झालें असतें. जशी शौर्यगुणानें मराठ्यांकडे कांहीं स्वतंत्रसरदारी चालत होती तशी थोडीशी दप्तरदारीही चालू असती तर मराठी राज्यास असा धक्का बसण्याचा संभवच नव्हता, पण मराठीशाईस जरा विचित्र प्रकारचा बाधा होऊन आपण काय करितों याचें त्यांस स्मरणच राहिलें नाहीं. पहा काय चमत्कारतो, अहो कोणा-एखाद्यानें पुराणसप्ता करून त्यांत असा मंत्रजप करून दाखविला कीं मागील काळचे क्षत्रिय राजे अमक्यांच्या पायांचे तीर्थ, प्रसादा दाखल घेत होते व अमुक ठिकाणीं गेलें असतां मोठी पुण्याई होऊन बेच्याळीसकुळें उद्धरतील व अंती मोक्षही प्राप्त होईल इत्यादि काल्पनीक पुण्य पदरीं घालण्याची आशा दर्शविली कीं तात्रडतोब मोठमोठ्या

भारी रकमां त्याकामीं खर्ची पडत होत्या व हल्लींही पडत आहेत पण अशा ढिल्या व परबुद्धिफाशानें जेव्हां शेवटीं खुद्द खाशावरच प्रसंग येऊन गुदरले तेव्हां ते अशा मसलती देणारे व जमा केलेलें पुण्य कोठें दडून बसलें याचा पत्ताही लागला नाहीं. हर हर!! किती दुःखाची गोष्ट बरें? पण त्यापुण्याईच्या आशेनें खर्च झालेल्या रकमांपैकीं अंशतः तरीं आपल्या ज्ञातवर्गांत विद्या वृद्धी होण्याकडे अथवा राष्ट्रीय सुधारणुकीकडे खर्च झाला असता तर काय वाउगें झालें असतें? मग प्रसंगीं मराठे लोकांनीं आपली स्वामीभक्ति दर्शविण्यास देहही खर्ची घालण्यास कमीं केलें नसतें.

शिवाय दुसरी अशी एक दुःखप्रद गोष्ट घडून आली कीं जस जसें त्या वैभवशाली थोर पुरुषांच्या मनांत आह्मीं इतरां पेक्षां श्रेष्ठ कुळाचे मराठे असें वागुं लागलें तसतसे ते इतरांपासून अलग राहूं लागले आणि तोचकित्ता कित्येक इतर मराठे लोकांनीं ही गिरविला; तेव्हां अर्थातच सर्वांस पृथक्पणा येऊन ते परस्पर एकमेकांच्या प्रीतीपासून दुभांगले गेले. ह्या त्यांच्या विचारांस कसें स्थळ मिळालें असेल तें असो! आह्मांस तर याबद्दल मोठें आश्चर्य वाटतें. अशा कल्पना त्यांच्या मनीं उद्भवण्यास कोणी वकीली तर केली नसेलना? केलीच असावी, कारण हल्लीं ही कोणी व्यवस्थेशीर मराठा दृष्टीस पडल्यास त्यास त्याच्या आप्तवर्गापासून व बंधुजना पासून पृथक करण्याकरितां त्याचे मनीं अनेक प्रकारचे विकल्प घालण्याचे प्रयत्न चालू आहेत आणि ह्याच कारणानें मराठ्यांचा अपसांत बेबनांव झाला, नाहीं तर असा जबरदस्त भेद परस्परांत पडण्याचें कारण नव्हतें, असें सूक्ष्म विचारांतीं नजरेस येतें. नाहीं पेक्षां जे जे भाग्यशाली पुरुष आपल्या ज्ञातबंधुच्या व देशबंधुंच्या मदतीनें मोठ मोठ्या राज्य वैभवास पोंहोंचले त्यांस व तद्वंशीयांस मागील हकीकतीचा अगदीं विसर पडून जाणें सहस्त्रांशीं घडून आलें नसतें.

बरें, राजदरबारीं असलेले मानकरी, सरदार, जाहागीरदार, अथवा कित्येक श्रीमान लोक यांनीं ही बहूत वेळां धर्माच्या मिषानें अगर इतर कोणत्याही कारणानें स्वतः किंवा दुसऱ्यां कडून मोठ मोठ्या

रकमा खर्चि घातल्या होत्या व हल्लीं ही तोच क्रम चालू आहे पण कधीं काळीं एकानें तरीं ज्ञातिहितार्थ कांहीं केलें आहे काय? हो, असें व्हावें कशानें जे पहावे ते पुण्य जोडण्याचे व मोक्ष मिळविण्याचें साधनांस लुब्ध होऊन गेले. पण त्या कृत्यानें तरीं त्यांची व्यवस्था नीट रहावी तेंही घडलें नाहीं; अखेर सर्वांचीं घरेंदारें, वतनवाड्या, मानपान खोती, पाटीलकी, सरदारी, देशमुखी, आणि सत्ता इत्यादि चट्टसारीं लयास गेलीं व जात आहेत. अशा निराश्रितपणाच्या योगानें बहूतेक मराठ्यांचीं घरांणीं जमीन दोस्त झालीं; यद्यपि ही कोणी तिकडे लक्ष्य देत आहेत काय? नाहीं नाहीं हा मोठा चमत्कार नव्हे काय?

अहो आपली भूमी या अभिमानानें दुःख भोगावें एकानें व वैभव प्राप्त झालें असतां त्या थोरांशीं फक्त दोन गोड शब्द बोलून सुखोपभोग घ्यावा दुसऱ्यानें. पण कोणी असा विचार केला नाहीं कीं केवळ आयत्याच सुखाची इच्छा करणारांनीं प्रसंगीं बहादरी करून आपल्या धन्याचें वैभव रक्षण केलें आहे काय? अशी गोष्ट होणेंच नाहीं; कारण ज्यांची कळकळ त्यांसच असणार इतरांस काय ती !! असो गत गोष्टींची वाटा घाट करून उपयोग नाहीं.

आतां, या उपर आमच्या राज्य मंडळानें आह्मां साठीं काय केलें असतां आमचे कनिष्ठ दिवस मागें पडतील याज विषयीं विचार कर्तव्य हाच काय तो मुख्य मुद्दा होय; ह्मणून आमची त्यांस अशी विनंती आहे कीं त्यांनीं आह्मांस विद्या ज्ञान देण्यास मनःपूर्वक यत्न केला असतां आमचे मराठे लोक कांहीं अंशीं तरी बचावले जाऊन आपल्या स्वामीचा आभार मानितील आणि त्या योगें खरा व योग्य लाभ उभयपक्षीं प्राप्त होईल. हल्लीं दयाळु इंग्लिश सरकार आह्मांस सुशिक्षण मिळावें ह्मणून कांहींसा यत्न करीत आहे, अशांत जर आमच्या संस्थानिकांनीं ( मराठे राजांनीं ) ही आपला उदार हस्त पुढें केला तर आमचें दैवच उदेलें असें होणार आहे. जर हल्लींचा हा उत्तम समय सुशिक्षण मिळविल्या शिवाय मागें पडला तर मात्र मराठे

१ जे आपल्या धन्यास व त्याचे ज्ञातवर्गास अपवित्र समजून त्यांचा मत्सर करणारे

लोकांची व्यवस्था फारच कठीण, तें काय सांगावें ! पण जसा एखादा तमासगीर आपल्या उदर निर्वाहा करितां पुष्कळशीं लांकडीं बाहुलीं एका पेटींत भरून त्या सर्वांचीं सूत्रें एकाच ठिकाणीं गुंतविल्यानें तीं सर्व बाहुलीं एका चक्रगतीनें आपापले अवयव हालवूं लागतात आणि पुढें त्या खेळावर कांहीं मिळेनासें झालें ह्मणजे तो तमासगीर बाहुल्यांसहीत ती पेटी एखाद्या खंदकांत झोंकून देऊन आपला मार्ग धरितो तसा प्रसंग आह्मांवर आल्याविना रहाणार नाहीं.

आलिकडे आमचे बडोदे सरकार श्रीसयाजी राव महाराज हे मराठ्यांच्या अज्ञ व निराश्रित स्थिति विषयीं विचार करूं लागले आहेत पण त्या त्यांच्या सुविचारांस हजारो विघ्नें, त्यांनीं तरीं करावें काय! "आह्मींच पडलों दैवाचे भोंपळे" तथापि आमचे सूज्ञ गायकवाड सरकार आपला इच्छित हेतु सिद्धीस नेण्याचा दीर्घ प्रयत्न करीत आहेत तद्वत आमचे पूर्णाभिमानी कोल्हापूरचे महाराज, शिंदे सरकार होळकर सरकार, वाडि सरकार व जव्हारचे राजे यांनीं ही कृपा दृष्टि केल्यास मराठ्यांचें पुनरजीवन झालेंच असें समजलें पाहिजे, अशा वेळीं आमचें न्यायी इंग्लिश सरकार, जनहिताकडे विशेष लक्ष देवोत अशी आह्मीं जगन्नियंत्या जवळ प्रार्थना करीत आहों.

सभा.

१२५-१२६-१२७-१२८.

ता. ४ जुलई सन १८८५.

## मित्रत्व.

### आर्या.

उत्तम मनुष्य जो कीं तत्संगा तूं कधीं नको सोडूं ॥
वाईट मनुष्याची दुःखद मैत्री तशी नको जोडूं ॥

संगति आणि मैत्री ह्यांचा एकमेकांशीं इतका निकट संबंध आहे कीं, संगति शिवाय मैत्रीच जोडतां येत नाहीं आणि मनुष्यप्राण्यास

कोणाची तरी संगत केल्या विना मुळींच चालावयाचें नाहीं; कारण मनुष्याचा स्वभाव केवळ वितळून पातळ केलेल्या लाखेसारिखा आहे, ह्मणून त्यास ज्या साच्यांत ओतावें त्या सारखें रूप प्राप्त होतें.

हें जग भिन्नभिन्न स्वभावाच्या मनुष्यांनीं भरलेलें आहे, तथापि त्या सर्वांस एकमेकांचा आश्रय अवश्य लागतो; त्या आश्रयाचे तीन प्रकार आहेत. एक साधारण स्नेहीं दुसरा मित्र, तिसरा जिवलग मित्र. ह्यांतून पहिले दोन प्रकारचे मित्र बहुशः फार आढळतात, आणि ते परस्परांस निरनिराळे उद्देशानें उपयोगी पडत असतात, कित्येकतर बाह्यदर्शी मित्रत्वानें अगर स्नेहानें आपलें वर्तन ठेवून प्रसंगीं विश्वास घात करितात. यास्तव कोणाचाही उत्तम परीचय झाल्याविना त्यास आपला मित्र अशी संज्ञा देतां येत नाहीं यदाकदाचित् निकट मित्रत्व जडलें तरी सर्व कामीं दक्षता ठेवावी कारणः—

## श्लोक.

नविश्वसेत्कुमित्रेच मित्रेचापि नविश्व सेत् ॥
कदाचित् कुपितं मित्रः सर्व गुह्यं प्रकाशयेत् ॥

अर्थ--कुमित्राचे ठायीं विश्वास ठेवूं नये, आणि मित्रावर ही ठेवूं नये, कारण कोणे समयीं मित्र कोपला तर आपलें सर्व गुह्य लोकांमध्यें प्रसिद्ध करण्यास चुकणार नाहीं.

याजवरून जिवलग मित्र अगदीं दुर्मिळ आहेत; परंतु ज्यास आपण मित्र मालिकेंत गणलें असून जो आपणास आपल्या संकट समयीं मनःपूर्वक साह्य देतो आणि जो या पुढील श्लोकांत दर्शविलेल्या लक्षणानें युक्त असतो त्यास आपला जिवलग मित्र ह्मटला पाहिजे, ज्या प्रमाणें मनुष्य प्राणी आपला उदर निर्वाह चालविण्यास अनेक प्रकारचे गुण संपादन करून त्या सर्व गुणांपैकीं जो त्यांमध्यें उत्तम गुण असतो त्याच्याच योगानें तो मनुष्य उदयास येऊन सुख पावतो, तद्वत् मनुष्यास जरी पुष्कळ स्नेही, आप्त इत्यादि असले तथापि त्या मनुष्याचा जो जिवलग मित्र असतो तोच समय विशेषीं मनःपूर्वक साह्य देतो.

ह्मणून प्रत्येकास सुमित्र असणें फारच जरूरीचें आहे. आतां तो कोणत्या लक्षणानें युक्त असला पाहिजे त्या विषयीं पुढील वाक्य पहा.

### श्लोक.

ददातिप्रतिगृण्हाति गुह्यमाख्यातिपृच्छति ।
भुंक्ते भोजयतेचैव षड्विधं प्रीतिलक्षणम् ॥

**अर्थ**—आपली वस्तु मित्रास देतो, मित्रानें दिली ती घेतो, आपली गुज गोष्ट मित्रास सांगतो, मित्राची पुसतो, मित्राच्या घरीं जेवावयास जातो, आणि त्यास आपल्या घरीं जेवावयास बोलावितो.

**तात्पर्य**—सुमित्राचे ठिकाणीं भेद नाहीं.

मनुष्यास या जगांत सुखानें दिवस लोटण्यास सर्वांशीं स्नेहानें व मित्रत्वानें वागल्याविना चालावयाचें नाहीं असें सदरीं ह्मटलें आहे करितां प्रत्येक व्यक्ति मात्राच्या अंगीं दुसऱ्याचे सद्गुण जाणण्या पुरती धूर्तता असणें जरूरीचें आहे; नाहीं पेक्षां अपघात होण्याची भिती असते. मित्रत्व जडणें हें बहुतांशीं परस्परांच्या गुण दोषांवर अवलंबून असतें; आणि एकवार जो गुण व जी संगति जडते ती प्रायःदूर होत नाहीं. यास्तव प्रथमतःच सर्व कामीं दक्ष असावें असे साधुसंतांचे उपदेश आहेत.

येणें प्रमाणें मित्र इत्यादि कसे असावे याविषयीं निर्णय करण्यांत आला; पण याच्या पुष्टिकरणार्थ आणखी एखादि सूचना देणें उचित दिसते ती अशी कीं, हें जग सज्जन व दुर्जन या दोन पक्षांनीं व्यापिलें आहे, याजकरितां दोन्हीं मार्गीं लोकांशीं हमेशा प्रसंग येतात सबब प्रसंगोपात सर्वांशीं स्नेहानें वागावें, कोणी ही दुर्जन असला तरी त्याच्याशीं आपण विरूद्धपक्षानें वागतो असें दर्शवूं नये; सर्वांशींच धूर्तपणानें वागून त्यांपासून सद्गुण मात्र ग्रहण करीत जावें. कधीं कधीं असेंही घडून येतें कीं, ज्यांस आपण कुमार्गी समजतों त्यांजपासून चांगलीं कामेंही घडून येतात, याचें कारण ज्या लोकांत दुर्गुणाचा भरणा जास्त असतो त्यांस दुर्जन ह्मणतात, पण जे कांहीं सामर्थ्य सद्गुण असतात त्या योगानें ते कांहीं चांगलीं

२२

कामेंही करितात. आणि ज्यांत सद्गुणाचा समावेश जास्त असतो त्यांस सज्जन ह्मणण्याचा प्रघात आहे तथापि अशा सज्जनांमध्येंही कांहीं दोष असतात, पण ते जास्त संख्ये खालीं लोपून जातात. कोणामध्यें दोष नाहींत, असे साधुही विरळा, मग गृहस्थांची गोष्ट कशास ! कांहीं लोकांचें ह्मणणें असें आहे कीं, कित्येक या सृष्टींत मनुष्यादि प्राणी, स्वभावें करूनच दुष्ट असतात, पण तें त्यांचें ह्मणणें आमच्यानें कबूल करवत नाहीं, याचें कारण पाहूं गेल्यास विशेष विचारणीय आहे असें ही नाहीं, ज्या मनुष्यास आपल्या गर्जा अल्प श्रमानें साध्य होणें कठीण पडतें, तो प्रसंगीं विरुद्ध आचरण करितो परंतु त्यासच नीट रीतीनें व्यवस्था चालविण्याचे मार्ग कळूं लागले कीं, तो पुढें स्वभावें करून बदलतो. असें असतां आपण विचार न करितां त्याचा स्वभावच दुष्ट असें ह्मणूं लागलों तर सृष्टिकर्त्यास दूषण दिल्या सारखें होतें, कारण परम पवित्र व दयार्णव असा जो सृष्टिचालक ईश्वर त्याजपासून दुष्ट वस्तु निर्माण होणें अगदीं अशक्य आहे. आतां इतकें मात्र खरें कीं जो एकवार कुमार्गी प्रवृत्त झाला आणि त्यानें त्यापासून आपली सुटका करून घेतली नाहीं तर त्यास स्वभावें करून दुष्ट ह्मणण्याची रूढी मात्र आहे. असो, अशा दुराचारी लोकांपासून सदा दूर रहावें हें उत्तम, कारण ते अल्प विचारी असल्यामुळे समयीं दुष्टाचरण करितील, परंतु सज्जन जे आहेत ते चुकीचा विचार करून क्षमा करतात, यास्तव लौकिक इच्छिणारांनीं सज्जनांचीच संगत केली पाहिजे.

कांहीं लोकांची अशी समजूत आहे कीं, जे सदाचारी व सज्जन आहेत, त्यांचा आपण जरी करितां जाणूनबुजून अपराध केला तरी ही, ते आपल्या कर्तव्या प्रमाणें आह्मांस क्षमाच करतील, या इराद्यानें त्या सज्जन गृहस्थांशीं ते साधक लोक, आपला हेतु पूर्ण करण्या करितां, पहिल्यानें (सचोटी बसण्या करितां) आपला उद्योगीपणा व विश्वासूपणा दर्शवितात आणि वेळ आली ह्मणजे ते त्या सज्जनांस फसविण्यास मागें पुढें पहात नाहींत; बरें इतक्यानेंच त्यांची तृतता होते असेंही नाहीं, तर ते सज्जन आपल्या नुकसानीच्या संबंधानें अगर त्या साधक मनुष्यांस लागलेली वाईट सोड जावी अशा हेतूनें जर त्यांनीं दोन

शद्ब वापरले आणि त्या दुराचारी मनुष्यांच्या हितानुहिताचें कळविलें असतां ते त्या सज्जनांचा उपहास करून असें ह्मणत असतात कीं, हे हो कसूचे सज्जन! ह्यांचे आंगीं क्षमेचा लेशही नाहीं. अशा तऱ्हेचे प्रसंग सज्जनांस वेळोंवेळीं येत असतात; तेव्हां अशा बाह्यस्वरूपी मनुष्यांस कोणत्या वर्गांत गणावें बरें? असो. याचा पुर्ता विचार करून ज्यांनीं त्यांनीं आपलें जसें सुवर्तन तशी अंतर्बुद्धि असों द्यावी, किंवा जशी सुबुद्धि तसें वर्तन ठेवावें, सारांश दोहोंची साम्यता असली ह्मणजे आपल्या मित्रां कडून आपलें हितच होईल केवळ अल्पलाभाकरितां महत् दूषण घेणें हें मनुष्य देहास मोठें लाजीरवाणें होय. असें ह्मटलें आहे कीं एकवार ज्यास आपण मित्र गणला व ज्याचा आपणावर भरंवसा बसला आहे त्याचा विश्वास घात करणें यासारखें दुष्कर्म कोणतेंही नाहीं.

श्लोक.

**मित्रद्रोही कृतघ्नश्च, तथा विश्वास घातकः**
**त्रयस्ते नरकं यान्ति, यावच्चंद्र दिवाकरौ ॥**

**अर्थ**—मित्राचा घात करणारा, उपकार न जाणणारा, विश्वास देऊन घात करणारा हे तिघे जों पर्यंत सूर्य चंद्र आहेत तों पर्यंत नर्कांच रहातात.

मित्रत्वाची खरी योग्यता जे कोणी प्रवास करितात त्यांस पूर्ण कळून येते. जेव्हां एखादा मनुष्य आपला गांव सोडून दूरदेशीं कांहीं कामाच्या संबंधानें जातो त्यावेळीं त्यास परस्थळीं प्रथम कित्येकांशीं स्नेह जोडावा लागतो, नंतर जसजसे उद्देश असतील तसतसे त्या स्नेहीमंडळीकडून साध्य करून घ्यावे लागतात. जर मुळींच मैत्री संपादन केली नाहीं तर आंगीं असलेल्या उत्तम गुणांचीही प्रशंसा न होतां उलट उपहासास पात्र व्हावें लागतें. जशी ऐक्यतेची गरज सर्व प्राणीमात्रांस आहे तद्वत् मित्रत्वाचीही विशेष जरूरी आहे. कोणी आपल्या गुणांच्या ऐटीनें, विद्वतेच्या मीपणानें, द्रव्यबळानें तसेंच राज्यमदानें आपल्यास स्नेही नकोत ह्मणून दुराग्रही

होईल तर त्याचे दिवस सुखानें जाणें मोठें दुरापस्त आहे; कारण विपत्तकाळीं कोणीच साह्य देत नाहींत, कदाचित् लोकलज्जेस्तव साह्य केलें तरी तें वरकांतीचें असतें. या कारणास्तव ज्ञातेजन जगांत सर्वत्रांशीं स्नेह राखून सुखानें दिवस घालवितात, आणि याबद्दल व्यावहारांत अशी ह्मण आहे कीं, "ज्याचे स्नेही जास्त त्यास संकटें कमीं." या प्रमाणें जगरहाटी असतां आमचे लोक तिकडे बिलकूल लक्ष देत नाहींत त्यांस दुसऱ्याशीं स्नेहभावानें वागणें, भाषणांत मृदु शब्द वापरणें, दुसऱ्याचे सद्गुण घेणें हें मोठें विषतुल्य वाटतें, आणि याच कारणानें आह्मां लोकांची स्थिति अशा निकृष्ठावस्थेस येऊन पोंहोंचली आहे. असो—

यास्तव सर्वत्रांनीं आपले आंगीं मोठा धूर्तपणा बाळगून कोणाचा कसा मनोवेग आहे तो ओळखून काढावा, आणि त्याप्रमाणें आपले व्यवहार त्याजपाशीं चालू ठेवावे, तरच कांहीं दिवस जगांत निभूं शकतील, याजबद्दल पुढील श्लोकाकडे लक्ष दिलें असतां समजणार आहे.

## श्लोक.

नात्यंतंसरलैर्भाव्यं, गत्वापश्यवनस्थलीम् ॥
छिद्यंतेसरला स्तत्र, कुब्जास्तिष्ठन्ति पादपाः ॥

अर्थ— अत्यंत सरळपणा धरूं नये, मनुष्यानें कांहीं क्रोधयुक्त असावें, जे फारच सरळ असतात त्यांची अवस्था कशी होते ती वनांत जाऊन पहा, तें काय ह्मणाल तर जे वनांत सरळ वृक्ष असतात त्यांस सर्व लोक तोडितात आणि जे वांकडे ते तसेच रहातात यास्तव लोकांमध्यें कांहीं काळ आपली स्थिति चांगली रहावी अशी इच्छा असल्यास त्यांनीं किंचित क्रोध जर धरला तरच त्यांची लोकांमध्यें स्तुति होईल.

या सदरील श्लोकावरून जगीकरहाटी कशी आहे व आपणांस कोणत्या रीतीनें वागलें पाहिजे याजबद्दल सभेच्या अनेक व्याख्यानांत, निबंधांत तसेंच याही चालू विषयांत व्यक्त करण्यांत आलें आहे.

आह्मीं हा विषय संपवितेवेळीं आमचे बंधुवर्गास व मित्र मंडळीस थोडि अशी सूचना देतों कीं, या बुकांत कांहीं ठिकाणीं स्वपरजातींविषयीं व स्वपरराष्ट्रांविषयीं जे उल्लेख आले आहेत ते फक्त आमच्या बंधुजनांचा अव्यवस्थीतपणा दूर व्हावा या इच्छेनें आहेत कोणाचा उपहास करावा असा इरादा या सभेचा बिलकूल नाहीं; पण इतकेंच मात्र आहे कीं, सर्वांनीं स्नेहानें व मित्रत्वानें आपापलें वर्तनठेवून कोणीही आपले सद्गुण दुसऱ्यास देण्यास व दुसऱ्याचे स्वीकारण्यास, धर्माच्या बाबतीं किंवा परकीयपणाचा अल्प विचार मनीं आणू नये ह्मणजे आपल्या मनुष्य देहाचे खरे हक्कास कांहीं बाद न येतां सर्वांस सारखा लाभ होऊन आपसांतील दुराग्रह व मत्सर समूळ नाश पावून प्रीति व सुख विशेष वृद्धिंगत होईल अशी आशा धरून हा मित्रत्वाचा विषय संपविण्यांत आला आहे.

**सभा.**

१३०–१३१–१३२–१३३

ता० १८ माहे आगष्ट सन १८८५

( **वि० सूचना.** )—या पुस्तकांत आलेल्या विषयांशिवाय सभेंत वाचलेले निबंध व कित्येक व्याखानकारांनीं ज्या ज्या अनेक विषयांवर भाषणें केलीं त्यांजबद्दलचीं टिपणेंही बरींच शिल्लक राहिलीं आहेत. तीं सर्व सवडी प्रमाणें प्रसिद्ध करण्याची सभेची इच्छा आहे. आतां पुढील प्रकरणांत सभेस मिळालेल्या द्रव्याश्रया संबंधीं उल्लेख करण्यांत येत आहे.

**सभा.**

# प्रकरण तिसरें.

या पुस्तकांतील पहिल्या व दुसऱ्या प्रकरणांत जी एकंदर हकीकत आली आहे तिचा विचार केला असतां सुज्ञ जनांचे सहज लक्षांत येईल कीं, आपणां मध्यें जे गौणमार्ग आहेत ते दूर होण्यास जे उपाय येथें दर्शविले आहेत ते फारच इष्ट होत. ह्मणून स्वपरदुःख चित्तीं वागऊन स्वसुधारणेच्छु ज्ञाति गृहस्थ या हेतुसिध्यर्थ पुढें सरून आपल्या आयुष्याचें खरें सार्थक करून योग्य कीर्ति व बंधु प्रीति संपादन करतील अशी आमची पूर्ण खात्री होत आहे. आतां इतकें मात्र खरें कीं एवढ्या मोठ्या भारी संख्येच्या लोकांत सुव्यवस्था चालु करणें किंवा तिजविषयीं प्रयत्न करणें हें अति श्रमाचें, दुर्घट प्रसंगाचें, तसेंच मोठें खर्चाचें काम आहे असे विचार सुचून किंचित मन दिलगीर होण्याचा संभव आहे तथापि आपल्या ह्या अशा स्थितीचा केवळ खेद करित बसण्या पेक्षां कांहीं उपाय योजनें हें मानवी देहास भूषणीय होय; आणि असे जे परदुःख शमनार्थ आपला देह झिजवितात त्यांस ईश्वरी सहाय मिळून ते यशस्वि होतात याबद्दल हजारों उदाहरणें आहेत मग चिंता करीत बसणें काय उपयोग आणि तशांत शहाणे व योग्य विचारी लोकांस स्वस्थ बसणें अगदीं अप्रशस्त वाटल्या विना रहाणार नाहीं. अशीं अनेक कारणें लक्षांत येऊन ही सभा आपलें खरें कर्तव्य करण्यास धजत आहे.

आह्मां मध्यें ऐक्यत्वाचा व बंधू प्रीतीचा अंश कमीं असल्यामुळें जी रकम आह्मीं येथें दर्शविणार आहों ती उभी रहाण्यास कसे व किती श्रम घ्यावे लागले असतील ह्याचा सुज्ञ लोकच विचार करूं शकतील-ज्या वेळीं या सत्कृत्या करितां फंड जमा करण्याचें काम सुरू झालें त्या वेळीं कांहीं कांनीं असे उद्धार काढिले होते कीं आह्मां कडील वर्गणी विषयीं सभेस बिलकूल श्रम घ्यावयास नको जेव्हां सभासदां कडून मागणें होईल तेव्हां ती तयारच आहे अशा अनेक थापा देऊन आजपर्यंत त्या परोपकार करूं इच्छिणारानीं दिवस काढिले, के-

वडे बरें आश्चर्य हें! कीं स्वकल्याणार्थ देखील अद्याप पर्यंत कित्येक लोक काना डोळा करण्याची इच्छा धरितात-कांहींकांस तर द्रव्य साह्य देण्याचें पुरतें सामर्थ्य नसतां सभालिस्टावर (यादीवर) आपलें नांव प्रथम पाहिजे असा पोकळ अभिमान धरूनच राहिले आहेत आणि कित्येक तर अझूनही असा प्रश्न करीत असतात कीं सभाजनानीं इमारत बांधण्याचें काम कोठें सुरवात केलें आहे? तेव्हां अशा अर्थरहीत प्रश्नकर्त्यांस कायबरें ह्मणावें; अहो कोणतेंही काम करणें जहाल्यास त्या कामापुरती रक्कम तयार जहाल्याविना कशी सुरवात व्हावी, तस्मात या कामांकरितां जर जागा घेण्याचा विचार पाहिला तर मुंबई सारख्या शहरीं निदान पक्ष पांच हजाराची रक्कम तरी आधीं अवश्य पाहिजे, नंतर ती बांधून काढण्यास अगदीं सामान्य प्रतीच्या इमारतीस बारापासून पंधरा हजारापर्यंत सहज रक्कम मागें पडणार आहे, शिवाय तें स्थळ तयार जहालें ह्मणजे त्याचीं पुढें नीट व्यवस्था रहावी यतदर्थ दोन पासून तीन हजारापर्यंत शिल्लक रक्कम स्थळांचें नावें कायम असलीच पाहिजे, याखेरीज आपणांमध्यें विद्या वृद्धि होण्याकरितां जी एक शाळा त्या सुस्थळीं स्थापन करावयाची योजना आहे तिचा महिना साठरुपयेपर्यंत खर्च चालणें अति जरूरीचें आहे ह्मणून ज्या कामांस वीस पासून तेवीस हजाराची जरूरी आहे तें दीड किंवा दोन हजार रुपये जमा जहाल्यानें कसें बरें सुरवात होऊं शकेल, इत्यादि पुढील कर्तव्याचा ओघ असतां लोक भलभलते प्रश्न करून व्यर्थ शीण काय ह्मणून करून घेतात? असो.

आमची बंधुवर्गांस अशी विनंति आहे कीं कोणीही अयोग्य प्रकारच्या विकल्पांत न पडतां सभेचे खरे मुळ उद्देश लक्षांत घेऊन आपलें योग्य साह्य देऊन सत्कीर्ति संपादन करावी. आजपर्यंत या सभेनें बंधुजनांची योग्य सेवा आपणाकडून घडावी अशा शुद्ध भावार्थानें व खऱ्या कळकळयानें फारच मेहनत घेतली आहे व पुढेंही घेण्यास तयार आहे. सभेकडून अनेकवेळां जाहिराती प्रसिद्ध होऊन निरनिराळे प्रसंगीं बराच हेतु बंधू वर्गांपुढें सादर करण्यांत आला होता, असें असतां जरी कित्येकांकडून मुद्दाम किंवा कारण परत्वें दुर्लक्ष जहालें असेल तरीं

यापुढें सर्वत्र मनःपूर्वक झटून आपल्या जन्माचें सार्थक करून घेतील अशी आह्मांस पूर्ण आशा आहे.

आतां ज्या सद्गृहस्थांनीं सभेच्या विनंतिस मान देऊन आपलें शक्तिनुसार साह्य दिलें आहे त्या बंधुजनांचीं नांवें चिरकाल जगीं रहावीं या उद्देशानें हा तिसरा भाग तयार करून या पुस्तकास जोडला आहे. त्यांजसारखी सर्वत्रांस ईश्वर सद्बुद्धि देऊन हें कृत्य त्यांजकडून शेवटास नेवो अशी आह्मीं त्या जगत्पतीची प्रार्थना करित आहों.

फंड जमा करण्याकरितां सभेकडून ९८ असाम्यांस पावती बुकें देण्यांत आलीं होतीं. त्या बुकांन्वय जमा झालेली रक्कम, सभेच्या यादीवर सभासदांकडून पोंहोंच जहालेली रक्कम व मासिक फंड चालु जहाल्यापासून जो पैसा वसूल जहाला तो, अशा तीन सदरांचा तपशील पुढें देण्यांत आला आहे.

( १ ) ज्या सभासदांनीं पावति बुकांप्रमाणें रक्कम उभी केली त्यांचीं नावें व जमेचा अंक देणें अवश्य दिसल्यावरून त्यांचीं नांवें येथें दर्शविलीं आहेत.

| वसूल केलेल्या रकमा. रु. | आ. | नांवें. |
|---|---|---|
| ३१८ | १४ | रामजी कृष्णाजी लाखम, ग्रेटईस्टर्न मिल, मास्तर; भायखळा. |
| ११८ | ० | रघुनाथ बाबाजी राव मालप उर्फ बाबासाहेब, मिल कन्ट्राक्टर-कुलाबा. |
| ८९ | ० | तुकारामजी हरजी पाटील, पोर्टट्रस्ट स्टोअर हेडक्लार्क मजगांव. |
| ६४ | ८ | रत्नोजी हिरोजी सावंत इंजर पटेल, नळाचे कनट्राक्टर. उमरखाडी.<br>येशवंत आनंदराव इचारे हवालदार. ठि. मजकूर.<br>भिकाजी बापूजी राव पाटोळे मोकाशी. उमरखाडी. |
| ९८ | ८ | त्र्यंबोबा सदाशिव सावंत, मुकादम चिंचपोकळी. |

| वसूल केलेल्या रकमा. | | नांवें. |
|---|---|---|
| रु. | आ. | |
| ४४ | ० | राघोजी सखोजी सावंत डोंगरे, मास्तर मंगळदास मिल, गिरगांव.<br>आत्माराम गणोजी फाटक, मुकादम मिल मजकूर, गिरगांव. |
| ३२ | ८ | गोपाळ भिवाजीराव दळवी, चिराबझार.<br>जयराम लक्ष्मणराव माने (भुजबळराव) नवानागपाडा. |
| ३० | ८ | शिताराम बापुजीराव जाधव, चौपटी.<br>पांडुरंग विश्रामराव जाधव. चौपटी. |
| २८ | ८ | दिपाजी बाळोजीराव साळवी, नवानागपाडा. |
| २७ | ८ | माधवराव रघुनाथ विश्वासराव, ताडदेव चुनाभट्टी. |
| २६ | ० | बाळकृष्ण अर्जुन सावंत भोसले सैतवळी. गल्ली ७.<br>आबाजी बाळोजी नाईक तावडे, ठि. मजकूर. |
| २६ | ० | भाऊ बापुजीराव पाटोळे, काळबादेवीची वाडी.<br>गोविंदराव बळवंतराव माने (भुजबळराव) ठि. मजकूर. |
| २६ | ० | बाळाजी अत्माजीराव राणे, पोर्टट्रस्ट आसिस्टन्ट क्याशिअर, मुगभाट. |
| २० | ० | गोपाळ भिवाजी माळके, चिंचपुगली. |
| १७ | ० | गणपतराव लक्ष्मणराव माने (भुजबळराव) नवानागपाडा. |
| १५ | ० | धोंडु हरिबा खवळे, गिरगांव. |
| १४ | ० | राघोजी बापुजीराव पवार, नानाची वाडी.<br>आपाजी दौलतराव चवाण, ठि. मजकूर. |
| ११ | ८ | रत्नोजी महिमाजीराव कदम, मजगांव. |
| ११ | ० | भिकाजी बापुजीराव पाटोळे, उमरखाडी. |
| ९ | ० | विठोजी दौलतजी सावंत, कामाटपूर. |
| ६ | ० | विठोजी राघोजीराव चवाण, शिवडी. |
| ६ | ० | कृष्णाजी येशवंतराव चवाण, कामाटपूर. |

| वसूल केले-ल्या रकमा. | | नांवें. |
|---|---|---|
| रु. | आ. | |
| ४ | ० | शिताराम जिवाजी यशवंतराव, नवानागपाडा. |
| ३ | ० | विठोजी ब्राळोजी पाटील साळुंखे |
| ३ | ० | गोपाळ विठोजी नाईक साटम, सेतवळी गल्ली ७. |
| ३ | ० | दाजीराव कृष्णाजीराव दळवी, गिरगांव. |
| २ | ० | नारायण बापुजी नाईक दुखंडे. |
| १ | ० | येशवंत बापुजीराव सुर्वे, डोंगरी. |

येणें प्रमाणें ३६ गृहस्थांचे श्रमानें एकंदर जमा रु० १०१५-६ या फंडाच्या साह्यार्थ वसूल झाले. या सदरील रकमां पैकीं पहिली जी मोठी रक्कम आहे, ती वसुल करण्याचे कामीं आमचे परोपकारी रा. रा. हरिबा बाबाजी रेडीज मास्तर ग्रेटईस्टर्नमिल यानीं फारच मेहेनत घेतली. या सद्बुद्धि गृहस्थांचे श्रमाबद्दल ही सभा फारच आभारी आहे असें त्या-चवेळीं ( सभेत रक्कम पोंचती झाली ) सर्वांचे उद्गार निघाले होते परंतु लेखी प्रदर्शीत करण्याची वेळ न आल्यामुळें आज येथें त्या बद्दल उल्लेख करणें सभेस उचित् दिसतें. अशीच परोपकार बुद्धि सर्वांच्या अंतःकर्णी जागृत राहिली असतां परस्पराचे हेतु साध्य होण्यास काय विलंब लागणार आहे ?

२. सभेच्या यादीवरील रक्कम रुपये ८०१ ही रक्कम देणारांचीं नांवें पुढें दिलीं आहेत ह्मणून तीं येथें दर्शविलीं नाहींत.

३. तारिख १ जुलई सन् १८८५ पासून ता० ३१ मार्च १८८६ पर्यंत मासिक फंडाची जमा रुपये १.१०-१४-

येणें प्रमाणें ता० १५ माहे मे सन १८८६ पर्यंत एकंदर जमा रुपये १९२७-४-० सभेत पोहोंच झाली आहे या सदरील रकमेंतून ता० १५ माहे मे सन १८८६ पर्यंत एकंदर खर्च रुपये ११५-४-६

झाला आहे या खर्चाचा सादिलवार तपशील रोजकिर्द नंबर ७ यांत दर्शविला आहे.

या पुढें जीं नांवें व रकमा देण्यांत आल्या आहेत तीं फक्त सभेच्या पावती व तारानिशी बुकांवरून दिलीं आहेत, सर्वांची नांवें बरोबर प्रकारें मिळावीं अशी सभेची योजना होती, पण तसा योग घडून आला नाहीं; परंतु जितकीं नांवें प्रयत्न करून मिळालीं तितकीं येथें त्यांच्या नांवा गांवा सहीत व वडिलोपार्जीत आणि चालु हुद्यां सहित दिलीं आहेत आणि बहुतेक कुळांविषयीं चांगला शोध करून सर्व माहिती मिळवीली आहे, चालु राज्यांत मिळालेले हुद्दे यांस (‘ ’) अशी खूण केली आहे. प्रत्येकाच्या नांवा पुढें तालुका किंवा प्रांत दर्शविण्याचा विचार होता पण त्यांचा तपास बरोबर मिळाला नाहीं, तथापि गांवांचा तपास करून ते मात्र लिहिले आहेत.

| रक्कम रुपये. | नांवें. |
|---|---|
| १७५ | रामजी हिरजी सावंत देसाई, खेडसी. |
| १३० | रामजी कृष्णाजी लाखम ‘मास्तर’ किंजवडें. |
| ५० | तुकारामजी हरजी पाटील साळुंखे ‘हेड क्लार्क पोर्ट-ट्रस्ट’ कुसवर. |
| २५ | रत्नोजी हिरोजी सावंत इंजर पटेल; तरंदळें. |
| २५ | लाडोजी कृष्णाजी राजपवार; मसु वेंगुर्लें. |
| २५ | भानजी बाबुजीराव आंगणें (इनामदार); मसुरें |
| २५ | विठोजी खंडोजीराव पिसाळ धसई. |
| ५० | रघुनाथराव बाबाजीराव मालप उर्फ बाबासाहेब; मालवण. |
| २० | व्यंकोबा सदाशिव सावंत; मालवण. |
| २० | रायोजी सखोजी सावंत डोंगरे ‘मास्तर’; पाचारडें व० जानावली. |
| १५ | भिकाजी कृष्णाजी साळुंखे; साळसी. |
| १० | गणपतराव लक्ष्मणराव माने (भुजबलराव, सभानाईक) आंबव. |
| १० | कृष्णाजी जयरामराव गायकवाड (इनामदार) बापारडें. |
| १० | बाबाजी भगवंतराव चव्हाण; पालसेद. |
| १० | बाबाजी अनाजी नाईक साटम; आयनल. |

| रक्कम रुपये. | नांवें. |
|---|---|
| १० | दाजीराव कृष्णाजीराव दळवी (सेनापती) जानवली. |
| १० | रघुनाथ नारायणराव कदम; संगमेश्वर. |
| ७ | केशवराव रामचंद्र साळुंखे (अनेराव, सरनाईक) आंगवली. |
| ७ | बिठोजी बाळाजी धुरी; मानगांव. |
| ६ | बाबाजी तात्या इंदुलकर; गोठणें. |
| ५ | बाळाजी आत्माजीराव राणें; बुरुंडी. |
| ५ | रामचंद्रराव गणपतराव जाधव (यशवंतराव); हसोल. |
| ५ | काशिरामराव लक्ष्मणराव माने (भुजबलराव, सभानाईक) आंबव. |
| ५ | पांडुरंग भिकाजीराव विश्वासराव; झरयें कुरंग व उरण. |
| ५ | भिकाजी बापुजीराव पाटोळे उर्फ साळुंखे (मोकाशी,) तलावडें. |
| ५ | महादेव रघुनाथराव विश्वासराव (सरनाईक) झरयें. |
| ५ | बिठोजी राघोजीराव चवाण, तोंडलें. |
| ५ | शिवरामराव देवराव कालेकर उर्फ शेलार; करंजाणी. |
| ५ | बाळकृष्ण अर्जुन सावंत भोसले (सरदार, इनामदार,) नांदवडें. |
| ५ | गंभाजी भानजी राणेराव, नागिंधें. |
| ५ | सुर्याजी धनाजी नाईक नीळवर्ण उर्फ चालुक्य; करलीं. |
| ५ | संभाजी हरजी नाईक साठम गिलल. |
| ५ | शिताराम बापुजीराव जाधव प्रभु बांदिवडे. |
| ५ | बाबाजी अनाजीराव साळुंखे (अनेराव, सरनाईक) आंगवली. |
| ५ | दिपाजी बाळोजीराव साळवी, काजुर्ली. |
| ५ | हरिबा दाजीराव कदम, बारसंव. |
| ५ | कृष्णाजी यशवंतराव चवाण प्रभु हिंदळें. |
| ५ | पांडुरंग विश्रामराव जाधव प्रभु बांदिवडे. |
| ५ | शिताराम बाबाजी गावडे, जानवली. |
| ५ | लक्ष्मण तातोजीराव सावंत; पोकरण. |
| ५ | बिठोजी गंगाजी जाधवराव (येशवंतराव, फडनाईक) कोसंब; उंबरें. |
| ५ | अमृतराव माधवराव तावडे, वाडें 'ठाणापोलिस फौजदार' ता० मोखाडें. |
| ५ | बाबाजी बापुजीराव कनवजे पुरणगड. |
| ५ | आत्माराम गणोजी फाटक. |
| ५ | बाळकृष्ण पांडुरंग सुर्वे. |
| ५ | बाबाजी राघोजीराव चवाण, तोंडलें. |

